गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला

पुस्तक ५ वें

# सरस्वती

लेखक

प. वा. बाळकृष्ण रामचंद्र कुळकर्णी

प्रस्तावना लेखक

अ. बा. गजेंद्रगडकर

संस्कृतचे प्रोफेसर, एल्फिन्स्टन् कॉलेज, मुंबई

पंचमावृत्ति

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी

गिरगांव-मुंबई

---

मार्च १९३३

---

सरस्वती

| | | | |
|---|---|---|---|
| आवृत्ति १ ली | ( १९०० ) | ३५०० | प्रती |
| आवृत्ति २ री | ( १९०४ ) | १००० | प्रती |
| आवृत्ति ३ री | ( १९०९ ) | २००० | प्रती |
| आवृत्ति ४ थी | ( १९२३ ) | २००० | प्रती |
| आवृत्ति ५ वी | ( १९३३ ) | ४५०० | प्रती |
| | एकूण | १३००० | |

Printed and Published by D. R. Mitra, at the Manoranjan Press,
3, Sandhurst Road, Girgaon, Bombay,
for the Manoranjak Granthaprasarak Mandali.

# विषयानुक्रम

# प्रस्तावना

'सरस्वती' या कादंबरीचे लेखक परलोकवासी श्रीयुत बाळकृष्ण रामचंद्र कुळकर्णी हे एकोणीस व वीस या शतकांच्या संधीच्या दोन्हीं बाजूच्या कालांत होऊन गेलेल्या लेखकांपैकीं एक होते. यांचा जन्म जंजिरा संस्थानांतील नांदगांव येथें इ. स. १८७३ च्या जून महिन्याच्या २३ व्या तारखेस झाला. ठाणें येथें यांचें इंग्रजी शिक्षण स्कूल फायनलपर्यंत झालें. पुढील शिक्षणाला परिस्थिति विशेष अनुकूल नसल्याकारणानें मुंबईस येऊन श्रीयुत बाळकृष्णपंत यांनीं पोस्टखात्यांत नोकरी धरली व शेवटपर्यंत ते त्या खात्यांतच काम करीत असत. हे वयानें अवघे ३४ वर्षांचें असतांनाच इ. स. १९०७ सालीं जुलईच्या २० व्या तारखेस अकाल मृत्यूनें यांच्यावर झडप घातली.

'मनोरंजन' मासिकाचा जन्म इ. स. १८९५ सालीं झाला व तें मासिक अगदीं बाल्यावस्थेंत असतांनाच म्हणजे १८९७ या वर्षी श्रीयुत कुळकर्णी यांचा मनोरंजनाशीं संबंध जडला. यानंतर ७।८ वर्षे श्रीयुत कुळकर्णी हे मनोरंजनाची अव्याहत सेवा करीत होते. मृत्यूपूर्वी दोनतीन वर्षे मात्र प्रकृतीच्या अस्वास्थामुळें व ऑफिसांतील कामाच्या दगदगीमुळें त्यांच्याकडून कांहीं लेखन झालें नाहीं.

येथील वाङ्मय-सेवा-मंडळाच्या गेल्या (१९३२) सालच्या वार्षिक समारंभाच्या वेळीं अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना रावबहादुर गोविंद मल्लिनाथ ठेंगे यांनीं असें सांगितलें कीं आपल्याकडून जी थोडीबहुत साहित्य-सेवा झाली तिचें श्रेय सर्वस्वीं आपले स्वर्गवासी स्नेही काशीनाथपंत मित्र यांना आहे. मनोरंजनाचे संस्थापक काशीनाथपंत यांच्या अंगीं असा एक विलक्षण गुण होता कीं साहित्यसेवा करण्यास योग्य माणसें कोणती हें ते तात्काल ओळखीत व अशा माणसांना वारंवार उत्तेजन देऊन त्यांना लिहावयास लावीत. 'सरस्वती'चे लेखक श्रीयुत कुळकर्णी हे या वर्गातीलच एक लेखक होते. काशीनाथपंतांच्या उत्तेजनानेंच ते लिहूं लागले व त्यांचें महत्त्वाचें सर्व लिखाण मनोरंजनांतच झालें. कुळकर्णी यांच्या अकालीं मृत्यूनें काशीनाथपंत यांना एक होतकरू लेखक नाहींसा झाला म्हणून फार वाईट वाटलें होतें.

श्रीयुत कुळकर्णी यांच्या 'सरस्वती' व 'परिणामीं हेंच' या दोन संपूर्ण कादंबऱ्या मूळ बंगालीवरून लिहिलेल्या आहेत. '१९ व्या शतकांतील बंड'

या नांवाची एक कादंबरी ते क्रमशः लिहित असत. पण त्यांच्या अकालीं निधनानें ती अपुरीच राहून गेली. याशिवाय 'सोमेश्वर शास्त्र्यांचें पुराण' व दुसऱ्या कित्येक गोष्टी व स्फुट लेख त्यांनीं मनोरंजन करितां लिहिलें आहेत.

लोकप्रियतेच्या दृष्टीनें 'सरस्वती'नें मराठी भाषेतील कादंबऱ्यांमध्यें बरेंच वरचें स्थान मिळविलें आहे यांत शंका नाहीं. निवळ बाह्य गोष्टीवरून परीक्षा केली तरी 'सरस्वती'चीं आजपर्यंत चार मुद्रणें झालीं असून तिच्या साडेआठ हजार प्रती महाराष्ट्र जनतेंत पसरलेल्या आहेत मुंबई विश्वविद्यालयानें १९३४ सालच्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेसाठीं मराठी विषयातर्गत 'त्वरित वाचन' या सदराखालीं 'सरस्वती' ही कादंबरी नेमली आहे. त्यामुळें मुख्यतः मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांसाठीं 'सरस्वती'चें हें पांचवें मुद्रण प्रकाशित होत आहे.

'सरस्वती' ही एक सामाजिक कादंबरी आहे ती 'पण लक्ष्यांत कोण घेतो?' सारख्या कादंबऱ्यांच्या वर्गात पडते. कादंबरी लिहितांना लेखकानें कांहीं विशिष्ट हेतु आपल्यापुढें ठेवावा कीं नाहीं, किंवा सर्वसाधारण भाषेत बोलावयाचें झाल्यास, कलाविलास सहेतुक असावा कीं निर्हेतुक असावा, हा प्रश्न वादविषय असला तरी एवढें मात्र खरें आहे कीं, पंचवीस तीस वर्षांपूर्वीच्या काळांत ज्या सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या त्या कांहीं तरी हेतूनेंच लिहिल्या गेल्या होत्या इंग्रजी शिक्षण व पाश्चात्य संस्कृति यांचा जसजसा इकडे प्रसार होऊं लागला तसतशी हिंदुसमाजांतील वैगुण्यें समाजधुरिणांच्या नजरेस येऊं लागलीं व प्रत्येकजण आपापल्या परीनें तीं घालविण्याचा यत्न करूं लागला. समाजांतील वैगुण्यें व त्यांमुळें उत्पन्न होणारे दुष्परिणाम यांचें चित्र–थोड्या भडक रंगांनीं रंगविलेलें–कादंबरीकार समाजाच्या दृष्टीपुढें ठेवतो व अशा रीतीनें त्या वैगुण्यांकडे तो समाजाचें लक्ष्य खेंचतो. प्रत्यक्ष व्यवहारांत घडलेल्या गोष्टी डोळ्यांनीं पाहूनहि जो परिणाम मनावर होऊं शकत नाहीं तसला परिणाम कादंबरीकाराच्या कुशल कुंचल्यानें रंगविलेल्या चित्राकडे पाहून कित्येक वेळां होतो. म्हणूनच कादंबरीकार आपणांस कधीं असें सांगत नाहीं कीं आपल्या समाजांत अमकी अमकी गोष्ट वाईट आहे, ती टाकून द्या. तो फक्त ती गोष्ट व तिचे परिणाम यांचें चित्र आपल्या डोळ्यांपुढें उभें करतो व तें चित्रच इतकें परिणामकारक असतें कीं ती वाईट गोष्ट नाहींशी करण्याकडे आपल्या मनाची साहजिकच प्रवृत्ति होते.

'सरस्वती' या कादंबरींत अशाच प्रकारचें एक समाजाचें चित्र वाचकांच्या दृष्टीस पडतें. जनार्दनपंत देशमुखांच्या घराण्यावर जी आपत्ति ओढवली आणि सुशील सरस्वतीचा जो छळ झाला त्याला मुख्य कारण म्हणजे जनार्दनपंतांचे वडील मुलगे विठ्ठलराव व गोविंदराव आणि त्यांच्या बायका भागीरथीरबाई व अन्नपूर्णाबाई यांच्यामधील शिक्षणाचा अभाव हेंच होय. विठ्ठलराव–भागीरथी-बाई व गोविंदराव–अन्नपूर्णाबाई हीं दोन जोडपीं जर सुशिक्षित असतीं तर या कादंबरींत दाखविलेल्या वाईट गोष्टी व प्रसंग उद्भवलेच नसते. तेव्हां या कादंबरीच्या वाचनानें जी गोष्ट प्रथम आपल्या लक्ष्यांत येते ती ही कीं समाजांतील कौटुंबिक सुख वाढविण्यास मुख्य उपाय म्हटला म्हणजे शिक्षणाचा प्रसार हा होय. आणि हा शिक्षणाचा प्रसार पुरुषामध्येंच फक्त नव्हे तर स्त्रियांमध्येंहि झाला पाहिजे. शिक्षणामुळें मतभेद किंवा भांडणें आणि त्यामुळें असुख मुळींच उत्पन्न होत नाहीं असें नाहीं. पण सुशिक्षित मनुष्याचें मन विकास पावलेलें असल्यामुळें दुसऱ्या मनुष्याचें म्हणणें काय आहे, त्यांत त्याच्या दृष्टीनें कां होईना तथ्यांश कांहीं आहे कीं नाहीं, हें त्याला समजून येतें. व तदनंतर सामोपचाराचा कांहीं मार्ग निघणें शक्य आहे कीं नाहीं या गोष्टीचा तो विचार करतो. पण अशिक्षित माणसाला कल्पनाशक्तीची उणीव असल्यामुळें दुसरा मनुष्य कोणत्या दृष्टि-कोनानें एखाद्या गोष्टीकडे पहात आहे हेंच त्याला कळत नाहीं. तो एवढेंच घेऊन बसतो कीं आपलें म्हणणें खरें व दुसऱ्याचें चुकीचें. यामुळें अशा मनुष्याचें त्याच्याशीं मतभेद असणाऱ्याशीं पटणें कधींच शक्य होत नाहीं. वर दर्शवि-लेल्या दोन जोडप्यांचें असेंच झालें. विनायकराव व सरस्वती यांचें बोलणें व कृति यांमध्यें कांहीं चांगलेपणा असेल अशी कल्पनाहि या दोन जोडप्यांना झाली नाहीं. याचें कारण त्यांचा अशिक्षितपणा हाच होय.

देशमुखांच्या कुटुंबाची धुळदाण व्हावयास दुसरी जी गोष्ट कारणीभूत झाली ती हिंदुसमाजांतील संयुक्त कुटुंब पद्धति व तिजविषयीं कित्येकांना वाटणारें फाजील प्रेम ही होय. आपले तीन मुलगे व तीन सुना यांचे एका घरांत संयुक्त राहून पटणार नाहीं असें कळल्याबरोबर जर वृद्ध जनार्दनपंतांनीं आपल्या इस्टेटीची विभागणी करून मुलांची तीन निरनिराळीं बिऱ्हाडें करून दिलीं असती तर या तीन भावांमधील भांडणांस अवसरच राहिला नसता व म्हाताऱ्याला जें दुःखांत मरण आलें तें टळून जनार्दनपंतांनीं आपली

इहलोकीची यात्रा सुखानें संपविली असती. पण जनार्दनपंत संयुक्त कुटुंब पद्धतीच्या आपल्या फाजील प्रेमास बळी पडले. आपल्या वडील दोन मुलांनीं विभक्त होण्याची इच्छा दर्शवितांच त्यांना 'हरामखोर' ( पृ ३१ ) या विशे-षणानें संबोधण्यास जनार्दनपंतांनीं कमी केलें नाहीं. आपल्या हयातींत मुलें विभक्त झाली कीं आपली अब्रू गेली असें त्यांच्या मनास वाटलें. घरांत किती का भांडणें होईनात पण बाहेर मात्र आपण एकत्र आहोंत असा देखावा केला पाहिजे, नाहींतर आपली अब्रू जाईल असें समजणारांपैकीं जनार्दनपंत होते. ज्या परिस्थितींत ते वाढले होते आणि जें शिक्षण त्यांना मिळालें होतें त्या दृष्टीनें पहातां त्यांना तसें वाटणें अस्वाभाविक नव्हतें हें जितकें खरें तितकेंच त्यांच्या या वाटण्यामुळेंच त्यांच्या कुटुंबावर आपत्ति कोसळली व त्यांच्या आवडत्या सरस्वतीला छळ सोसावा लागला हेंहि खरें आहे.

वस्तुतः सध्यांच्या व्यक्तिप्रधान काळामध्यें अविभक्त कुटुंबपद्धति ही एक प्रकारची ॲनॅक्रॉनिझमूच आहे. अविभक्त कुटुंब पद्धति यशस्वी होण्यास कुटुंबांतील कर्त्या व न कर्त्या किंवा मिळवित्या व न मिळवित्या या दोन्ही प्रकारच्या पुरुषांमध्यें जो एक प्रकारचा अद्वितीय व म्हणूनच असुलभ स्वार्थ-त्याग असावा लागतो तो सध्यांच्या काळीं क्वचितच दिसून येतो. शिवाय निरनिराळया कुटुंबांतून येणाऱ्या व विवाहसंबंधानें एकत्र राहण्याची आवश्य-कता ज्यांना प्राप्त झाली आहे अशा स्त्रियांचा प्रश्न निराळा उत्पन्न होतोच. विवाह झाल्यावर स्वतंत्रपणें स्वतःच्या कर्तबगारीवर संसार थाटण्याची इच्छा प्रत्येक स्त्रीला होणें स्वाभाविक आहे. अविभक्त कुटुंब पद्धतीनें अशा स्त्रियांच्या कर्तबगारीस वाव मिळत नाहीं व त्यामुळें त्यांची कुचंबणा होते. याचा परिणाम असा होतो कीं घरांत असमाधान उत्पन्न होऊन धुसफुस सुरू होते व शेवटीं सर्वांचें भांडणांत पर्यवसान होऊन त्यामुळें विभक्त होणें अपरिहार्य ठरतें. पण प्रथमतःच एकमेकांबद्दल आदर व प्रेम वाटत आहे अशा काळांत परिस्थितीचा बदललेला प्रवाह ओळखून जर भाऊ भाऊ विभक्त होतील व स्वतंत्र रीतीनें संसार करूं लागतील तर सर्वांनाच जास्त सुखसमाधान मिळेल यांत शंका नाहीं. सूक्ष्म दृष्टीनें समाजाचें निरीक्षण केल्यास आपणांस असें आढळून येईल कीं दोन चार भाऊ आपल्या बायकांमुलांसह एके ठिकाणीं कोणत्याहि प्रकारची धुसपुस किंवा कुरकुर न करितां गुण्यागोविंदानें रहात आहेत अशीं कुटुंबें फारच विरळा. आधुनिक सांपत्तिक परिस्थितिहि एकत्र कुटुंब पद्धतीच्या

विरुद्धच आहे. कारण साधारणतः कुटुंबांतील प्रत्येक पुरुषास द्रव्यार्जन करण्याची आवश्यकता भासते व त्या निमित्तानें त्याला मूळ गांव सोडून दुसरीकडे जाणें प्राप्त होतें अशा रीतीनें सर्वच भाऊ निरनिराळ्या ठिकाणीं राहूं लागल्यास एका अविभक्त कुटुंबाची साहजिक रीत्याच अनेक विभक्त कुटुंबें होतात. 'सरस्वती' कादंबरी म्हणजे अविभक्त राहणीमुळें कुटुंबांत असमाधान व असुख कसें उत्पन्न होतें व शेवटीं तटे बखेडे होऊन कुटुंबावर कोणत्या आपत्ति ओढवतात याचें एक परिणामकारक चित्र च आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

'सरस्वती'मध्यें दाखविलेलें हिंदु समाजाचें चित्र कुशलतेनें रंगविलें असून त्यावरून लेखकाच्या सूक्ष्म अवलोकनाची साक्ष पटते. जनार्दनपंत देशमुखांच्या तीन सुनांपैकीं सरस्वती ही सर्वांत लहान व थोडी फार शिकलेली. या कारणामुळें आपल्या वडील अशिक्षित जावांकडून तिला जी टीका व जे बोलणें सहन करावें लागलें तसा प्रकार अद्यापिहि कांहीं कुटुंबांत दृष्टीस पडतो. कॉलेजांत शिकत असलेल्या नवऱ्यानें एकत्र कुटुंबांत घरीं रहात असलेल्या पत्नीला पत्रें पाठविणें हें अजूनहि कांहीं कुटुंबांत 'विलक्षणच' ( पृ. १० ) समजलें जातें. फावल्या वेळांत एखादी सून पुस्तकें वाचूं लागली किंवा कांहीं लिहूं लागली, अथवा आपला पोषाख व एकंदर राहणी यांत टापटीप, व्यवस्थितपणा व स्वच्छता ठेऊं लागली तर सध्यांच्या काळीं देखील अशिक्षित जावा किंवा सासू यांजकडून तिला बोलणीं सहन करावीं लागलेलीं कोठें कोठें दृष्टीस पडतात. साराश, सरस्वतीला तिच्या जावांकडून झालेला जाच आधुनिक सुनांनाहि कमीअधिक प्रमाणांत सहन करावा लागतो ही गोष्ट समाजाचें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्याच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं.

'सरस्वती' कादबरीवर असा एक आक्षेप येण्याचा संभव आहे कीं या कादंबरींत वर्णिलेली समाजस्थिति सध्यां पालटलेली आहे व त्यामुळें 'सरस्वती'ला आधुनिक हिंदुसमाजाचें यथार्थ चित्र म्हणतां येणार नाहीं. येथें हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं अशा प्रकारचा आक्षेप प्रायः सर्वच समाजस्थितिदर्शक कादंबऱ्यांना लागूं पडण्यासारखा असतो. कारण अनेक कारणांमुळें हिंदु समाज हळुहळू पालटत असून त्याची रचना पाश्चात्य समाजाच्या धर्तीवर होत आहे. उदाहरणार्थ, "बायका माणसांना इतकं लिहिणं वाचणं शिकून फायदा काय ? आपल्याला कांहीं खतं पत्रं लिहावयाचीं नाहींत, कीं नोकरी चाकरीहि करायला जायचं नाहीं—" (पृ. १३) अशा प्रकारची स्त्रीशिक्षणविषयक कल्पना

हल्लीं फारच थोड्या स्त्रियांत आढळून येईल. तथापि हिंदु लोक पुराणप्रिय असल्यामुळें समाजामध्यें पडत असलेल्या फरकाची गति बरीच मंद आहे. म्हणून 'सरस्वती' हें आधुनिक हिंदु समाजाचें यथार्थ चित्र नाहींच असें खात्रीनें म्हणतां यावयाचें नाहीं. वर आम्हीं दाखविलें आहेच कीं सरस्वतीला जो जाच सहन करावा लागला असें या कादंबरींत दाखविलें आहे तसा किंवा तशा प्रकारचा जाच सध्यांच्या काळांतहि कित्येक कुटुंबांत सुनांना सहन करावा लागतो. दुसरी गोष्ट अशी कीं ज्यावेळीं हिंदु समाज पालटल्यामुळें 'सरस्वती' हें आधुनिक–समाज–स्थिति–दर्शक नाही असें आपण म्हणतों त्यावेळीं आपल्या डोळ्यापुढें फक्त मुंबई–पुण्याकडील सुशिक्षित समाजच असतो. या समाजावरून दृष्टि काढून जर ती आपण लहान लहान शहरांतील किंवा खेड्यापाड्यांतील समाजाकडे वळविली तर 'सरस्वतीं'त वर्णिलेल्या समाजांहून सध्यांचा समाज थोडातरी निराळा झाला आहे कीं नाहीं याविषयी कित्येक वेळां शंका आल्यावांचून रहात नाहीं समाईक इस्टेटीपैकीं कांहीं भाग एकट्या आपणांस मिळावा, त्याचें वाटप होऊं नये, यासाठीं संयुक्त अवस्थेमध्येंच तो दुसऱ्या सहभागीदारापासून लपवून ठेवावयाची जी क्लृप्ति 'सरस्वतीं'त विठ्ठलरावांनीं उपयोगिल्याचें दर्शविलें आहे तसे याकाळी आपल्या समाजांत घडत नाहींच असें म्हणतां यावयाचें नाहीं सारांश, इ स. १९०० मध्यें 'सरस्वती'ची प्रथमावृत्ति निघाल्यापासून आज जरीं ३२ वर्षांचा काळ लोटला असला तरी त्या वेळेचा समाज व आजचा समाज यामध्यें विशेष अतर पडलेलें नसल्यामुळें 'सरस्वती'ची गोडी कमी झालेली नाहीं.

'सरस्वती'च्या लोकप्रियतेचा उल्लेख वर आला आहेच. आमच्या मतें या लोकप्रियतेचें कारण हेंच कीं 'सरस्वती' हें एक समाजाचें यथार्थ चित्र आहे. 'सरस्वतीं'त रोमॅन्स् नाहीं किंवा प्रेमविलासहि नाहीं. यामुळें कित्येकांना ही कादंबरी नीरस वाटण्याचा संभव आहे. पण तसें म्हटलें तर 'पण लक्षांत कोण घेतो ?' मध्यें तरी कुठें आहे. रोमॅन्स् किंवा प्रेमविलास ? तरी देखील ती कादंबरी अजूनहि लोकप्रिय आहेच कीं नाहीं ? 'सरस्वती'च्या लोकप्रियतेचें कारणहि कांहीं अशीं तसेंच आहे. समाज पालटला तरी समाजाच्या पूर्वीच्या स्थितीचें चित्र म्हणून सामाजिक कादंबऱ्या नेहमींच चित्ताकर्षक असतात. 'सरस्वती'मध्यें रोमॅन्स् किंवा प्रेमविलास नाहीं यामुळेंच कदाचित् मुंबई युनिव्हर्सिटीला हायस्कुलांतील विद्यार्थ्यांना अभ्यासण्यास ही कादंबरी

योग्य आहे असें वाटलें असेल. कांहीं असलें तरी विद्यार्थ्यांना वाचण्यालायक ही कादंबरी आहे यांत शंका नाहीं.

आणि 'सरस्वती'च्या भाषेकडे पाहिल्यास याच मताला पुष्टि मिळते. कुळकर्णी यांची भाषा साधी, सुबोध आणि सरळ आहे. 'सरस्वती' वाचतांना भाषेमुळें अडखळल्यासारखे कोठेंच वाटत नाहीं. पाल्हाळिक वर्णनें किंवा कंटाळवाणे संवाद कोठें हि सांपडत नाहींत. 'वृंदावन सोडून मथुरेला गेलं की, पुनः वृंदावनाची आठवण राहते कुणाला?' (पृ २१) 'जाऊ दे बाई! आपल्याला नकोत त्या गोष्टी नाहींतर आणखी लंकाकांड व्हायच!' (पृ २५) आणि 'विदुराच्या घरच्या कण्या' (पृ ९८) या तीन ठिकाणीं पौराणिक उल्लेख आलेले आहेत. ते शिक्षकांनीं विद्यार्थ्यांना समजाऊन सांगितले पाहिजेत.

श्रीयुत कुळकर्णी यानीं सुभाषितांसारखी वाक्ये या कादंबरींत बऱ्याच ठिकाणीं घातलीं आहेत त्याकडे वाचकाचें लक्ष्य वेधल्यास तें अप्रासंगिक होणार नाहीं. त्यापैकीं खालील विचारणीय आहेत. 'अग, स्त्रियांचं असच आहे हो! पति जवळ असले तरच त्यांचं तारुण्य, आणि तेच दूर गेले म्हणजे त्या तरुण असल्या तरी त्यांना वृद्धावस्थाच प्राप्त होते, समजलीस!' (पृ.२१-२२), 'या जगांत सुख-दुःखें नेहमीं मिश्रित असतात, केवळ सुखाचें किंवा केवळ दुःखाचेंच साम्राज्य कोठेंहि आढळावयाचें नाहीं.' (पृ. २८), 'बायका म्हणजे मेणाच्या बाहुल्या आहेत; त्यांना चांगला किंवा वाईट आकार देणें हे त्याच्या नवऱ्यांच्या बुद्धीवर आहे. (पृ ३०), 'ज्याच्या अंगीं जो विषय समजून घेण्याची पात्रता नाहीं, त्याच्याशीं त्या विषयावर वाद घालीत बसणें म्हणजेच प्रथम चूक आहे. तुझ्या जावांच्या अंगीं जर शिक्षणाचें महत्व आणि त्याचप्रमाणें स्वच्छतेची आवश्यकता समजून घेण्याची शक्ति असती, तर मग त्या तुझी अशी थट्टा करत्या ना. उलट, त्याहि तुझ्याप्रमाणेंच वागण्यास झटल्या. तेव्हां हा कांहीं त्यांचा दोष नाहीं, तर तो त्यांच्या अज्ञानाचाच दोष आहे.' (पृ ३७), 'दुसऱ्याचा उत्कर्ष दृष्टीस पडला कीं, कित्येक मनुष्याच्या अंगाला अगदीं आग लागत असते.' (पृ. ३९), 'जो दुसऱ्याला खाड्यांत घालण्याची मसलत करील, तो आज म्हणा किंवा आणखी चार दिवसांनीं म्हणा, पण स्वतः खाड्यांत पडल्याविना रहावयाचा नाहीं. (पृ. ४९), 'विनू, तूं पक्के लक्ष्यांत ठेव कीं, ज्या घरात बायकांनीं मर्यादा सोडली, त्या घरांतून लक्ष्मीचें ठाणें उठलेंच! बायका आपली मर्यादा धरून राहिल्या म्हणजे त्या खरोखर या

संसारांतील देवता आहेत; परंतु तीच कां त्यांनीं एकदां मर्यादा सोडली, म्हणजे त्या कधीं अधोगतीला जातील, कांहीं सांगतां येणार नाहीं. मग त्या पिशाचापेक्षांहि पिशाच्चें होतात.' ( पृ. ४९ ), 'आईबापांचें दुःख जर दूर करतां आलें नाहीं तर युनिव्हर्सिटीच्या असतील नसतील त्या सर्व परीक्षा देऊन तरी काय भूषण मिळणार आहे ?' ( पृ. ७२ ), 'संसार म्हणजे मनुष्याच्या परीक्षेचें ठिकाण आहे. या परीक्षेच्या कसोटीला आम्ही कसे काय उतरतों, हें पाहण्यासाठींच जगदीश्वर आम्हाला या संसारांत घालीत असतो.' ( पृ. ८५ ).

शेवटीं अशी आशा प्रकट करतों कीं 'सरस्वती'च्या अभ्यासकांना या प्रस्तावनेचा कांहीं तरी उपयोग होईल.

महाराजा बिल्डिंग<br>
मुंबई नं. ४<br>
ता. २० मार्च १९३३

अ. बा. गजेंद्रगडकर

# सरस्वती

## प्रकरण पहिलें

## तिघी जावा

वैशाखाचा महिना. ऊन्ह कडक पडलें आहे. तिसरा प्रहर टळून गेला आहे. अशा वेळीं जनार्दनपंत देशमुखांच्या घरात दुसऱ्या मजल्यावरील एका खोली-मध्ये सुमारें पचवीस वर्षांची एक तरुण स्त्री कांहीं शिवणकाम करीत बसली होती. थोड्या वेळानें आणखी एक तरुणी तिच्याजवळ आली आणि घाईघाईनें म्हणाली "जाऊबाई, अशानं मेलं होणार तरी कस! स्वयंपाकाला आज कोण लागणार ?"

"इतक्या घाईवर कां आलां पण अनपूर्णाबाई! अझून मेला किती तरी अवकाश आहे! हो, पण आज बाई मामंजी लवकर यायचे आहेत घरीं, तेव्हां अमळ लवकर आटोपलेलंच बरं—"

असें म्हणून जाऊबाईनीं हातातील शिवणकाम लागलेंच बांधून ठेविलें आणि अन्नपूर्णाबाईच्या तोंडाकडे किंचित्काल टक लावून पहात त्या म्हणाल्या "हो, बरी आठवण झाली! अन्नपूर्णाबाई, बरेच दिवस तुम्हांला कांहीं सांगायचं आहे; पण ऐकाल का काहीं सांगितलं तर—"

"काय, काय सांगायचं आहे जाऊबाई?" अन्नपूर्णाबाईनीं उत्सुकतेनें विचारिलें.

जाऊबाई अन्नपूर्णाबाईच्या अगदींच जवळ होत्या; तरी देखील त्या अगदीं हलक्या आवाजाने म्हणाल्या "अनपूर्णाबाई, मेलं सांगायचं तें आणखी काय असणार? तुम्हाला माहीत नाहीं असं थोडंच आहे! अहो, या घरात इतकं मरमरून काम करावं, पण कांहीं चीज आहे का? आम्हाला मेलं धारजिणंच नाहीं. काम करायला आम्ही अन् त्याबद्दल नांव व्हायचं तें मात्र धाकट्या सूनबाईचं! तेव्हां, हा आपला एकमेकांच्या दैवाचाच गुण, नाहीं का?"

"खरोखरच, दैवाचा गुण नि दुसरं काय! आमच्या हातून मेलं कोणतंहि काम धड होतच नाहीं! नाहीं तर आमचं म्हणजे कांहीं आजच म्हातारपण झालं आहे, किंवा आम्हाला एखादं काम करतां येत नाहीं, असं थोडंच आहे!

पण आपलं पहावं तर एखाद्याच्या हाताला यशच नसतं. जाऊबाई, माझ्या हाताला जर देवानं यश ठेविलं असतं, तर अशा तीन संसारांचीं कामं मीं एकटीन केलीं असतीं!"

अन्नपूर्णाबाईचें हें बोलणें ऐकून जाऊबाईंना अर्थातच आनंद झाला. त्या म्हणाल्या "तें जाऊं द्या हो! पण याला किनई, कांहींतरी इलाज केला पाहिजे. कांहींना कांहीं करून या सरस्वतीच्या नांग्या मोडल्याच पाहिजेत. खरंच सांगत्ये अनपूर्णाबाई, असं केल्याशिवाय आपला आतां बोज रहायचा नाहीं या घरात!"

"माझ्याहि मनातून किती दिवस तरी ही गोष्ट तुमच्याजवळ काढायची होती; पण कीं नाहीं जाऊबाई, धीरच होत नसे. आज आता तुम्हीच गोष्ट काढलीत, तें बरं झालं. केव्हापासून मी पहात्यें आहें, ज्या त्या गोष्टीत आपला तिचा दिमाख आहेच! तिचा नवरा मुंबईस असतो, त्या मेल्या कालीजात कीं फालीजात शिकतो, ही काय ती सारी घमेंड! पण एवढ्यानं बाईसाहेबाना जसं काहीं अस्मान ठेंगणं--"

"अहो हेंच काय," जाऊबाई मध्येंच म्हणाल्या "बाईसाहेबांचा थाट जो कांहीं आहे, तो पाहून तर हंसूच येतं! चोळया, लुगडीं नीट चापचोपून धुतलेलीं असल्याविना मनास येतच नाहींत, बिछान्यावरचा पलंगपोस किंचित् मळका असला तर बाईसाहेबाना झोंप येत नाहीं! हे मेलं घटकाभर राहो, पण अनपूर्णाबाई, आठवड्याच्या आठवड्याला पतिराजाकडून पत्रं येत असतात, ते नाहीं का तुम्हांला माहीत? काय मेलं एकेक ऐकावं ते विलक्षणच—"

"आपण नाहीं कधी पाहिले असले हे हिजड्यासारखे चाळे! बरं पण का हो जाऊबाई, हिच्या नांग्या ठेचायला मिळणार कशा? मामंजी काय नी सासूबाई काय, दोघहि नेहमीं आपला तिचीच बाजू घेऊन उठतात!"

जाऊबाई आपल्या भिवया किंचित् वक्र करून हात नाचवीत म्हणाल्या "अ.! त्यांची काय मोठी पर्वा लागली आहे! तुम्हीं मात्रं एका. सरस्वतीची स्वयंपाक करायची पाळी असली, म्हणजे तिनं केलेल्या आमटीत हळूच थोडं मीठ टाकलं, भातात थोडीशी वाळू टाकली, म्हणजे आपोआप तिचा सुग्रणपणा सगळ्याना दिसेल."

"हेंच काय, पण उद्यां तिला आपलं लुगडं धुऊन वाळत घालूं द्या, मी तें केव्हांच टरकवून टाकत्ये—"

"अहो, अशा आणखी कितीतरी युक्त्या आहेत. जशास तसं भेटल्या-वांचून मनांतला संशय फिटत नाहीं! वांकड्याशीं वाकडं झाल्याविना का माण-साचा निभाव लागायचा आहे? तेव्हां अनपूर्णाबाई, बोला, आहे का तुमची तयारी?"

"अहो, आहे म्हणून काय विचारता जाऊबाई? पण किनई, या कामी तुम्हाला पुढाकार घेतला पाहिजे, नाहींतर माझी बुद्धि म्हणजे काय विचारता!"

इतकें बोलून अन्नपूर्णाबाई गालांतल्या गालांत खुदकन् हंसल्या. नंतर जाऊ-बाईकडे पाहून म्हणतात "नाहीं हो जाऊबाई, मी आपली किनई--खरच सागत्ये, माझ्या अगात तेवढं हें-नाहीं—"

"जाऊं द्या हो! तुम्ही आपलं मी सागेन तसं ऐका, म्हणजे झाल. पण एक गोष्ट मात्र लक्ष्यांत ठेवा, कीं, यांतलं अक्षरहि बाहेर फुटता कामा नये. घरात जर का कुणाला हें समजलं, तर मग कांहीं तोंड काढायला जागा रहा-यची नाहीं."

इतक्यांत जिन्यातून कोणी वर येत असल्याचा जाऊबाईना भास झाला. त्याबरोबर त्या एकदम थाबल्या आणि थोडा वेळ कानोसा घेतल्यासारखं करून "हं! गप्प रहा-ती पहा वर येत आहे-" असें अन्नपूर्णाबाईच्या कानात कुसफुसल्या. नंतर तेथून उठून त्या खोलीच्या खिडकीशी जाऊन उभ्या राहिल्या आणि आपले केश सोडून ते पुन्हा बांधण्यात निमग्न झाल्या. अन्नपूर्णाबाईकडे त्याचें जणूं लक्ष्यच नव्हतें.

अन्नपूर्णाबाईहि जिन्याकडे टवकारून पाहूं लागल्या. थोड्याच वेळात पंधरा-सोळा वर्षांची एक सुस्वरूप मुलगी कडेवर दोन वर्षांच्या एका मुलाला घेऊन गालातल्या गालात हसतहसत खोलीच्या दरवाज्यात शिरली आणि मंजुळ, मधुर स्वरानें म्हणाली 'हा बघ आई इथ आहे! आई, आई, करून आपला एकसारखा रडत सुटला-काहीं केल्या उगा राहिना-याला कडेवर घेऊन मी खालीं सगळं घर शोधलं आणि शेवटीं माडीवर आल्ये." असें बोलून तिनें स्नेहभरानें मुलाचे दोनतीन गोड मुके घेतले.

केश बांधण्याचें काम पुरें करून जाऊबाइ तिच्याकडे वळून म्हणाल्या "बेश केलंत हो सरस्वतीबाइ! चोळी शिवायला घेतली होती, पण उशीर झाला म्हणून तशीच बांधून ठेवून आम्ही आता खालीं येणार होतो, इतक्यांत याला तुम्हींच वर आणलंत, बरं झालं—"

इतकें बोलून जाऊबाईनीं मुलाला पाजण्यासाठीं मांडीवर घेतलें. अन्नपूर्णाबाईहि स्तब्ध उभ्या राहिल्या होत्या. कोणीच कांहीं बोलेना. हें पाहून कांहीं वेळानें शेवटीं सरस्वतीच खिन्न स्वरानें म्हणाली "मी आल्यें म्हणून तुम्हीं गोष्टी बंद का केल्यात जाऊबाई? मी आपली जात्यें हवी तर—"

" छे, छे! जाण्याचं हो काय कारण? मला कांहीं इनाम दिली नाहीं कुणी खोली ही!" जाऊबाई जरा कुऱ्यानेंच बोलल्या.

बिचारी सरस्वती या भाषणानें किंचित् कष्टी झाली. ती म्हणाली "जाऊबाई, हें काय भलतंच बोलण हे? मजकडून काहीं तुमचा अपराध का झाला आहे? असेल तर मला सांगा, मी तुमची क्षमा मागत्यें हवी तर. पण तुम्ही मला अशी परक्यासारखी वागवूं नका. मी या घरांत अद्यापि नवीच आहें म्हणायची; कामकाजासंबंधीं मला चांगलीशी माहितीहि नाहीं. तेव्हा तुम्ही मला एखादी गोष्ट शिकवाल तर नाहीं का मी शिकणार? मी कीं नाहीं तुमच्यापैकींच आहें. तुमच्यांत मिळून मिसळून रहायची मला भारी हौस आहे—"

धाकट्या जाऊच्या या मिनतवारीनें त्या दोघींपैकीं एकीचेंहि मन द्रवलें नाहीं. जाऊबाई आपल्या नेहमींच्या कर्कश स्वरानें म्हणाल्या "भलतंच एखादं! तुम्ही हो बाई कशा आमच्यापैकीं व्हाल! तुमचे यजमान कालीजांत शिकत आहेत–तुम्ही स्वतःहि शिकल्यासवरलेल्या–लांबलांब पत्रं तुम्हांला लिहितां येतात—"

अन्नपूर्णाबाईनींहि हा सुयोग वायां जाऊं दिला नाहीं. त्या मध्येंच मोठ्या तोऱ्यानें म्हणाल्या "आम्ही हो तुम्हाला काय शिकवणार? तुम्हींच उलट आमचे कान उपटले पाहिजेत! आम्हांला पाढऱ्यावर काळे तरी करायचं ठाऊक आहे, कीं, तुमच्यासारखं छकपक रहायचं ठाऊक आहे! अहो, आमचं काय— म्हणतात ना 'धडांत ना धाकडांत' त्यांतली गत!"

बिचाऱ्या सरस्वतीच्या मनाला फारच दुःख झालें. ती म्हणाली "कां बरं माझी थट्टा करतां अशी जाऊबाई?"

हें ऐकून अन्नपूर्णाबाई आपल्या वडील जाऊकडे पाहून म्हणतात, "ऐकलंत का जाऊबाई? ही थट्टाच बरं का सारी! सरस्वतीबाई, तुमच्याशीं कसं बोलावं, कसं वागावं, हें तरी आमच्यासारख्या गांवढळ मनुष्यांना कुठून कळणार? त्यांतून आम्हीं कांहीं पोथ्यापुस्तकंहि वाचलीं नाहींत!"

जाऊबाईनींहि अन्नपूर्णाबाईच्या बोलण्याला दुजोरा दिला. त्या मध्येंच म्हणाल्या "सरस्वतीबाई, यांत हो कसली थट्टा आली आहे? बरं तें राहूं द्या; तुम्हांला राग येणार नाहीं, तर मी कांहीं विचा—"

"खुशाल विचारा जाऊबाई! तुमच्या बोलण्याचा हो मला का राग येईल? माझ्या बऱ्याकरिता तुम्ही मला एखादी गोष्ट विचाराल—त्याचा मी राग करूं?"

"अगबाई, खरंच कीं काय! तर मग सांगा पाहूं, बायकामाणसांना इतकं लिहिणं वाचणं शिकून फायदा काय? आपल्याला कांहीं खतंपत्रं ल्याह्यचीं नाहींत, कीं नोकरीचाकरीहि करायला जायचं नाहीं—"

"किंवा शाळा उघडून पोरंहि पण हांकायचीं नाहींत!" अन्नपूर्णाबाईनींहि मध्येंच टोमणा दिला.

सरस्वतीनें एक सुस्कारा सोडला आणि सरलवृत्तीनें ती म्हणाली "त्यांत नफानुकसान काय आहे, हें कांहीं मला समजत नाहीं. पण 'वेळ मिळेल तेव्हां एखादं दुसरं पान वाचीत जा,' असं सांगणं झालं आहे; आणि खरंच विचाराल कीं नाहीं जाऊबाई, तर मला दिखील यांत कांहीं एक वावगं दिसत नाहीं—"

"अहो, वावग आहे नी नाहीं, हें ज्याच्या त्याच्या समजावर आहे. तीं मेलीं पुस्तक वाचण्यांत वेळ घालवायचा, तोच जर घरातील कामकाज पहाण्याकडे घालविला, तर चांगलं नाहीं का होणार?"

"पण जाऊबाई, कामाच्या वेळीं तर नाहीं ना मी कधीं पुस्तक घेऊन बसत? दोन प्रहरच्या फुरसतीच्या वेळीं, नाहीं तर रात्रीं सगळींजणं झोंपीं गेल्यावर मन लागलं तर कुठं एखाददुसरं पान वाचत्यें."

जाऊबाई यावर उडवाउडवी करून म्हणाल्या "तुमचं आपलं भलतंच कांहीं तरी! किती सांगितलं तरी तुमचं आपलं आहे तें आहेच! सरस्वतीबाई, अस पहा रात्रीं दिवे जाळून तुम्ही पुस्तकं वाचतां, त्या दिव्याला जें तेल खपतं तें नुकसान नाहीं वाटत? पैसे दिल्याविना तर तेल नाहीं ना येत? अहो, घरखटला चालवायचा, म्हणजे सगळीकडे लक्ष्य ठेवावं लागतं. प्रत्येक वस्तूची जर अशी उधळपट्टी चालविली, तर दोन पैसे जवळ रहाणार कसे?"

"बरं तर जाऊबाई, आजपासून दिवा जाळून मी कधींच वाचीत बसणार नाहीं, तुम्ही सांगाल तशी वागेन, मग तर झाल ना? पण जाऊबाई, मी तुमच्या पायां पडून सांगत्यें. तुम्ही मजवर अशा रागावूं नका. तुम्ही रागावला म्हणजे बाई मला भारी वाईट वाटतं."

अन्नपूर्णाबाई यावर कांहीं बोलणार होत्या, इतक्यांत खालून "सरस्वती–अग सरस्वती! अग तुम्ही सगळ्याजणी गेलां तरी कुठं?' हे शब्द त्यांच्या कानीं आले.

"सासूबाई हाक मारताहेत," असें म्हणून सरस्वती तत्काळ खोलींतून बाहेर पडली आणि लवकर लवकर जिना उतरून खालीं गेली. ही संधि पाहून जाऊबाई अन्नपूर्णाबाईला ह्मणाल्या "ऐकलंत अनपूर्णाबाई, कशा आहेत मांजा! इकडे विचारायचं 'तुम्ही सगळयाजणी गेला तरी कुठं!' पण नांव घ्यायचं तें मात्र सरस्वतीच! आम्ही ह्मणजे या घरात कुणाच्या खिसगणतींतच नाहीं!"

यानंतर बराच वेळपर्यंत दोघी जावा कांहीं खलबत करीत बसल्या होत्या. शेवटी अगदी तिन्हीसांजा झाल्या, तेव्हां दोघी बरोबरच हळुहळू खालीं उतरल्या.

---

प्रकरण दुसरें

## देशमुखांचें कुटुंब

जनार्दनपंत देशमुखांच्या वयाला यावेळी पन्नासांपेक्षांहि अधिक वर्षे लोटलीं असतील. गेलीं पंचवीस सव्वीस वर्षे जनार्दनपंत एका व्यापाऱ्याजवळ नोकरीस होते. त्यांच्या गांवापासून दुसरें दीड कोसावर एक चांगलें बंदराचें ठिकाण होतें, तेथें त्यांच्या यजमानांची मुख्य पेढी होती. या पेढीवर जनार्दनपंतांच्या हाताखाली आणखी चारपाच कारकून होते. जनार्दनपंत जात्या सुशील आणि सत्त्वस्थ असून पराकाष्ठेचे प्रामाणिक होते. आपल्या यजमानाच्या हिताविषयीं ते अत्यंत दक्ष असत. त्यांच्या या सद्गुणांचा त्यांच्या यजमानाला वेळोवेळी चांगलाच अनुभव आला असल्यामुळें त्यांचा देशमुखांवर पराकाष्ठेचा विश्वास आणि लोभ असे. पगाराखेरीज प्रत्येक वर्षी व्यापारांत होणाऱ्या नफ्याचा देखील काहीं नियमित अंश ते त्यांना मोठ्या आनंदानें देत असत. शिवाय, यजमानांकडे कांहीं लग्नकार्य वगैरे झालें, ह्मणजे त्याप्रसंगीं देशमुखांना आदर-पूर्वक बोलावून आणून त्यांची योग्य संभावना करण्यास ते कधींहि विसरत नसत. यजमानांच्या या थोर आणि उदार स्वभावामुळें जनार्दनपंतांना आपलें काम झटून करण्यास अधिकाधिक उल्हास येई, आणि संसार सुरळीतपणें चालवून दोन पैसे मागे टाकण्यासहि त्यांना सवड होई. अशा रीतीनें शिल्लक राहिलेले पैसे ते व्याजबट्ट्यानें लावीत असत. पंचवीस वर्षांत याप्रमाणें थोडेथोडे

करून त्यांनीं कांहीं नाहीं तरी जवळ जवळ दहा हजारांची पुंजी केली होती. याशिवाय त्यांची वडिलोपार्जित कांहीं थोडीशी स्थावर मिळकतहि होती.

देशमुखांच्या कुटुंबांत यावेळीं लहानमोठीं मिळून एकंदर तेरा चौदा मनुष्यें होतीं. स्वतः ते, त्यांची पत्नी, तीन मुलगे, तिघी सुना, दोन नातू आणि तीन नाती; शिवाय, एक गडी आणि एक मोलकरीण अशीं दोन मनुष्यें घरात कामाला होतीं, ती निराळीच. मधूनमधून पहीपाहुणेहि असावयाचेच. वडील चिरंजीव विठ्ठलराव यांच्या वयाला तीस वर्षे होऊन गेलीं होतीं. मधले गोविंदराव–याच्यापेक्षां तीन वर्षांनीं लहान; आणि कनिष्ठ चिरंजीव विनायकराव यांना नुकतें एकविसावें वर्ष लागलें होतें. जनार्दनपंत काळेसांवळे असून त्यांचा बांधा मजबूत होता. मुद्रा भव्य असून तेज.पुंज होती. त्यांची पत्नी सगुणाबाई गौरवर्ण असून नेहमीं हंसतमुख असावयाची. म्हातारीचा स्वभाव अगदीं भोळसर असून प्रेमळ असे. विठ्ठलराव आणि गोविंदराव हे रंगानें आणि शरीरानें थेट आपल्या वडिलांसारखे होते. धाकटे विनायकराव यांनीं वडिलांचा सुदृढ बांधा आणि आईचा गौरवर्ण उचलला होता. वडील सून भागीरथीबाई पंचवीस वर्षांची होती. तीन मुलांची ती आई झाली होती, परंतु तिच्या शरीराचा बांधा असा कांहीं निकोप होता कीं, पहाणाराला तिचें वय एकोणीस वीस वर्षांपेक्षां अधिक नसावें, असा भ्रम होई. ती म्हणण्यासारखी गोरी नव्हती. मधली सून अन्नपूर्णाबाई ही एकोणीस वर्षांची असून तिला दोन मुलें होतीं. ती आपली काळी सांवळीच होती, परंतु कुरूप मात्र नव्हती. किंबहुना तिचा तो सुंदर चेहरा, पाणीदार डोळे आणि पाठीवर लोळणारे लांबचलांब विपुल केश पाहून तिची गणना कोणींहि रूपवान स्त्रियांतच केली असती. सर्वांत धाकटी सून सरस्वती, ही यावेळीं केवळ पंधरा वर्षांची होती. तिच्या सुकुमार शरीरावर नुक्तासा कोठें तारुण्याचा अंमल बसत होता. तिची मुद्रा उज्वल, तेजःपुंज, मनोहर आणि सरलतापूर्ण होती. डोळे काळेभोर असून तेजस्वी आणि पाणीदार होते. केश कुरळ असून अगदीं काळेभोर होते आणि ते तिच्या मस्तकाला फारच शोभा देत. तिचे एकंदर अवयव अगदीं जेथल्या तेथें रेखल्यासारखे असून गोंडस होते. ईश्वरानें तिला खरोखरच अलौकिक सौंदर्य दिलें होतें, असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. विठ्ठलरावांची मोठी मुलगी कृष्णी ही आठ वर्षांची होती. हिच्या पाठचे हरि आणि रामू. हरि पांच वर्षांचा

आणि धाकटा रामू अवघा दोन वर्षांचा होता. गोविंदरावांना दोन मुलीच होत्या. मोठी मुलगी बारू चार वर्षांची असून गंगूला नुक्तें दीड वर्ष पुरें झालें होतें. या पांच मुलांत अधिक सुंदर कोण होतें, हें सांगणें अमळ कठीण आहे! वर्ण सगळ्यांचाच काळसावळा, तोंडवळाहि बहुतेक एकसारखाच; परंतु एवढें मात्र होतें, कीं वयाच्या मानानें पाहिलें, तर विठ्ठलरावांची मुलें बरींच अशक्त दिसत असत. बारू आणि गंगू यांची तशी गोष्ट नव्हती. गडी भिवा, देशमुखाच्याच घरांत म्हातारा झाला होता. मोलकरीण दुर्गा ही बालविधवा असून काही नाही तरी आज पंधरासतरा वर्षे या घरात होती.

जनार्दनपंताना प्रथम चाकरी लागली, तेव्हां त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव विठ्ठलराव हे पाच वर्षांचे होते. जनार्दनपंताच्या हातीं त्या वेळीं पैसा मुळीच नव्हता वडिलांनीं जें कांही थोडेबहुत ठेविलें होते, तें चाकरी मिळेपर्यंत खर्च करून त्यांनी जेमतेम कुटुंबाचा आव राखिला. अर्थात्, विठ्ठलरावांना इंग्रजी शिकविण्याचें त्याच्या हातून झालें नाही. मराठी शाळेंत देखील विठ्ठलरावांनीं पुरेशी वर्षे काढण्याचा त्रास घेतला नाही. जनार्दनपंत सवडीनुसार त्यांना घरींच शिकवीत असत; अशा रीतीनें संपादन केलेल्या शिक्षणाच्या जोरावर विठ्ठलरावानींहि तेथेच एका व्यापाऱ्याकडे दरमहा आठ रुपये पगाराची नोकरी मिळविली होती! गोविंदरावांनीं इंग्रजी शिकण्यासाठी चारपांच वर्षे मुंबईत काढून तितक्या मुदतींत पांचसहा शाळा पाहिल्या, आणि शेवटी कंटाळून तो नाद सोडून दिला. वार्षिक परीक्षा झाली, कीं यांना ती शाळा सोडावीच लागे! याप्रमाणें खटाटोप करून जेमतेम त्यानीं पांचव्या इयत्तेपर्यंत मजल मारिली होती. पुढें कर्मधर्मसंयोगानें एके दिवशीं डेप्युटीसाहेबांची स्वारी गोविंदरावांची शाळा पहाण्यास आली असता त्यांनी गोविंदरावांच्या वर्गात येऊन दुर्दैवानें त्यांनाच काहीं प्रश्न केला. गोविंदरावांनीं ताबडतोब त्या प्रश्नाचें उत्तर दिलें—परंतु तें ऐकून डेप्युटीसाहेब हंसले; इतकेच नव्हे, तर त्यांच्यादेखत वर्गातील सारी मुलें देखील मोठमोठ्यानें हंसत सुटलीं! साहेबांनीं गोविंदरावांचें नांव विचारिलें आणि जातां जातां आपल्या हातानें त्यांना तिसऱ्या इयत्तेंत नेऊन बसविलें. पांचव्या इयत्तेंतून एकदम तिसऱ्या इयत्तेंत अशी उलटी उडी मारणाऱ्या या विलक्षण स्वारीला मास्तर लोक, शाळेंतील मुलें आणि शिपाई लोक देखील आश्चर्यानें पाहूं लागले. स्वारीच्या अगाध विद्वत्तेचें सर्वांना मोठें

कौतुक वाटलें. अर्थात्, गोविंदराव मग त्या शाळेला नमस्कारहि करण्याला तेथे राहिले नाहींत. ते मुंबई सोडून तडक घरीं आले आणि वडिलांना सांगू लागले, " पुनः पुनः तींच तीं पुस्तकें वाचण्याचें काम आपल्याच्यानें साफ होत नाही !" झालें. त्या दिवसापासून त्याची विद्या पूर्ण झाली. पुढें लवकरच गांवांतल्या गांवात त्यानी एक खासगी शाळा उघडली आणि तेथें मुंबईस संपादन केलेल्या आपल्या अगाध ज्ञानाचा लाभ गांवातील लहानलहान मुलांना करून देण्याचा क्रम सुरू केला. जनार्दनपंतांचे धाकटे चिरंजीव विनायकराव हे मुंबईस एका कॉलेजांत शिकत होते. असो.

गांवांत जनार्दनपंतांचा मान फार मोठा असे. अतीतअभ्यागताचा परामर्ष घेण्यांत ते दक्ष असत. ते मोठे धर्मनिष्ठ आणि पापभीरु होते. देवाचें उत्सव, पूजा वगैरे कांहीं ना काही त्यांच्याकडे नेहमीं असावयाचेंच. चाकरी नव्हती तेव्हां देखील वडिलापासून चालत आलेले हे उत्सव वगैरे त्यांनीं करावयाचें सोडिलें नाहीं, मग आतां तर ईश्वरकृपेनें त्यांचें चांगलें चाललें होतें, मग त्यांत खंड कां पडेल ?

---

प्रकरण तिसरें

## सरस्वती आणि यमुना

आषाढाचा महिना. पावसानें अगदीं झोड घेतली होती. देशमुखांची धाकटी सून सरस्वती, रामूला जवळ घेऊन आपल्या निजावयाच्या खोलींत एक पत्र वाचीत बसली होती. रामूची दृष्टि सारखी त्या पत्राकडे लागली होती. पत्र वाचीत असतां मधूनमधून सरस्वती स्नेहभरानें रामूचे मुके घेत होती. रामूहि संधि साधून चटदिशीं त्या पत्रावर झडप घालीत होता. इतक्यांत " सरस्वती –अग सरस्वती !" अशी स्वयंपाकघरातून हांक ऐकूं आली. सरस्वतीची निजावयाची खोली तळमजल्यावरच होती. हांक ऐकूं येताच ती " आल्यें–" असें प्रत्युत्तर देऊन रामूला कडेवर घेऊन मोठ्या गडबडीनें स्वयंपाकघरांत आली आणि " कशाला हांक मारायची ?" म्हणून मोठ्या मर्यादेनें आपल्या सासूला विचारूं लागली. त्या गडबडींत पत्र तसेंच तिच्या हातांत राहिलें. सरस्वतीला त्याचें भानहि राहिलें नाहीं.

सरस्वती येतांच तिच्याकडे पाहून सगुणाबाई म्हणाल्या "अष्टौप्रहर जो त्याला कडेवर घेऊन नाचवत्येस, ती तुझी कंबर कशी दुखत नाहीं? अन् मुलाला दिखील मग तीच सवई लागते बरं!"

सरस्वती यावर कांहींएक बोलली नाहीं. रामूकडे पाहून ती गालांतल्या गालांत हंसली मात्र.

सगुणाबाई पुढें म्हणाल्या "तुझ्या आईकडून फराळचं आल्याला आज दोनतीन दिवस झाले. घरात सगळयांची वांटणी झाली, नी तूं आतांपर्यंत त्यातल कांहींएक खाल्लं नाहींस, हें काय? हें घे आणि खा पाहूं इथं बसून–' असें म्हणून सगुणाबाईनीं दोन आंबे आणि कांहीं थोडें फराळाचें एक ताटांत घालून सुनेच्या पुढें केलें.

"खाईन–मी मग खाईन–" असें म्हणून सरस्वती तेथून दूर सरूं लागली; परंतु म्हातारीनें तिला थांबवून म्हटलें "हेंच तें! मेली खाण्यासवरण्यांत लाज ती ग कसली! सरस्वती, मी खरोखर सांगत्यें, दुसऱ्या एखाद्या घरांत तूं अशानं उपाशीं राहिली असतीस हो! बैस खालीं अन् माझ्या देखत हें खा पाहूं!"

सरस्वती लाजली आणि हंसतहंसत तिनें खालीं मान घातली. तें पाहून सगुणाबाई म्हणाल्या "माझ्या देखत खायला लाज ग कसली? बरं तर हें घे आणि आपल्या खोलींत जाऊन बैस; मग तर झाल ना? पण जरा लवकर आटोप हो? माझे केस विचरायचे आहेत. जा, जा, जा, काय बाई मुलगी तरी!"

सरस्वती तें ताट घेऊन तेथून जाणार, इतक्यांत म्हातारीची नजर सहज-गत्या तिच्या हातांत असलेल्या पत्राकडे गेली. तिनें मोठ्या ममतेनें विचारलें "कुणाचं ग पत्र? विनूचं वाटतं! खुशाल आहे ना बाबा माझा?"

आतां कोठें सरस्वतीला त्या पत्राचें स्मरण झालें. लज्जेनें तिचें सुंदर मुख-कमल आरक्त होऊन कपाळावर घर्मबिंदू चमकूं लागले. तिच्या मुखावाटे मुळींच शब्द निघाला नाहीं. तिची ती अवस्था पाहून सगुणाबाईच शेवटीं म्हणाल्या "लाजतेस कशाला मुली! खुशाला आहे ना विनू?"

या वेळीं "हो–य" हीं दोनच अक्षरें आणि तीं देखील अर्धी तोंडांत तर अर्धी बाहेर अशीं सरस्वतीनें जेमतेम उच्चारलीं, आणि मग सासूसमोर उभें

रहाण्याच्या भानगडींत न पडतां तें ताट एका हातानें उचलून घेऊन ती तडक आपल्या खोलीकडे धावली. खोलींत शिरतांच सरस्वतीनें हातांतील फराळाचें ताट पलंगावर ठेविलें आणि रामूचें तोंड दोन्ही हातांनीं आपल्या समोर धरून ती त्याचे एकामागून एक मुके घेत सुटली. रामूचें लक्ष्य त्या ताटाकडे होतेंच. "मला आंबा–" म्हणून आपल्या गोड शब्दांनीं आपल्या काकीचें मन वळविण्याचा उद्योग त्यानें सुरू केला. काकीच्याहि तें तत्काळ ध्यानांत आलें.

"अरे लबाडा! आंबा खायाला पाहिजे काय? अ–हं! लहान मुलांनीं आंबे खाऊं नये बरं–" असें हंसतहंसत म्हणून ती पुनः पुनः त्याचे मुके घेऊ लागली. नंतर त्याला खालीं ठेवून तिने त्यातील एक आंबा कापला आणि त्याची एक कापटी रामूच्या हातीं दिली. एक लाडू फोडून तोहि ती त्याला मधूनमधून भरवूं लागली. इतक्यांत एकदम दरवाजा वाजला. सरस्वतीचें लक्ष्य तिकडे गेलें. तोंच एक सोळा वर्षांची तरूण सुस्वरूप स्त्री हंसत हंसत खोलींत शिरली. तिला पहातांच सरस्वतीला अत्यानंद होऊन ती प्रफुल्ल वदनानें ह्मणाली "ताई, कशी अगदीं वेळेवर आलीस पण! मी तुझीच आठवण करीत होत्यें––"

"पुरे पुरे! 'देखल्या देवा दंडवत' पुरे बरं! कां बरं, आज इतकी तहान कां लागली होती?"

ही ताई कोण, हें येथे पहिल्यानें सांगितलें पाहिजे. जनार्दनपंत देशमुखांच्या नातलगापैकींच ही एक मुलगी असून हिचें माहेरचें नांव यमुना होतें. यमुनेच्या बापाचें घर देशमुखांच्या घरापासून फार लांब नव्हतें, तरी तें अगदींच जवळहि नव्हतें. यमुनेची माहेरची स्थिति साधारण गरिबीचीच होती. सुदैवानें तिला सासर मात्र फार चांगलें मिळालें होतें. सरस्वतीच्या माहेरच्या गांवी, तिच्या बापाच्या घराशेजारींच नानासाहेब देशपांडे ह्मणून एक सधन गृहस्थ रहात असत, त्यांची ही सून. नानासाहेब पूर्वीं मोठ्या सरकारी हुद्यावर असून हल्लीं त्यांनीं पेन्शन घेतलें होतें. त्यांचा एकुलता एक मुलगा जगन्नाथ, हाच यमुनेचा नवरा होय. जगन्नाथराव आणि विनायकराव हे सहाध्यायी असून त्या उभयतांचा फार स्नेह होता. अगदीं लहानपणापासून सरस्वती त्यांना फार आवडत होती. पुढें पुढें तर सरस्वतीच्या अंगचे अनेक सद्गुण पाहून तिच्यावर त्यांचा फारच लोभ जडला. ते तिला खरोखरच अगदीं सख्ख्या बहिणी-

प्रमाणें वागवूं लागले. तेथेंच यमुनाबाईशीं सरस्वतीचा प्रथम परिचय होऊन स्नेह जमला. सरस्वतीचें माहेरचें नांव गंगू होतें. दोघी एकमेकींना नेहमीं बाळपणच्याच नांवानें हांक मारीत. यमुना जशी रूपसंपन्न होती, तशीच गुणसंपन्नहि होती; जगन्नाथरावांच्या साहाय्यानें तिनें चांगलेंच शिक्षण संपादिलें होतें पोथ्यापुस्तके वाचून त्यांचा अर्थ समजून घेतां येण्याजोगे ज्ञान तिच्या अंगीं होतें सध्या ती सासरहून माहेरीं आली होती.

" कधीं आलीस यमूताई ?" सरस्वतीनें हंसतहंसत प्रश्न केला.

" झाले तीनचार दिवस—"

" अन् इतक्या दिवसांत एकदांदिखील तुला इकडे यायला फावलं नाहीं अं ?"

" वेडी कुठली ! न फावायला ग काय झालं ! रोज येईन येईन म्हणून योकित होत्ये, पण या मेल्या पावसानं बघ कस धरणं धरलं आहे तें ! घराबाहेर पाऊल तरी टाकण्याची सोय आहे का ?" असें म्हणून यमुनेनें खिडकींतून बाहेर नजर टाकिली आणि ती पुनः म्हणाली " हें बघ गंगू ! मी बाई जात्यें आता, पाऊस उबाला आहे, तों घरी गेलेलं बरं."

" इथंच राहीनास आजचा दिवस यमूताई ? पण कायग, तिकडची सगळी मंडळी खुशाल आहेत."

" सगळी खुशाल आहेत."

" जगन्नाथदादा खुशाल आहेत ना ?"

यमुनेच्या सुंदर मुखकमलावर मधुर हास्य विलसूं लागलें. सरस्वतीचा गाल धरून " पुरे पुरे ! तें पूर्वीचंच नांव चांगलं दिसतं, समजलीस ?"

" कां ! हें गोड नाहीं लागत वाटतं ?" सरस्वतीनेंहि हंसतहंसत विचारलें.

" तसं नव्हे ग ! पण म्हटलं, आपलं नेहमींचं आहे तें काय वाईट ?"

सरस्वती पुनः हंसत हंसत म्हणाली " पण यमूताई, आतां मोठ्या माणसांना अशी पूर्वीच्या नांवानं कशी हाक मारावी ? बरं तें राहूं दे. पण मला सांग अगोदर, यजमान खुशाल आहेत ना ?"

" हें आतां मला ग बाई कसं सांगतां येणार ? कॉलेज उघडलं आहे, मुबईस जाऊन आज सातआठ दिवस झाले, जातांना सांगायचं झालं होतं, कीं मुंबईस पोंचतांच खुशालीचं पत्र पाठवीन–पण काय ! आजवर कांहीं त्या

पत्राचं ठिकाण नाहीं. अग, तें काय घेऊन बसलीस ? वृन्दावन सोडून मथुरेला गेलं कीं, पुनः वृंदावनाची आठवण रहाते कुणाला !" यमुनेचा स्वभाव किंचित् विनोदी होता. शेवटचें वाक्य बोलतांबोलतां ती हसूं लागली.

"काय ते आठच दिवस झाले ना ? पत्र येण्याची वेळ कांहीं अझून टळली नाहीं ! "

"कां बरं ? मोज दिवस पाहूं. मुंबईस जायला एक दिवस-गेल्यावर जरा स्थिरस्थावर होण्याला दोन दिवस—आणि पोस्टांतून पत्र यायला आणखी दोन दिवस धर हवे तर. किती.. पांच दिवस झाले कीं नाहींत ? मग आज तर आतां आठ दिवस होऊन गेले. पाठविलींच असतीं तर एव्हाना दोन पत्र-दिखील येऊन पोचलीं असती ! बरं, पण काय ग गंगू, आणि आपले यजमान कधीं गेले ?"

गंगू ओशाळली आणि खालीं पाहून म्हणाली "तेव्हांच—"

"मग पत्रबित्र आलं असेलच—हो संशय नकोच !"

सरस्वती स्वभावतःच लाजाळु होती. तिला या प्रश्नाला उत्तर देण्याचें मुळींच धाडस झालें नाहीं. ती हसली मात्र-परंतु यमुनेला त्या हंसण्याचा अर्थ तेव्हांच समजला. तीहि हंसतहंसत म्हणाली "समजल बरं बाईसाहेब समजलं! आपलं पोट यथास्थित भरलं म्हणजे दुसऱ्याला ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगायला माणसाला मोठी मौज वाटते ! म्हणे 'पत्र येण्याची वेळ कांहीं अझून टळली नाहीं !' तूं आपलं माझं समाधान करूं पहात्येस वाटतं ? हो, तें पण योग्यच आहे! कारण, आमचं आतां म्हातारपण झालं तेव्हां तरुण मंडळीसारखं अधीर होणं आतां आम्हाला शोभत नाहीं ! आम्हीं आपलं आतां धीर धरून समाधानानंच राहिलं पाहिजे-नाहीं का? बरं पण यजमानांनीं तुला काय लिहिलं आहे तें तरी पाहूं दे!"

सरस्वती पुनः ओशाळली. लज्जेनें तिचें सुंदर मुखकमल आरक्त झालें. यमुनेच्या बोलण्यानें ती अगदींच गडबडून गेली आणि कांहींतरी उडवाउडव करण्याच्या उद्देशानें म्हणाली "तूं कधींपासून म्हातारी झालीस बाई ?"

एक क्षणाचाहि विलंब न करतां यमुना स्मितमुखानें म्हणाली "मी होय आज आठ दिवस झाले ! गंगू, अग स्त्रियांचं असंच आहे हो ! पति जवळ असले तरच त्यांचं तारुण्य, आणि तेच पति दूर गेले म्हणजे त्या तरुण असल्या

तरी त्यांना वृद्धावस्थाच प्राप्त होते, समजलीस? तूं जरी हल्लीं पंधरा वर्षांची तरणीताठी मुलगी आहेस, तरी तुला दिखील आतां वृद्धावस्था प्राप्त झाली आहे बरं!"

असें म्हणून प्रेमानें सरस्वतीची हनुवटी धरून ती थट्टेनें मान हालवीत म्हणाली "बरं तें जाऊंदे गडे! पण तें पत्र मला पाहूं देतेस कीं नाहीं?"

"तुझ्या मनांत आल्यावर तूं कां मला सोडणार आहेस? पण अगोदर माझी एक गोष्ट ऐक—"

"पहिल्यानं पत्र दाखीव, मग एक सोडून दहा गोष्टी हव्या तर ऐकेन!"

"बरं बाई, दाखवितें–मग तर झालं ना? आता यातलं काहीं थोड खा पाहूं–"असें म्हणून सरस्वतीनें तें फराळाचें ताट यमुनेच्या पुढें ठेविलें. तें पाहून यमुना म्हणाली "या वेळीं माझ्यानं मुळीच खाववणार नाहीं!"

"कां बरं? आमच्या गरिबाच्या इथं कांहीं श्रीमंत माणसं बाटतात वाटतं! थोडं तरी खाल्ल्याशिवाय जाऊं देणार नाहीं मी तुला–" असें म्हणून सरस्वती हंसूं लागली.

हें पाहून यमुना गंभीर मुद्रा करून म्हणाली "असं म्हणशील कीं नाहीं तर हें सगळ मी एकटीच खाऊन टाकीन बरं!"

"छे! इतकी आमच्यावर कुठली कृपा व्हायला!"

"खरोखर-थट्टेन नाहीं म्हणत मी! बरं, हें इतकं कोण खाणार?"

"कां! तूं, मी अन् हा आमचा वेडा रामू तिघ मिळून खाऊन टाकूं"

"बरं, खा पाहूं तर मग" असें म्हणून यमुनेनें एक लाडू फोडून त्यांतला अर्धा बळजबरीने सरस्वतीच्या तोंडात कोंबला. अर्ध्यातला अर्धा रामूच्या तोंडात दिला आणि बाकीचा आपण खाल्ला. नंतर रामूला यमुनेजवळ बसवून सरस्वती पाणी आणण्यासाठीं गेली. काकी दिसेनाशी झाल्याबरोबर रामूनें भोकांड पसरलें. इतक्यांत सरस्वती पाणी घेऊन परत आली आणि त्याला कडेवर घेऊन तिनें त्याचा एक मुका घेतला व आंब्याची दुसरी एक कापटी उचलून त्याच्या हातीं दिली. त्याबरोबर तत्काळ त्याचें रडें थांबलें. तो पुनः पूर्ववत् हसूं खेळूं लागला. त्याच्या नादीं सरस्वतीनें खाण्याचें अगदीच बंद केलें, हें पाहून यमुना म्हणाली "वा ग तूं! हिशोबाच्या वेळीं तिघांचीं नांवं, मग आतां खात कां नाहींस?"

" ही पहा खात्यें खात्यें—"असें म्हणून आणखी एक लाडू फोडून त्यांतला थोडा सरस्वती पुनः रामूला भरवूं लागली. हें पाहून यमुना तोंड फिरवून म्हणाली " हें पहा, ही असली चेष्टा चालायची नाहीं! खायचं असेल तर नीटपणीं, नाहीं पेक्षा मीं हें सगळं बाहेर फेंकून देत्यें!"

सरस्वतीनें एक आंबा उचलला आणि तो ती खाऊं लागली. इकडे रामूच्या रडण्याच्या सूर भागीरथीबाईच्या कानी जाऊन पोहोंचला त्याबरोबर क्रुद्ध मुद्रेनें त्या धांवत धांवत सरस्वतीच्या खोलीत आल्या आणि एक शब्दहि न उच्चारितां त्यांनी सरस्वतीच्या कडेवरून रामूला जोरानें हिसकावून घेतला आणि त्याच्या गालफडात आणि त्याचप्रमाणें पाठीवर धवाधव धक्के मारीत त्या रागानें म्हणाल्या " मेला अवलक्षणी कारटा—खादीसाठी मेला जीव देईल! हा नरक नाहीं खाल्ला तर जीव जाईल वाटतं? धोंडेदगड खावे अन् मग रडत बसावं—"

तोंडाने याप्रमाणें बडबड करून भागीरथीबाईनीं त्या पोराचे असे कांहीं जोराने गालगुचे घेतले की, तो बिचारा " काकी, काकी,--" करीत सारखा आक्रोश करूं लागला; परंतु त्या निर्दय आईला त्याची करुणा येण्याचें एकीकडेच राहिलें—उलट ती अधिकच चवताळली आणि खाड्दिशीं त्याच्या कोंवळया गालावर चापटी मारून म्हणाली " पुनः काकी म्हणून बोलशील का? मेल्या तुझा जीव काढून टाकीन!"

बिचारी सरस्वती डोळयात आसवे आणून त्या अर्भकाच्या तोंडाकडे पहात होती; इतक्यांत भागीरथीवाई त्याला घेऊन तेथून अदृश्य झाल्या. सरस्वतीच्या डोळयांतून आसवें गळत आहेत हें पाहून यमुना अचंब्यांत पडून म्हणते " हें काय बाई! आपण नव्हती असली मौज कुठं पाहिली!"

सरस्वती रडक्या स्वरानें म्हणाली " यमूताई, तूं इथंच आहेस, सांग बरं आतां माझा यांत काय अपराध झाला?"

" तुझा अपराध! गंगू, दुसऱ्याचीं मुलं जवळ घेऊन तुला पुत्रवती व्हायला पाहिजे, नाहीं का? त्या पोरावर ममता करून तूंच त्याला मार खायला लावत्येस."

" मेलं दोन वर्षाचं कोंवळं पोर तें काय, अन् त्याला असं धवाधव मारायचं तें काय! पट्दिशीं प्राण नाहीं का जायचा एखादे वेळीं त्याचा!" असें म्हणून सरस्वतीनें पदरानें डोळे झांकले.

तिचे अश्रु पुसून यमुना गंभीर स्वरानें म्हणाली "गंगू, एकंदर रागरंग पाहून नीट हुशारीनं वाग बरं! पुढचं चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं!"

---

प्रकरण चौथें

## यमुनेचा स्पष्ट अभिप्राय

संध्याकाळ झालेली पहातांच " सरस्वती, अग सरस्वती!" म्हणून सगुणाबाई पुनः हांका मारूं लागल्या. त्यावरोबर सरस्वती डोळे पुशीत पुशीत सासूच्या जवळ येऊन त्यांचे केस विंचरूं लागली. तिला असे डोळे पुसतांना पहातांच सगुणाबाईनीं विचारिलें " सरस्वती! अग डोळे चोळायला ग काय झालं?"

सरस्वतीचे डोळे पुनः पाण्यानें भरून आले. तिनें झालेला एकदर वृत्तांत सासूला निवेदन केला व डोळ्यांवर पदर धरून ती रडूं लागली. सगुणाबाई तिचें सांत्वन करून म्हणाल्या " अग वेडे, मग तूं कां रडत्येस? तुझा काय झाला अपराध यांत?"

इतक्यांत यमुनाहि तेथें आली. तिला पाहून सगुणाबाई म्हणाल्या, "यांच्या या चेष्टा पाहून आपली तर बाई अक्कल गुंग होऊन गेली आहे! यांच्या मनात आहे तरी काय? पदोपदी माझा जीव खाताहेत! काय बापड्यांना अवदसा आठवली असेल ती असो!"

याप्रमाणें आणखी काहीं वेळ बोलणें झाल्यानंतर यमुना आपल्या घरी जाण्यास निघाली; परंतु सगुणाबाईनीं तिला जाऊं दिले नाहीं. त्या म्हणाल्या " पावसाची सर अझून थांबली नाहीं, अन् तूं भिजत जायला निघालीस कुठं? राहिलीस आजची रात्र आमच्या इथं तर काय होईल? मी तुझ्या आईला गड्याबरोबर सागून पाठवित्ये."

यमुनेला मग नाहीं म्हणून म्हणतां येईना. सरस्वतीच्या हातीं तर जणूं आकाशच लागलें! दोघी जणी नंतर तेथून उठून खोलींत जाऊन गोष्टी सांगत बसल्या.

इकडे भागीरथीबाईनीं एकसारखे तोंड सोडलें होतें. सरस्वती, यमुना आणि आपली सासू, यांच्यावर सारखा भडिमार चालविला होता; तरी देखील तिचें समाधान होईना. शेवटीं विनायकराव, जगन्नाथराव आणि त्यांच्या बरोबर इंग्रजी शिकलेली एकंदर मंडळी, लिहिण्यावाचण्याला शिकलेल्या एकं

दर स्त्रिया, या सर्वांच्या बेचाळीस कुळांचाहि तिने उद्धार चालविला. सगुणाबाईनी तिचें किती वेळां तरी निवारण केलें; यमुना आणि तिचा नवरा यांचीं तरी नांवें निष्कारण येऊं नये ह्मणून परोपरीनें तिला कितीतरी सांगून पाहिलें —शेवटीं हात देखील जोडले, परंतु भागीरथीबाईनी तिकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. तिचा तोफखाना सारखा चालला होता. बराच वेळ याप्रमाणें तोंडसुख घेतल्यानंतर ती अखेरीस थकली आणि रडक्या आवाजानें बोलू लागली " मजजवळ नाहीं चालायची असली अरेरावी! यःकश्चित् खाण्याच्या वस्तूवरून दुसऱ्याच्या लेकराला फाडफाड मारायचं म्हणजे काय? अशी कोण ही मोठी बाजीरावीण लागून गेली!"

नंतर तिनें आपल्या नवऱ्याकडे मोर्चा वळविला आणि त्याचा उद्धार करून पतिभक्तीची पराकाष्टा करून दाखविली. याप्रमाणें बराच वेळ हें वादळ चालू होतें. शेवटी रात्री दहा साडेदहाच्या सुमाराला बंद झालें. सरस्वती आणि यमुना भोजनोत्तर खोलींत निजावयाला गेल्या. खोलीचें दार बंद करून यमुना म्हणाली " अग बाई ग! चवताळलेली वाघीणच जशी! हें तोंड तरी कसल म्हणायचं!"

सरस्वती भयभीत होऊन यमुनेचा हात धरून म्हणाली " जाऊंदे बाई! आपल्याला नकोत त्या गोष्टी. नाहीं तर आणखी लंकाकांड व्हायचं!"

" मग झालं तर झालं. इथं त्याला भ्यायला कोण बसलं आहे? लंकाकांड झालं तर आपण रावणवध करूं, म्हणजे झालं! तरी बिचारी नवऱ्याच्या हातीं सांपड—"

" नको ग यमुताई, त्या गोष्टीच नकोत! तूं आज हें पहिल्यानदाच पाहिलंस, म्हणून तुला त्याचं हे वाटत आहे; पण हें तर रोजचं आहे माझा तर बाई जीव थरथर कापतो. तें राहूदे गडे! तुला तें पत्र पहायचं आहे ना?"

असें म्हणून यमुनेचें मन दुसरीकडे वळविण्याच्या हेतूनें सरस्वतीनें तें पत्र तिच्या हातीं दिलें. यमुना दिव्याजवळ बसून स्मित वदनानें तें वाचू लागली. पत्र शेवटापर्यंत वाचल्यावर ती म्हणाली " येऊन जाऊन सगळा एक मुद्दा— कुणाचा द्वेष करू नको, कुणाचा मत्सर करूं नको, सासूसासऱ्यांची सेवाशुश्रूषा करीत जा, कुणाच्याहि तोंडास तोंड देऊं नको, तंटाभांडण करण्यास कधींहि प्रवृत्त होऊं नको, त्यांची मुलं तीं आपलींच आहेत असं समजून त्यांच्यावर ममता करीत जा—' एकाच कालेजांत शिकतात कीं नाहीं!"

असें हंसत हंसत म्हणून ती सरस्वतीकडे पाहूं लागली, तों सहजगत्या तिची नजर तिच्या लुगड्यावर गेली. सरस्वतीचें लुगडें अगदीं नवेंच होतें; परंतु एकीकडे तें फाटलेलें दिसलें. तें पाहून यमुना आश्चर्यानें म्हणाली "हें ग काय? ही सोन्यासारखी नवी चंद्रकळा, इतक्यांत फाडून कशी टाकलीस?"

"मीं नाहीं ग फाडली यमुताई! काल वाळत घातली होती बाहेर उन्हांत—"

"मग उन्हानं ती फाटली वाटतं!" यमुना मध्येंच म्हणाली. "मला समजतात बरं या सगळया गोष्टी! सगळया आळींत गोंगाट झाला आहे, तो उगाच नाहीं. हीं त्यांचींच कामं बरं—"

"तुझं आपलं भलतंच कांहीं तरी!"

यमुनेनें लुगड्याचा फाटलेला पदर हातांत धरिला आणि म्हटलें "तूं मला शिकवित्येस वाटतं? अग, हातानं मुद्दाम फाडल्याविना असं कद्धीं फाटायचं नाहीं! मेला हा द्वेष तरी कोण्या प्रकारचा!"

सरलस्वभावी सरस्वती आपल्या स्वाभाविक मिष्ट स्वरानें म्हणाली"असेल कुणीं पोरा पोरानं फाडलं असेल. त्या काय म्हणून माझीं लुगडीं अशीं फाडतील बरं? त्यांना ग काय त्यापासून मिळणार?

"हीच तर मुळीं तुझी अक्कल! कांहीं मिळेल म्हणून वाटतं माणसं सगळीं कामं करीत असतात? हा आत्तांच जो एकंदर मंडळीच्या बेचाळीस कुळांचा उद्धार झाला, त्यांत त्या माणसाला काय मिळालं सांग पाहू? हे सगळे दुर्बुद्धीचे चाळे आहेत. त्याच्या आईबापांनीं मुळीं त्यांना चांगलं शिकवलंच नाहीं! बरं, यापूर्वीं असं कांहीं तुझं कुणीं फाडलं होतं कां?"

"हो, पुष्कळ वेळा. माझा समज होता कीं, कुणा पोरासोराचंच हें काम असेल."

"अहा ग वेडे! पुरुषासारखा विचार करून कां कुठं आपलं बायकांचं चालणार आहे? त्याना काय! त्यांना वाटत असतं, कीं या जगांत सगळ्या सीता नि सावित्रीच भरल्या आहेत! तेव्हां सांगत असतात कुणाबरोबर तंटाभांडण करूं नये, कुणाला काहीं बोलू नये–' अग या क्षुद्र बुद्धीच्या बायकांचीं मधुनमधून जर चांगलीं नाक ठेचीत गेलं नाहीं, तर त्या अधिकच शेफारून जातात! आणि गगू, अशा कजाग, मत्सरी स्त्रीला नवरा मिळतो तोहि तसाच मूर्ख, अक्कलशून्य—"

यमुनेच्या या भाषणानें सरस्वती अगदीं घाबरून गेली. " पुरे झाल्या बाई आतां त्या गोष्टी ! निजायचं नाहीं का तुला ?" असें म्हणून तिनें एकदम दिव्याला निरोप दिला.

त्या दोघी बिछान्यावर पडल्या तरी त्यांच्या गोष्टी चालल्याच होत्या. कांहीं वेळानें यमुना सरस्वतीच्या कानाशीं लागून म्हणाली " मौज पहा हो ! तुला मी चोर धरून देतें ! दरवाजाशी उभं राहून कुणीतरी आपल्या गोष्टी ऐकत आहे—"

सरस्वती स्वभावतःच शांततप्रिय होती. ती म्हणाली " कोणी का ऐकेना ! आपल्याला कशाला त्याची परवा पाहिजे ?"

हें ऐकलें न ऐकलेंसें करून यमुना मोठ्यानें म्हणाली " कोण उभं आहे तें दरवाजापाशी ?"

यमुनेच्या तोंडांतून हे शब्द निघतात न निघतात तोंच कोणीतरी झपाझप पावले टाकीत गेल्याचा आवाज ऐकूं आला. तें पाहून यमुना पुनः हंसत हंसत म्हणाली " ऐक, कुणीतरी गडबडीनं पळून गेलं !"

यमुनेनें नंतर सरस्वतीला अनेक गोष्टी सांगितल्या. संसारासंबधी नाना प्रकारें तिला सदुपदेश केला. याप्रकारें एकमेकींच्या सहवासांत ती रात्र कधीं सरली, तें त्यांना समजले देखील नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीच सरस्वतीचा मोठ्या प्रेमानें निरोप घेऊन आणि दररोज येण्याचें कबूल करून यमुना आपल्या घरीं निघून गेली.

---

प्रकरण पांचवें

## जनार्दनपंत आणि सगुणाबाई

आश्विन महिना. दिपवाळी जवळ आलेली. आम्हां हिंदु लोकांना या दिपवाळीच्या सणासारखा दुसरा आनंददायक सण नाहीं. घर सोडून उद्योगधंद्यासाठीं किंवा इतर कांहीं निमित्तानें दूरदेशीं गेलेली मंडळी होईल तितके करून या सणासाठीं तरी घरीं येण्याची खटपट करीत असतात. आगगाड्या, आगबोटी, वगैरेमधून या संधीस कोण गर्दी ! गांवांतल्यागांवांत देखील रस्ते पहा, मनुष्यांनी गजबजलेले. आनंददायक दिपवाळीची मार्गप्रतीक्षा करीत असतां आम्हीं जणू आनंदानें बेहोष होऊन जातों. लहानलहान मुलें, तरुण मंडळी,

प्रौढ मंडळी कोणाकडेहि पहा, सर्वांच्या मुद्रेवर आनंदाची छाया दिसूं लागते. स्त्रिया दिपवाळीची मोठ्या आशेनें वाट पहात असतात. दुःखदारिद्र्यानें गांजलेलीं कितीतरी वृद्ध मातापितरें, पैसे मिळविण्यासाठीं दूर देशीं गेलेला आपला पुत्र आतां आपल्याला भेटेल म्हणून दिपवाळीकडे डोळे लावून बसलेलीं असतात जुनींपुराणीं, फाटकींतुटकीं वस्त्रें वापरणारीं कितीतरी मुलें आणि त्यांच्याबरोबर कितीतरी युवती, या निमित्तानें आतां आपल्याला नवीं वस्त्रें वापरण्यास सांपडून चार दिवस शरीराची शोभा वाढविता येईल, या आशेवर मोठ्या आनंदानें असतात आशेनें सर्वांना उत्साह येत असतो आणि आनंद त्यांना प्रफुल्लित करून सोडितो तात्पर्य, दिपवाळीसारखा सौख्यदायक आणि मंगल प्रसंग दुसरा कोणताहि नसेल! असें स्वाभाविक सौख्याचें सर्वत्र प्रदर्शन एरवीं कधीहि पहावयास मिळणें शक्य नाहीं.

परंतु या जगांत सुखदुःखें नेहमी मिश्रित असतात. केवळ सुखाचें किंवा केवळ दुःखाचेंच साम्राज्य कोठेंहि आढळावयाचें नाहीं. ज्या गोष्टीनें एकाचें हृदय आनंदपरिपूर्ण होत असतें, तीच गोष्ट भिन्न अवस्थेतील दुसऱ्या एखाद्या व्यक्तीचें अंतःकरण दुःखमग्न करीत असते, हा या सृष्टींतील नियम आहे. एक राजा मृत्यु पावला–दुसरा राजा गादीवर बसला; एकासाठीं एकीकडे शोक चालला आहे, तोंच दुसऱ्याला राज्य प्राप्त झालें म्हणून दुसरीकडे आनंदोत्सव, नाचरंग चाललेले असतात. प्रत्यहीं कितीतरी तरुण या जगतांतील 'मायामोह-पसाऱ्याचा' त्याग करून मृत्युलोकांतून अकालीं प्रयाण करीत असतात. त्यांच्या मागें त्यांच्या प्रेमाला कायमची आंचवलेली, अन्नावस्त्राला देखील महाग झालेली त्यांची स्त्रीपुत्र कन्यादिक आप्त मंडळी आपल्या शोकस्वरानें आकाश भेदून टाकीत असतात. त्याचप्रमाणें असेहि शेंकडों लोक इहलोक सोडून जात असतात कीं, ज्यांच्यासाठीं कोणी हंसतहि नाहीं किंवा कोणी रडतहि नाहीं! तेव्हां हें हंसणें आणि रडणें सार्थ असो वा निरर्थ असो, परंतु सृष्टीबरोबरच त्याचा जन्म झालेला आहे आणि सृष्टीबरोबरच त्याचा लय होणार आहे. तेव्हां त्याची उपेक्षा करून कसें चालेल?

दिपवाळीला आतां काय ते आठ दिवस राहिले होते. जनार्दनपंत रात्रौ भोजनोत्तर माजघरांत भक्तिविजयाची पोथी वाचीत बसले होते. सगुणाबाई समोर बसून ऐकत होत्या. बाकीची सर्व मंडळी आपापल्या जागीं निजावयास

गेली होती. पोथी पुरी होतांच सगुणाबाईनीं हळुहळू दिपवाळीची गोष्ट काढिली आणि त्या म्हणाल्या " आजच आठा दिवशीं पुरुष न्हायचे, आणि घरांत हा वेळपर्यंत कांहींच सामानसुमान आणून दिलं नाहीं! यदा काय काय करायचं, तेंहि अजून सांगितलं नाहीं—"

" काय पाहिजे तें करा, माझे डोकें उगाच उठवूं नका." जनार्दनपंत मध्येंच त्रासिक स्वरानें म्हणाले. " मला कांहीं गोड लागत नाहीं आतांसें—"

" लागणार कुठून! मला नाहीं का ते समजत? पण असं करून कसं चालेल? आपण मुळीं आतां मान-अपमानाकडे लक्ष्यच देऊन उपयोगी नाहीं. आपल्या जिवात जीव आहे तोवर वऱ्यावाईटाला मालक आपणच. त्यांना विचारतं आहे कोण? शिवाय, वाहेरच्या लोकांना आंत काय चालल आहे, तें कसं समजणार--"

"रात्रंदिवस तंटे अन् भांडणें! कोण तरी हा त्रास! मनुष्य सहन करील तरी कुठवर--"

" आतासं तर जसं काय उधाणच आलं आहे! माझी कांहीं आतां बोलण्याची साय राहिली नाहीं. ज्यांच्या त्यांनी वायका आपल्या दावात ठेवाव्या तें एकीकडेच राहिलं, उलट हेच त्याना भर देतात! तेव्हां याला म्हणावं तरी काय बाई!"

जनार्दनपंत बराच वेळ सचित बसले. नंतर म्हणतात "हीं दोन पोरें माझीं हाडें खायाला जन्मास आलीं आहेत. अशीं पोरें नसलेली देखील बरीं! मोठ्याला एकसारखी पैशाची हांव सुटली आहे; पैशापुढें त्याला दुसरें तिसरें कांहीं दिसतच नाहीं! पैशासाठी हा एखाद्याचा प्राण देखील घ्यायला कमी करायचा नाहीं. तूं लक्ष्यांत ठेव माझे बोलणें, हा कारटा एक दिवस तुरुंगांत जाणार आणि आमच्या नांवाला काजळ फांसणार. पाठच्या भावांना एव्हांपासून ठकविण्याचे याचे उद्योग चालले आहेत! कोण हा पैशाचा लोभ! बरें, दुसरा कारटा! तो तर शुद्ध नंदीबैल आहे!! मूर्खाला काडीची देखील अक्कल नाहीं. आपलें हिताहित ज्याला कळत नाहीं, त्याला मनुष्य तरी म्हणावा कसा! बायको सांगेल तें याचें वेदवाक्य-आणि या गाढवानें शाळा घातली आहे पोरांची डोकीं फोडायला! या दोघांहि कारट्यांना जें सांगायला जावें त्याच्या विरुद्ध नेहमीं त्यांचें वर्तन असायचें. प्रत्येक गोष्टींत यांचे तर्कवितर्क आहेतच! असलीं कारटीं नसलेलीं काय वाईट—"

" आणखी त्यांच्या जोडीला सुना मिळाल्या आहेत त्याहि तशाच! अष्टौप्रहर भांडण नि तंटे, दुसरी गोष्टी नाहीं! ती बापडी सरस्वती म्हणजे जशी यांच्या डोळ्यांत सलत आहे—"

" जसे नवरे तशा बायका! त्यांच्याकडे काय दोष? बायका म्हणजे मेणाच्या बाहुल्या आहेत; त्यांना चांगला किंवा वाईट आकार देणें हें त्याच्या नवऱ्यांच्या बुद्धीवर आहे. चांगल्याच्या पदरीं पडल्या म्हणजे त्याहि चांगल्या निपजतात?"

" तें खरंच, पण म्हणतात ना 'खाण तशी माती' तें कांहीं खोटं नाहीं. चांगल्या आईबापांच्या मुली चांगल्याच निपजतात. माझी सरस्वती पहाना—"

"जसा माझा विनू, तशीच तीहि आहे. त्या दोघांना पाहिलें म्हणजे माझ्या डोळ्यांचें पारणें फिटतें; मग मी सगळें विसरून जातों. मुलगी पण काय मुलगी आहे! बोलणे किती गोड आणि मर्यादशील! स्वभावहि कसा थंड. मी म्हणतों, ती लिहिणेंवाचणें शिकते, शिकेना का—त्यांत काय वावगें झालें आहे? येथें आल्यावर एकदोनदां मीं तिला पुस्तक वाचतांना पाहिलें, तेव्हां प्रथम मला तर विनूचा फार राग आला होता—पण आतां मला तर असें वाटूं लागलें आहे कीं, या लिहिणेंवाचणें शिकलेल्याच मुली बऱ्या—"

" सरस्वती बुद्धिवान् पण तशीच आहे बरं! एक शब्द उच्चारला कीं, आपल्या मनांत काय आहे तें तिनं ओळखलंच! बरं, स्वभाव ह्मणजे किती साधा आणि सरळ! भागीरथी आणि अनपूर्णा तिचा एवढा द्वेष करतात, नेहमीं घालून पाडून बोलतात, उघडउघड नाहीं नाहीं त्या शिव्या देतात, साहेबांची मडम म्हणून तिला हिणवतात, पण तिला त्याचा काडीभर तरी राग आहे का? कुणी कांहीं सांगो, हिची आपली तें करायला तयारी. कामाची कधीं चुकवाचुकवी नाहीं. जिकडे तिकडे आपलं लखचक. घामटपणा म्हणजे इतका—इतकादिखील तिला खपत नाहीं. विनूच्या लग्नाला आज कांहीं नाहीं तरी चार वर्षं झालीं, पण आजवर कुणाला एक शब्द तरी ती कधीं टाकून बोलली आहे का? अशी सालस मुलगी मीं कुठंकुठं पाहिली नाहीं! बोलायला लागली म्हणजे जसं काय अमृत गळत आहे—जीव कसा थंडगार होऊन जातो. या मेल्यांचा छळ नाहींच सोसवला तर आपली कुठ तरी एकीकडे जाऊन रडत बसत्ये—पण एक शब्द म्हणून कधीं बोलायची नाहीं!"

"माझी धाकटी सून म्हणजे माझ्या संसाराची लक्ष्मी आहे! भगवंतानें माझ्या विनूला दीर्घायुष्य द्यावें, ह्मणजे तो माझें नांव खात्रीनें वाढवील. नाहीं तर पक्कें समजून रहा, येथें दिवसा दिवे लागायचे आहेत!"

"दोघंही म्हातारीं होवोत! सरस्वतीनं असं यांचं काय घोडं मारलं आहे? ती बापडी स्वयंपाकाला आली कीं, यांनीं तिचा पिच्छा पुरवलाच! कुठं भाजींत हळूच मीठ घाल, कुठं भातांत खडेच टाक, कोण हा दुष्टपणा! तिला उन्हांत लुगडंदेखील वाळत घालयची चोरी. घातलं रे घातलं कीं, यांनीं त्याचा विध्वंस केलाच! हें ग बाई काय! आपण असले तमाशे कुठं पाहिलेहि नाहींत नी ऐकलेहि नाहींत. आपण कुठं याबद्दल बोलायलाचं जावं, तर भागीरथी आणि अनपूर्णा जशा काय खायाला उठतात! नवरे तर काय बोलायलाच नको, बायकांचा कड घ्यायला जसे टपलेले! मला आणि त्या बापड्या सरस्वतीलाच खोड्यांत काढतात नि मनास येईल तसं भकत सुटतात."

जनार्दनपंतांनीं एक मोठा थोरला सुस्कार सोडिला आणि म्हटलें "जाऊं दे, मला नको रोज रोज उठून त्यांच्या गोष्टी ऐकायला! पुढच्या काळजीनें माझा जीव अगदीं अस्थिर होतो. हरामखोरांच्या मनांत एव्हांपासून वेगळें व्हायचें आहे!"

सगुणाबाईंना देखील अतिशय दुःख झालें. तो विषय बदलून त्या म्हणाल्या "बरं, मग दिवाळीला करायचं काय काय?"

जनार्दनपंत विरक्त स्वरानें म्हणाले "दरसाल होत असेल त्याप्रमाणेंच यंदाहि करा, झालें. आणखी हें पहा, माझ्या मनांतून ही एवढी दिपवाळी झाली कीं, काशीयात्रेला जायचं आहे. आतां नाहीं आपल्याला हा ताप सहन होत. येथें हें रोज पाहून आणि ऐकून माझं शरीर खंगत चाललें आणि मनाला तर अगदीं किळस आला आहे. आतां कांहीं माझे फार दिवस राहिले नाहींत. मिळवली इतकी अब्रू जरी देवानें अखेरपर्यंत राखली, तरी बस्स झालें; मग मला अधिक कांहीं नको. आतां येथें रहाण्यांत मौज काय? हे दोघे हरामखोर एक शब्ददेखील बोलूं देत नाहींत. बरें सुना, तर त्याहि कुणाला जुमानीत नाहींत! तेव्हां येथें राहून शोभा करून घेण्यांत काय अर्थ?"

सगुणाबाई दुःखितांतःकरणानें म्हणाल्या "देवाची मर्जी असेल तसें होईल, त्याची चिंता करून काय होणार आहे? काशीस जायचं म्हणतां पण सरस्वतीला

इथं ठेवून माझ्यानं कांहीं रहावणार नाहीं. तिला एकटीला इथं ठेवली तर तिचा जीव घ्यायला दिखील या चुकायच्या नाहींत—"

त्या वृद्ध दांपत्याच्या याच विषयावर आणखी थोडा वेळ गोष्टी चालल्या होत्या. शेवटी बरीच रात्र झाली असें पाहून सगुणाबाई निजावयास गेल्या. जनार्दनपंतांनीं पोथी गुंडाळून तेहि नंतर अस्वस्थ मनानें बिछान्यावर जाऊन पडले व बऱ्याच वेळाने झोंपीं गेले.

---

प्रकरण सहावें

## पतिपत्नी

विनायकराव फार दिवसांनीं दिपवाळीच्या रजेंत घरीं आले होते. सरस्वतीच्या मनांत आज कितीतरी कल्पनातरंग उठत होते. विनायकरावहि आपल्या प्रियपत्नीला भेटण्यासाठी उत्सुक झाले होते. परंतु एक तर जुन्या वळणांतील बालबोध घराणें. शिवाय, मोठ्या वहिनी आणि अन्नपूर्णा वहिनी टीका करतील याची धास्ती. नाईलाजास्तव या दाम्पत्याला रात्र होईपर्यंत वाट पहाणें भाग पडलें. सूर्य अस्तास गेला, संध्याकाळ झाला, क्रमाक्रमानें गाढ अधःकारहि पडला. रात्रौ सर्वांची जेवणें होऊन पुरुषमंडळी बाहेर गप्पागोष्टी सांगत बसली. बायका आपला वावर आटोपून आपापल्या खोलींत गेल्या. सरस्वतीहि आपल्या खोलींत जाऊन दिव्याजवळ पतीची मार्गप्रतीक्षा करीत बसली. खोलीच्या एका बाजूच्या कोंपऱ्यांत एक लहानसें टेबल असून त्याच्याजवळ एक खुर्ची होती. विनायकराव रजेंत घरीं आले म्हणजे येथेंच लिहिण्यावाचण्यास बसत. टेबलावर एक लहानसें घड्याळ 'टिक् टिक्' करीत होतें. सरस्वतीचे डोळे त्या घड्याळाकडे गेले, त्यासरशी ती उठून " अग बाई ! साडेदहा वाजले!" असें तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत टेबलापाशीं गेली. दिवा उचलून तिनें टेबलावर ठेविला आणि नंतर खुर्चीवर बसून ती तेथें असलेल्या पुस्तकांपैकीं एका पुस्तकाचीं पानें उलटूं लागली. या पानांतील एक ओळ, त्या पानांतील दोन ओळी, एखाद्या पानांतील एखादा शब्द, तर एखाद्याचा नुसता पृष्ठांकच याप्रमाणें तिनें त्या पुस्तकाची शंभरापेक्षांहि अधिक पानें उलटलीं असतील, तरी देखील विनायकरावांचा ठिकाण नाहीं ! शेवटीं कंटाळून तें पुस्तक तिनें ठेवून दिलें आणि पेन्सील हातीं घेऊन कागदावर ती कांहीं लिहीत बसली.

एका कागदावर कांहीं लिहावें, नंतर तो कागद फाडून टाकावा; दुसरा कागद घ्यावा, त्यावर कांहीं लिहावें आणि त्याचीहि तीच व्यवस्था करून टाकावी; असा क्रम तिनें चालविला होता. इतक्यांत विनायकराव खोलींत आले आणि त्यांनीं दरवाजाला कडी घातली. त्या आवाजाबरोबर सरस्वती दचकून उठली आणि गडबडीनें कागदपेन्सील टेबलावर ठेवून लगबगीनें दूर बाजूस जाऊं लागली. परंतु विनायकरावांनी जलदीनें तिच्या मागोमाग जाऊन सरस्वतीचे कोमल हस्त आपल्या हातांनीं धरिले आणि हंसतहसत विचारिलें " कां! कुठें पळून जायचा बेत आहे ?"

लज्जेने सरस्वतीच्या तोंडांतून शब्द निघेना. ती आपलीं खालीं मान घालून तशीच उभी राहिली. हें पाहून विनायकरावांनीं पुनः विचारलें " निजायची वेळ होऊन गेली वाटतें ?"

तरी देखील सरस्वतीकडून कांहींच उत्तर येईना. विनायकरावांनीं पुनः प्रश्न केला " माझ्या पत्राचें उत्तर कां नाहीं धाडलेंस ?"

आतां मात्र सरस्वतीनें बोलण्याचा हिय्या केला. " आतां अनायासं घरींच यायचं झालं आहे–" इतकेच शब्द तिने उच्चारले. तोंच तिचा ऊर धडधड उडूं लागला. जणू या भाषणानें एक मोठा जबरदस्त गुन्हाच ती करीत होती!

" मला यायला फार उशीर झाला वाटतें ?" विनायकरावांनीं विचारिलें. सरस्वतीचा धीर आतां चेपत चालला. सस्मित वदनाने ती म्हणाली " नाहीं, मला वाटलं बाहेरच्या बाहेर पुनः मुंबईला जाणं झालं—"

" म्हणजे अशी रात्र तरी किती झाली आहे ?"

" फारशी नाहीं झाली अझून! मुंबईच्या घड्याळांत अझून सात नसतील वाजले—"

विनायकरावांनीं प्रेमभरानें सरस्वतीला आपल्या जवळ ओढिलें आणि तिला घेऊन ते टेबलाजवळ येऊन खुर्चीवर बसले. सरस्वती दोन्ही हात खुर्चीवर ठेवून मागें उभी राहिली. विनायकराव म्हणाले " मुंबईचीं घड्याळें मला वाटतें फार हळू चालतात!"

" घड्याळंचशीं काय पण–मुंबईत रहाणाऱ्या माणसांचे देखील व्यापार फार हळुहळू चालतात—"

" हें तुला कसें समजलें ?" विनायकरावांनीं हंसतहंसत विचारलें.

यावर मोठा धीर करून सरस्वती गंभीर स्वरानें म्हणाली " आतां जो हा विलंब लागला, त्यावरून ! सभेंत भाषण करतांना सांगायचं कीं, रात्रीं दहाच्या पुढं जागत बसूं नये, आणि त्याचप्रमाणं सूर्य उगवल्यानंतर बिछान्यांत राहूं नये. पहायचं बरं आतां किती वाजले ते ! एक तर मुंबईच्या घड्याळांत अद्यापि दहा वाजले नसावेत, किंवा बोलण्याप्रमाणं वागणं होत नसावं—"

परंतु इतके बोलतां बोलतां आश्विनाचे दिवस असूनहि सरस्वतीच्या कपाळावर घर्मबिंदु चमकू लागले. विनायकराव घड्याळाकडे पाहून आश्चर्यचकित झाल्यासारखें करून म्हणाले " अकरा वाजले ! हे घड्याळ बरोबर चाललें आहे तरी का ! याला चावी देतेस का रोजच्या रोज ?"

परंतु सरस्वती मुळींच डगमगली नाहीं. ती म्हणाली " चावीच कशाला दिली पाहिजे ! असंच चाललं आहे तें !"

" तुझ्या हाताचा गुण असला पाहिजे तर मग हा ! बरें, करीत होतीस काय इतका वेळ येथें बसून ?"

" देवाचं नांव घेत होतें बसूनबसून ?"

" केव्हांपासून एवढी देवावर भक्ति जडली ही ?"

" संकट पडलं म्हणजे आपोआप भक्ति जडते."

" कसलें बुवा एवढें मोठें संकट येऊन पडलें आहे ?"

सरस्वती धिटाईने म्हणाली " हातावर पाणी पडतांच जें कुठं जायचं झालं तें हा वेळपर्यंत ठिकाण नाहीं, तेव्हां चिंता—"

" माझ्यासाठीं कां तूं चिंता करीत बसतेस ?"

सरस्वती व्यथित होऊन म्हणाली " छे ! आम्हांला कसली आली आहे चिंता आपल्यासारखींच सगळीं माणसं निष्ठुर असतात वाटतं ?"

आपल्या प्रिय पत्नीच्या सुंदर मुखकमलाकडे प्रीतिप्रफुल्ल अंतःकरणाने पहात विनायकराव म्हणाले " मी तर कांहीं केली नाहीं हा वेळपर्यंत निष्ठुरता. तुला माझ्या भेटीची उत्कंठा लागली असेल त्यापेक्षांहि मला तुझ्या भेटीची अधिक लागून राहिली होती; परंतु करें ? बाबा, दादा, अप्पा सगळे बसले होते, त्यांना सोडून कसा येऊं ? बाबा सांगायला लागले 'माझा आतां वृद्धापकाल झालेला; कधीं काय होईल याचा नेम नाहीं. आतां तुम्ही तिघेही भाऊ

घरीं जमलां आहां, तेव्हां आपलें सगळें पाहून समजून घ्या ' घर खटल्या-संबधीं आणखीही कित्येक गोष्टी त्यांनीं सांगितल्या. त्या उद्यां सांगेन मी तुला. आतां फार रात्र झाली आहे. उगाच जागत बसण्यांत अर्थ नाहीं."

" बरं, आतां परत केव्हां जायचं ?"

" उद्यां सांगशील तर उद्यां !" विनायकराव हंसून म्हणाले.

" त्यांत कांहीं मोठंसं आश्चर्य मानायला नको ! बरं, पण खरंच सांगायचं, किती दिवसांची सुटी आहे ?"

" पुष्कळ दिवसांची आहे."

" पण नीट सांगितलं तर काय दोष लागेल ?"

" आहे, जवळजवळ दीड महिन्याची सुट्टी आहे, समजलीस ?"

" मग तर पुष्कळच गोष्टी कळून येण्याजोग्या आहेत." सरस्वती हंसूं लागली

---

प्रकरण सातवें

## हें असें कां व्हावें

घरीं आल्यावर विनायकरावांचा नित्यक्रम म्हटला म्हणजे पहांटेस उठून प्रातर्विधि आटोपून समुद्रकिनाऱ्यावर थोडा वेळ फिरावयास जावें. नंतर स्नान उरकून एखादें पुस्तक किंवा वर्तमानपत्र वाचीत बसावे, कधीं कधीं वडिलांबरोबर किंवा वडील बंधूबरोबर संसारासंबंधी गप्पागोष्टी करीत बसावे; दोन प्रहरीं भोजनोत्तर कधीं थोडी वामकुक्षि करावी, किंवा कधीं समवयस्क मित्रमंडळीबरोबर खेळत बसावें; तिसऱ्या प्रहरीं आपल्या इष्टमित्रांच्या घरीं त्यांना भेटावयास जावे. विनायकरावांचें सौजन्य आणि सुशील वर्तन पाहून एकंदर मंडळी त्यांच्यावर संतुष्ट असे व फार लोभ करी.

सरस्वती म्हणजेहि हल्लीं केवळ अल्लड मुलगी नव्हती. स्वाभाविक लज्जेला किंचित् आळा घालून ती आतां आपल्या पतीशीं मोकळ्या मनानें बोलण्याचालण्यास शिकत होती; ती जात्याच बुद्धिमान् असल्यामुळें पतीच्या सांगण्याशिकविण्याचें मार्ग समजून घेऊन तदनुसार आपलें वर्तन ठेवण्यास झटत होती. पतीच्या अंतःकरणांतील गूढ काढून घेऊन त्याचे मनोभाव समजून घेण्याचा ती अभ्यास करीत होती. याप्रमाणें प्रेमाचा मोबदला प्रेमानें मिळत जाऊन या नूतन दांपत्याचें दांपत्यप्रेम दिवसेंदिवस दृढ होत चाललें होतें.

रात्रौ पतिपत्नींची गांठ पडली, ह्मणजे विनायकराव कसलें तरी एखादें चांगलेसें पुस्तक सरस्वतीला वाचून दाखवीत, किंवा तिच्याजवळून वाचून घेत. याप्रमाणें त्यांचा वेळ मोठ्या आनंदांत जात होता. सरस्वतीनें हा वेळपर्यंत घरांतील कसलीच गोष्ट पतीजवळ काढिली नव्हती. होतां होतां शेवटीं विनायकरावाची रजा संपत आली. आता काय ते सातच दिवस राहिले होते. हें पाहून एके दिवशी रात्रीच्या वेळी विनायकरावाची गांठ पडल्यावर आपल्या दोन्हीं हातांनी त्याचा उजवा हात धरून त्याच्या हृदयावर आपले मस्तक ठेवून सरस्वती अगदी व्यथित अंतःकरणानें आणि मृदुस्वराने ह्मणाली "इकडून तर आतां दोनचार दिवशी जायचं होईल. पण मग माझी काय दशा होईल, ती त्या देवालाच माहीत! माझा तर जीव अगदीं घाबरून गेला आहे."

सरस्वतीनें जरी कांहीं सांगितलें नव्हतें, तरी घरांत चाललेले एकंदर प्रकार विनायकरावाच्या ध्यानीं आलेच होते. आपल्या पत्नीचा कसा निष्कारण छळ होत होता, हें त्यांना माहीत नव्हतें असें नाहीं, तरी देखील या गोष्टींत मन घालणें उचित नाहीं, त्याचा परिणाम मुळीच चांगला व्हावयाचा नाहीं, हें विनायकराव पूर्णपणें जाणून असल्यामुळें ते सरस्वतीला म्हणाले "हे काय वेड्यासारखें बोलतेस? आपल्या घरी रहायचें, त्यांत भिण्याचें आणि घाबरण्याचें कारण काय?"

सरस्वतीनें दुःखानें उसासा सोडला. तिचे दोन्ही डोळे भरून आले. ती ह्मणाली "एरवीं कसलं आलं आहे भय! पण जाऊबाईच्या डोळ्यात मी सारखी सलत आहें."

"असें कांहीं असेल तर तो तुझा दोष असला पाहिजे. आपण नीट वागलों नाहीं तर मित्र देखील शत्रु होतात; पण तेंच जर आपण चांगल्या रीतीनें वागत गेलों, तर आपल कट्टे वैरी देखील मित्र करून घेतां येतात. तूं त्यांच्याजवळ चांगल्या रीतीनें वागत नसशील, त्यांच्या मुलाबाळांवर मायाममता करीत नसशील, त्यांच्या पश्चात् त्यांची निंदा करीत असशील, नाहींपेक्षा तूंच सांग, आपलीं माणसें आपल्याला उगाच का परकी होतील?"

बिचारी सरस्वती अगदींच विरमल्यासारखी होऊन "मी तर कधींहि त्यांची अवज्ञा करीत नाहीं, किंवा त्यांच्याशीं वांकड्या मार्गानं वागत नाहीं; उलट सदोदित त्यांची मर्जी राखण्यासाठीं जिवापाड झटत असत्यें. मी पुस्त-

कच वाचत्यें, नीटनेटका पोषाखच करत्यें, जरा दिखील अस्वच्छता मला खपत नाहीं, मी मडमच झाल्यें आहें, आतां साहेबाकडे चाकरी धरणार आहें, अशा एकना दोन, हजारो रीतींनी त्या कुचेष्टा करीत असतात; सगळ्या आळीआळीतल्या बायकाजवळ माझी निंदा करीत असतात. पण--"

विनायकराव मध्येच म्हणाले "करीनात का त्या खुशाल काय वाटेल ते आपण आपले तिकडे मुळी लक्ष्यच देऊ नये म्हणजे झालें."

"मग मी तरी तिकडे कुठं लक्ष्य देत्यें! तिकडे लक्ष्य दिलं आणि त्याच्या तोंडास तोंड दिलं मग मात्र ईश्वरानंच माझं रक्षण केलं पाहिजे या घरांत!"

"सभेचा रंग पाहून बुवांनीं कीर्तनाचें धोरण ठेविलें पाहिजे ज्याना ज्या गोष्टीचें मर्म कदापि समजले नाहीं, त्यांच्याजवळ ती गोष्ट न काढणें हेंच शहाण्या मनुष्याचें काम आहे. नांगर धरणाऱ्या एखाद्या कुणब्याजवळ जर आपण 'पृथ्वी वाटोळी आहे,' किंवा 'पृथ्वी फिरत आहे,' याविषयी बोलूं लागलों, तर त्याला ते कधीहि समजावयाचें नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट तो आपल्याला वेड्यांत मात्र काढील!"

सरस्वतीला यावर काय बोलावे ते सुचेना. ती घोटाळ्यात पडल्यासारखे करून म्हणाली "हो, बरी आठवण झाली. पृथ्वी कशी फिरत्ये तें मी सुद्धा विसरून गेल्ये आहे; एकवार मला सांगायचं बरं तें फिरून."

"मग सांगेन एखादे दिवशी लिहिणें वाचणें शिकल्यापासून काय फायदे होतात, शिक्षणानें मनुष्याचें मन कसें संस्कृत होतें; आणि त्याचप्रमाणें खाण्यापिण्यासंबंधी, कपड्यालत्त्यासंबंधी स्वच्छता राखणें हे आरोग्याला किती आवश्यक आहे, हे अनेक पुरुषांना देखील कळत नाहीं. मग तुझ्या त्या जाऊबाईना आणि अन्नपूर्णाबाईना कसें बरें कळावें? ज्याच्या अंगीं जो विषय समजून घेण्याची पात्रता नाहीं, त्याच्याशी त्या विषयावर वाद घालीत बसणें ह्मणजेच प्रथम चूक आहे. तुझ्या जावाच्या अंगीं जर शिक्षणाचें महत्त्व आणि त्याचप्रमाणें स्वच्छतेची अत्यावश्यकता समजून घेण्याची शक्ति असती, तर मग त्या तुझी अशी थट्टा करत्या ना. उलट, त्याहि तुझ्याप्रमाणेंच वागण्यास झटत्या. तेव्हां हा कांहीं त्यांचा दोष नाहीं, तर तो त्यांच्या अज्ञानाचाच दोष आहे. त्याच्या या थट्टेनें चिडून न जातां आपण आपलें कर्तव्य करीत बसावें, हेंच योग्य आहे."

"मी तरी तसंच करत्यें. कधींहि या गोष्टीवरून मीं त्यांच्याशीं वितंडवाद घालीत बसत नाहीं."

"तर मग मोठेंच आश्चर्य म्हणावयाचें! तूं जर कांहींच बोलत नाहींस, तर मग काय त्याच होऊन तुझ्या गळीं पडतात आणि तुझ्याशीं भांडण करतात?"

सरस्वतीला या भाषणानें फार दुःख झालें. तरीहि ती शांत आणि गंभीर स्वरानें म्हणाली " मी कस वरं सांगू तें? आतां इतकं सांगायचंच झालं तेव्हां मीहि दोन शब्द सांगत्येच. माझी पेटी उघडून पहायची, त्यांत एखादं तरी लुगडं फाटल्याशिवाय सांपडतं का? मी एखादे वेळी बाहेर उन्हांत लुगडीं वाळत घालत्यें तो दिखील माझा अपराधच म्हणावयाचा नाहीं का? माझीं पुस्तकं पहा, त्यातलीं पानं कशींकशीं फाडलीं आहेत तीं! हा दिखील माझाच का दोष? त्याचप्रमाणं स्वयंपाक करतांना रोजच्यारोज का मी विसरून भाजीत, आमटींत दोनदोनदां तीनतीनदां मीठ घालत्यें? मामंजींना आणि सासूबाईंना कधीं एक दिवसदिखील चागलं जेवायला मिळूं नये, असा मीं निश्चय केला आहे वाटतं?"

बोलतां बोलतां सरस्वतीच्या डोळ्यांतून टपटप अश्रु गळूं लागले. ते पतीच्या नकळत पुसून काढून ती पुढें म्हणाली " कधींकाळी मी त्यांच्या एखाद्या बोलण्याला उत्तर दिलच, तर लागल्याच म्हणतात, कीं, 'तुझं काय बाई! तूं लिहावाचायला शिकलेली! तुझ्यापुढं का आमचा निभाव लागायचा आहे?" बरं गप्प बसल्ये तर म्हणतात 'कशाला बाई बोलशील आमच्या-सारख्या मूर्ख माणसांशीं! स्वतः लिहावाचायला शिकलेली आणि यजमान तर इंग्रजी शिकतात! मग कस बरं बोलावं आमच्याशीं?' लवकर स्वयंपाकाला लागावं तर म्हणतात 'आह्मांला बाई कुठं येतो आहे स्वयंपाक करतां? करणार काय ती सरस्वती! आमचं करणं आता गोडच लागत नाहीं सासुसासऱ्यांना!' बरं त्यांच्यापेक्षां उशीरां लागावं तरीहि 'या बाई कशा लागतील स्वयंपाकाला? पुस्तकं वाचायचीं, पत्रं लिहायचीं, चित्रं काढायची, अशीं किती तरी कामं त्यांच्या पाठीशीं आहेत! आईबाप श्रीमंत आणि यजमानहि श्रीमंत. त्यांना हो कसली काळजी आली आहे!' त्यांच्या मुलांना कुठं कडेवर घ्यायला जावं तर म्हणतात 'अग बाई! हें काय भलतंच हें–दुसऱ्यांचीं मुलं कडेवर घेऊन कशाला उगाच कंबर दुखवून घेतां?' बरं कधीं नाहीं घेतलं, तर 'मेलीं पोरं रडून

रडून जीव टाकतात, पण नाहीं ग बाई कुणाला उचलून घ्यायची बुद्धी होत! सातां जन्मींची वैरीण दिखील नाहीं असा अंत पहायची!" म्हणून टोमणे मारायला तयारच! मला कीं नाहीं, त्या रामूचा फारच लळा लागलेला आहे. आज त्याला उचलून कडेवर घेऊं लागल्यें तर तो काय म्हणतो 'काकी, मीं नाहीं आतां येणार तुझ्या कडेवर!' मीं विचारलं ' असं रे का रामू?' त्यावर तो पोर रडके तोंड करून म्हणतो ' नको ग काकी! आई मला रागावली आणि म्हणाली मार देईन काकी काकी करीत पुनः गेलास तर!' तें काय बरं?"

सरस्वतीचा कंठ दाटून आला. ती स्फुदूं लागली. विनायकराव पराकाष्ठेचे विस्मित होऊन आपल्या प्रिय पत्नीच्या मुखाकडे पाहूं लागले. " वेडी कुठली! तूं रडतेस काय म्हणून?" असें ह्मणून त्यांनीं प्रेमानें तिला आपल्याजवळ घेतली व ते तिचें समाधान करूं लागले. पतीच्या प्रेमळ भाषणानें सरस्वतीचें कोमल अंतःकरण अधिकच गहिंवरून आलें आणि ती विनायकरावांच्या हृदयावर मस्तक ठेवून खरोखरच एखाद्या लहान लेंकराप्रमाणें रडूं लागली. कांहीं वेळानें अंतःकरण किंचित् स्थिर झाल्यावर ती म्हणाली 'इकडून म्हणायचं कीं, आपल्या वर्तनाच्या चुकीमुळं मित्रदिखील शत्रु होतात. इकडचं म्हणणं तेंच माझं वेदवाक्य. मला चांगलं वर्तन ह्मणजे काय, वाईट वर्तन म्हणजे काय, मुळींच समजत नाहीं. काय केलं असता त्या मला अगदी सख्ख्या बहिणीप्रमाणं वागवितील, तें मला नीट सांगायचं, मी अगदी तस्सं करीत जाईन."

सरळ स्वभावाच्या सरस्वतीचे हे सरळ उद्गार ऐकून विनायकराव किंचित् विचारांत पडले. पत्नीच्या या सरळ आणि निष्कपट वृत्तीबद्दल त्यांनीं मनातल्या मनांत तिची कितीतरी प्रशंसा केली. तिला काय उत्तर द्यावें, हें कांहीं त्यांना सुचेना. बराच वेळपर्यंत तीं दोघेहि स्तब्ध होतीं. नंतर सरस्वतीचे अश्रु आपल्या हातानें पुसून काढून विनायकराव म्हणाले " मी खरेंच सांगतों कीं, मला काहीं याचं कारण समजत नाहीं. तूं त्यांच्याशीं वाईट रीतीनें वागशील, हें मला सहसा खरें वाटायचें नाहीं. कारणाशिवाय तर कार्य होणें शक्य नाहीं. मग त्या असें कां बरें करीत असाव्या? एक मात्र याला कारण आहे, आणि तें कोणतें म्हणशील, तर मत्सर! दुसऱ्याचा उत्कर्ष झालेला दृष्टीस पडला कीं, कित्येक मनुष्यांच्या अंगाला अगदीं आग लागत असते. पण आपल्या स्थितींत आणि त्यांच्या स्थितींत मला सध्यां तरी कांहीं फारसा भेद दिसत नाहीं; तेव्हां मत्सरालाहि कांहीं कारण दिसत नाहीं. मग हें असें कां व्हावें?"

---

## प्रकरण आठवें

# अन्नपूर्णाबाईचा कानमंत्र

दुसऱ्या दिवशी रात्रीची गोष्ट. उशीवर डोकें टेकून अन्नपूर्णाबाई मोठमोठ्यानें सुस्कारे टाकीत होत्या. या कुशीवरून त्या कुशीवर, त्या कुशीवरून या कुशीवर अशी त्याची केव्हापासून सारखी तळमळ चालली होती. गोविंदराव हा प्रकार पहात स्तब्ध बसून राहिले होते शेवटी ते त्रासले आणि म्हणाले " आज काहीं झालें वाटतें आणखी! रोज रोज कांहीं हें आपल्याला आवडत नाहीं."

अन्नपूर्णाबाईनीं आणखी एक सुस्कारा सोडला आणि म्हटलें " मला पण नाहीं रोज उठून असा अपमान सहन होत! मला आपली माहेरीं पोंचती करा कशी!"

अन्नपूर्णाबाईची ही नेहमीचीच फुशारकी होती; परंतु गोविंदरावांना ती आज सहन झाली नाहीं. ते त्रासून रागानें म्हणाले " मग जात कां नाहींस? कुणीं हात धरला आहे वाटतें!"

अन्नपूर्णाबाईच्या जिवाला हें बोलणें फार झोंबलें. त्या रडक्या आवाजानें म्हणाल्या " ज्याना मी दृष्टीसमोर नकोशी झाल्ये असेन, त्यांनी यावं कशाला माझ्याशी बोलायला? मी या घरांत आतां एक दिवस दिखील राहू इच्छीत नाहीं. उद्याच्या उद्यां मी आपली माहेरी निघून जाणार—"

" उद्यां कां? आतांच निघ कशी—" गोविंदराव सतापानें म्हणाले.

" बरं आहे, ही पहा निघाल्यें—"

असें म्हणून अन्नपूर्णाबाई रागारागानें बिछान्यावर उठून उभ्या राहिल्या. गोविंदरावांनी जोरानें तिचा उजवा हात धरला आणि सतापानें म्हटलें "गुप चूप नीज म्हणून एकदा सागतो! एक अक्षर जर आता जास्त कमी बोललीस तर सांभाळून रहा!"

भीतीनें, दुःखानें, अन्नपूर्णाबाई पुनः बिछान्यावर पडल्या आणि रडून रडून उशी भिजवूं लागल्या. अर्धा तास याप्रमाणें निघून गेला; तरीहि त्यांचें धुमसणें चाललेंच होतें. हें पाहून गोविंदरावांची पक्की खात्री होऊन गेली कीं, आज खरोखरच कांहीं तरी विशेष प्रकार घडून आला असला पाहिजे नाहीपेक्षां हें धुमसणें इतका वेळ चाललें नसतें. अंतःकरणांत हा प्रकाश पडतांच त्यांना आपल्या पत्नीची दया आली आणि तिच्यावर उगाच आपण

संतापलों, असें वाटून त्यांना पश्चात्तापहि झाला. मग या अघोर पातकाबद्दल प्रायश्चित्त घेण्याच्या हेतूनें आपल्या पत्नीचा हात धरून प्रेमयुक्त नम्र स्वरानें ते विचारूं लागले " आज असें झालें तरी काय ?"

या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या मुळींच भानगडींत न पडतां पतीच्या हातांतून आपला हात सोडवून घेऊन अन्नपूर्णाबाई या कुशीवरून त्या कुशीवर झाल्या आणि पूर्वीपेक्षांहि मोठ्यानें धुमसूं लागल्या. हें पाहून गोविंदरावांचें हृदय कळवळून गेलें आणि आपल्या पत्नीवर आज कांहीं तरी मोठा गहजब गुजरला आहे याबद्दल त्यांना मुळींच शंका राहिली नाहीं. ते आतां तिच्या अगदी जवळ गेले आणि तिचें समाधान करून म्हणाले " काय झालें-व काय नाहीं तें बोलल्यासांगितल्याशिवाय आम्हांला समजावें कसें आणि आम्ही त्याचा प्रतिकार तरी करावा कसा ?"

यावर अन्नपूर्णाबाई रडत रडत परंतु जरा कुऱ्यानेंच म्हणाल्या " कांहीं झालंहि नाहीं नि कुणाला कांहीं करायचं कारणहि नाहीं—"

हें ऐकून तर गोविंदरावांचें मन अधिकच व्यग्र झालें. ते अगदीं अजीजी करून म्हणाले " पण सांगशील तर खरें काय आहे तें ?"

" माझी जर कुणाला कळकळ असती, तर माझी अशी दशा झालीच असती कशाला ?" अन्नपूर्णाबाई अधिकच रडूं लागल्या.

" या बाजूला वळून एकदां सांग ना काय झालें आहें तें ?" असें म्हणून पत्नीचा हात धरून गोविंदराव तिला ओढूं लागले. अन्नपूर्णाबाई स्तब्ध पडून राहिल्या. एक शब्ददेखील बोलल्या नाहींत. पत्नीचें तोंड बळेंच आपल्याकडे फिरवून गोविंदरावांनीं पुनः एकवार विचारिलें " काय झालें आहे तरी काय ?'

परंतु अद्यापिहि त्यांच्या प्रश्नाला मुळींच उत्तर मिळेना ! ते अधिकाधिक अधीर होत चालले. शेवटीं संतापून त्यांनीं विचारिलें " मग तुला बोलायचें आहे कीं नाहीं ?"

आतां फार वेळ ओढून धरण्यांत अर्थ नाहीं, हें पाहून अन्नपूर्णाबाई म्हणाल्या " या घरांत मला जें दुःख काढावं लागत आहे, तें ज्यांना समजत नाहीं त्यांना सागून तरी काय उपयोग ? बरं सांगितलं, तरी त्यावर विश्वास कुणाचा बसायचा आहे ?" अन्नपूर्णाबाईंचें बोलण्याबरोबर अश्रु ढाळणेंहि चालचें होतें, हें सांगावयास नकोच !

" विश्वास बसो कीं न बसो, ती गोष्ट अलाहिदा. पहिल्यानें कळूं दे तर खरें काय आहे तें !"

अन्नपूर्णाबाईनीं एक मोठा सुस्कारा सोडला आणि पदरानें डोळे आणि नाक पुसून त्या म्हणाल्या "आम्हांला लिहितांवाचतां येत नाहीं, तेव्हां आमचं सांगणं कुणाला खरंहि वाटायचं नाहीं, नी तें आम्ही कुणाजवळ सांगूंहि इच्छीत नाहीं-"

" पण, असें आहे तरी काय ?"

" आपल्या त्या लाडक्या भावाला आणि भावजईलाच विचारा !"

" त्यांनीं काय केलं ?"

" करायचं काय ? फक्त आतां मारायचं बाकी राहिलं आहे—"

" पण तूं काय असें त्यांचें घोडें मारलें आहेस ?"

" तें बाई मी कसं सांगूं ! काल कुणी घरांत नव्हतं, तेव्हां मी आपली एकटीच निजल्यें होत्यें. इतक्यांत त्यांच्या खोलींत कांहीं धुसफुस चालली असल्याचा भास झाला. तेव्हां काय आहे हें पहाण्यासाठीं मीं सहज जाऊन त्यांच्या खोलीच्या दरवाज्याला कान दिला. तिथं जें कांहीं मीं ऐकलं, तें सांगितलं असतां कुणाला खरंदिखील वाटायचं नाहीं !"

" पण तें सांगितल्याशिवाय कसें समजावें ?"

" काल लगीन होऊन घरांत आली नाहीं, तों नवऱ्याजवळ चुरचुरु बोलत होती ! नवऱ्याला सांगूं लागली काय ' तुमची आतां रजा संपत आली, आतां माझी काय दशा होईल ती देवालाच ठाऊक. मला बरोबर घेऊन चला, मी कांहीं रहायची नाहीं इथं !' यावर नवऱ्यानें विचारलं ' कां बरं ? तुला कुणाची भीति आली आहे ?' यावर आपली चट्दिशीं म्हणते 'दोघीहि जावांनीं माझी अगदीं पाठ पुरवली आहे. कोणत्या वेळीं काय करतील याचा मुळींच नेम नाहीं ! मी पुस्तकें वाचत्यें, घामटपणानं वागत नाहीं, म्हणून सगळ्या गांवभर माझी निंदा करीत फिरतात, माझीं पुस्तकं काढून टाकतात, कपडे उन्हांत घातले तर ते फाडून टाकतात, नाहीं नाहीं त्या शिव्या दे—"

अन्नपूर्णाबाईचें बोलणें पुरें होणाच्या आधींच उतावीळपणानें गोविंदरावांनीं विचारिलें " पण विनायक यावर काय म्हणाला ?"

" ते म्हणाले, त्या निंदा करणार नाहींत तर दुसरं काय करणार ? लिहिण्यावाचण्याचं मर्म त्यांना कुठून कळणार—त्यांच्या नवऱ्यांना दिखील कळायची मुष्कील !"

या गोष्टीच्या खरेपणाविषयीं गोविंदरावांना प्रथम किंचित् संशय येऊन ते म्हणाले " आमचा विनायक असा मुलगा नाहीं. तो असें म्हणेलसें मला नाहीं वाटत—"

" म्हणूनच तर मी म्हणत्यें ! तुमचा शहाणासुरता भाऊ तोंडानं 'अप्पा अप्पा' म्हणूं लागला, म्हणजे इकडे आनंदाला पारावार नाहींसा होतो ! तुमचा मानसन्मान तरी तो कसा ठेवीत असतो, कीं वा ! पण विनायकाच्या तोंडांत अमृत असून पोटांत काळकूट भरलं आहे, तें कुठं आहे तुम्हांला माहीत ? हें एवढंसं दिखील अजून लक्ष्यांत येत नाहीं, मग आजवर इतकीं मुलं शिकवून हुशार केलीं, त्याचा उपयोग काय ?"

पत्नीनें केलेली आपली प्रशंसा ऐकून गोविंदराव मनांतल्या मनांत अगदीं आनंदित झाले आणि म्हणाले " तो तसा निघाल्यास कांहीं नवल नाहीं ! इंग्रजी शिकलें म्हणजे असेंच व्हायचें !"

अन्नपूर्णाबाईला कितीतरी धीर आला. आतां तर त्यांच्या जिभेला अधिकच फांटे फुटूं लागले. त्या म्हणाल्या, " आपण मनांत विचार करीत असाल कीं, विनायक इंग्रजी शिकून तरबेज झाला, म्हणजे मोठी नोकरी मिळवील अन् मग आपल्याला कितीतरी सुखानं रहायला मिळेल ! कारण, विनायक तोंडावर गोडगोड बोलत असतो. पण वेळ आली कीं, विनायक काय करील, याचा कुणीं विचार केला आहे ? तो कांहीं तुमच्यासारखा पढतमूर्ख नाहीं, समजलां ? बायको म्हणेल तें त्याचं ब्रह्मवाक्य ! तुमच्या पडत्या काळीं विनायकाकडून एक कवडी मिळेल, अशी आशा दिखील करूं नका ! नको ग बाई, एकएक गोष्ट मनांत आली म्हणजे अंगावर शहारे येतात !"

" बरं, आणखी काय विनायक म्हणाला ?"

" विनायक होय ! विनायक म्हणाला 'तुझे कपडे त्या फाडतात मग तूं कां स्वस्थ बसून रहात्येस ? तुला नाहीं का त्यांचे फाडतां येत ?' यावर सरस्वती हंसतहंसत म्हणते 'मग मी कुठं कमी करत्यें ! आसपास कुणी नाहीं असं पाहून त्यांचीं लुगडीं मी टरकवून टाकत्यें.' कां कसं आहे ?" गोविंदराव मान डोलवूं लागले. अन्नपूर्णाबाई पुनः रडक्या आवाजानें म्हणाल्या " वर्षातून तीनतीन, चारचार लुगडीं लागतात, हा तुम्हाला वाटतं माझाच अपराध ! मी जपून वापरीत नाहीं ! आतां सांगा पाहूं, असं व्हायला लागलं तर तिथं काय कराव माणसानं ?"

गोविंदराव मान हालवीत म्हणाले "अ-स्सें का-य! मला हें आजच समजलें. असें एकएक मनुष्य वैर करायला लागलें, तर तुह्मा त्यांत काय दोष? तरी म्हटलें हें असें कां होतें? बाबा याबद्दल काय काय तरी बोलत असतात! बंदोबस्त केला पाहिजे या गोष्टीचा अगोदर. बरें पुढें—"

"पुढं काय? पुढं तर विनायकाच्या अकलेचे तारेच तुटूं लागले! तो म्हणाला 'पण अशीं नुस्तीं लुगडीं आणि चोळया फाटून कुठं यांच्या डोक्यांत अक्कल शिरायची आहे? नवरे जसे मूर्ख तशाच अक्कलशून्य मत्सरी बायका. यांची चांगलीं नाकं ठेंचल्याशिवाय का यांना कांहीं कळायचं आहे."

गोविंदराव चवताळून म्हणाले "काय? दोन बुकें इंग्रजी शिकला नाहीं, तोंच आम्हांला मूर्ख ठरवून आमचीं नाकें ठेंचायला निघाला काय? पहातों म्हणावं काय मौज आहे ती!"

"आमचे नवरे मूर्ख आहेत किंवा शहाणे आहेत, पण यांच्या मस्तकांत कां तिडीक उठली? हे काय आम्हाला खायला घालतात कीं, आम्ही यांची कांहीं आशा धरून बसलों आहों? आमच्या नवऱ्यांनीं आम्हांला दिलं तर आम्ही खाऊं, नाहीं तर उपाशीं राहूं! पण या मेल्यांना आम्हांला शिव्या द्यायची जरूर काय?" असें बोलून अन्नपूर्णाबाईनीं पतिभक्तीची कमाल करून दाखविली.

"दोन बुकें शिकला नाहीं, तों इतकी मिजास, अं? चमत्कार म्हणायचा! माझ्या हाताखालीं शिकून तयार झालेलीं कितीतरी मुलें आज मोठमोठ्या चाकऱ्या करीत आहेत. आणि हा प्रत्यक्ष पाठचा भाऊ होऊन अशी निंदा करतो! बरें आहे, दिसेल लवकरच काय काय मौज आहे ती म्हणावें!"

नाकडोळे वांकडे करून अन्नपूर्णाबाई पुढें म्हणाल्या "अहो, एवढ्यानंच काय झालं आहे! आणखी कितीतरी बडबड चालली होती; पण माझ्या मेलं सगळं ध्यानांतच राहिलं नाहीं. आणि मी म्हणत्यें, तें ऐकून तरी काय होणार आहे?"

"आजवर मीं तुझ्या बोलण्याकडे कधीं फारसें लक्ष्य दिलें नाहीं. आंतल्या आंत चाललेलीं हीं कारस्थानें आम्हाला कशीं कळावीं? आज तूं सांगितलेंस तें चांगलें केलेंस. बदोबस्त करून टाकतों पहा तर खरा कसा याचा तो!"

"मीं तरी याच धास्तीमुळं आजवर कधीं तोंड उघडलं नाहीं. बोलून-चालून आम्ही खोटंच कांहींतरी सांगतों असा आपला समज झालेला. मग

आमचं ऐकतो कोण? हें पहा, आपल्याला काय पाहिजे तें वाटो, पण माझा कुणीं प्राण घेतला, तरीदेखील मी आपल्याजवळ म्हणून खोटं कधीं बोलणार नाहीं—"

गोविंदराव यावर कांहीं बोलले नाहींत, परंतु आपली मसलत सिद्धीस गेली, हें अन्नपूर्णाबाई समजून चुकल्या. मनातल्या मनांत त्या आपल्या अपूर्व बुद्धि-कौशल्याची तारीफ करूं लागल्या. आणि उद्यां जाऊबाईना एकंदर हकीगत सांगून पुढें काय करावयाचें तें ठरविलें पाहिजे, असा आपल्याशींच बेत करून स्वस्थपणें झोंपी गेल्या.

---

प्रकरण नववें

## पितापुत्र

जनार्दनपंत देशमुख फार संभावित गृहस्थ होते. त्यांचें सद्वर्तन, सौजन्य आणि धर्मनिष्ठा यांविषयीं त्यांचा मोठा लौकिक असे कोणाचीहि विपन्नावस्था पाहिली म्हणजे त्यांचें कोमल अतःकरण तत्काळ कळवळत असे. अनाथ, अपंग, दुःखी, दरिद्री, त्यांच्याकडून कधींहि विन्मुख म्हणून गेला नाहीं. आपल्या शक्तीप्रमाणें आणि आपल्या सामर्थ्याप्रमाणें ते सर्वांना मदत करण्यास कधींहि मागेंपुढें पहात नसत. परोपकार करण्यांत त्यांना जो एक प्रकारचा अपार आनंद होत असे, तसा दुसऱ्या कशानेंहि होत नसे. कोणत्याहि प्रकारें एखाद्यावर उपकार करण्याचा प्रसंग आला म्हणजे त्यांची गंभीर मुद्रा प्रफुल्ल होत असे. हें पुण्यव्रत चालवितांना त्यांना अनेक वेळीं अनेक प्रकारें झीज सोसावी लागे; परंतु त्याबद्दल त्यांनीं कधींहि असंतोष प्रगट केला नाहीं. गांवांतील कितीतरी वादविवादांत आणि तंटेभांडणांत ते अगदीं निरपेक्ष बुद्धीनें मध्यस्थी करीत. तीक्ष्णबुद्धि, व्यवहारज्ञान आणि मनुष्यस्वभावाची पुरी ओळख, यांमुळें त्यांचें असें कांहीं वजन बसलें होतें कीं, त्यांच्या शब्दाबाहेर जाण्यास बहुधा कोणीहि धजत नसे. प्रत्येक प्रसंगीं गांवांतील लोक त्यांची सल्लामसलत घेऊन त्याप्रमाणें प्रत्येक गोष्ट करीत असत. सारांश त्या टापूंत जनार्दनपंताचा लौकिक फार मोठा होता.

परंतु हा एवढा मोठा लौकिक, सुशील सद्वर्तनी पत्नी, संतति, संपत्ति इत्यादि गोष्टी अनुकूल असूनहि जनार्दनपंत सुखी नव्हते. आज कित्येक वर्षा-

पासून त्यांच्या निर्मळ हृदयांत दुःखरूपी कंटक रुतला होता, आणि त्यामुळें सुखाची देखील त्यांना गोडी लागत नसे. जेवणापासून त्यांची तृप्ति शांत होत नसे किंवा निद्रेपासून त्यांना शांति लाभत नसे. घरांत धुमसणाऱ्या कलहाग्नीनें त्यांचें अतःकरण व्यग्र होऊन गेलें होतें. देशमुखांच्या घरीं तंटाभांडण झालें नाहीं, असा अलीकडे दिवस देखील जात नसे. मोठी सून भागीरथीबाई आणि मधली सून अन्नपूर्णाबाई, या एखादे दिवशीं सासूजवळ, एखादे दिवशीं सरस्वतीजवळ, एखादे दिवशीं आपापसांतच, तर एखादे दिवशीं वाऱ्याशीं देखील भांडत सुटत! विठ्ठलराव बुद्धिपुरस्सर या गोष्टीला उत्तेजन देत. त्यांना पक्का भरंवसा होता कीं, हा कलहाग्नि जितका जास्त भडकेल, तितका भ्रातृ-विरोध लवकर उपस्थित होईल आणि विभक्त होण्याचा सुयोग तितका नजीक येत जाईल. त्याना पक्के माहीत होतें कीं, विभक्त झाल्याशिवाय लपवून ठेविलेल्या पैशावर चैन करावयास सांपडणें शक्य नाहीं. मधले गोविंदराव हे सरळ स्वभावाचे, परंतु फारच हलक्या कानाचे होते. बायकोच्या सांगण्या-बाहेर वर्तन करण्याची त्यांना मुळींच छाती होत नसे; आणि त्यांनीं तसें कांहीं केलेंच, तर ती त्यांना उघड उघड मूर्ख म्हणून त्यांची फजिती करीत असे. शिवाय, त्यांच्या मनानें अगदीं पक्के घेतलें होतें कीं, आपली धाकटी भावजय आणि तिचाच नेहमी पक्ष घेणारी आपली आई, या दोघी आपल्या पत्नीला फार छळित असतात, आणि त्या अशा नेहमीं छळतात म्हणूनच केवळ आपल्या पत्नीला कधीं कधीं भांडण करणें अवश्य होतें. अर्थात्, गोविंद रावहि कधीं अन्नपूर्णाबाईला दरडावीत नसत. त्यांतल्या त्यांत अलीकडे भागीरथीबाई आणि अन्नपूर्णाबाई एक झाल्या होत्या. विठ्ठलरावांनीं लपवून ठेविलेल्या पैशाची बातमी गोविंदराव आणि अन्नपूर्णाबाई या दोघांनाहि लागली होती. भागीरथीबाईनीं या बाबतींत अन्नपूर्णाबाईला आश्वासन देऊन ठेविलें होतें कीं, 'आपण विभक्त झालों आणि तुम्हीं माझ्या बुद्धीनं चाललां, तर तुम्हांला त्यांतला भाग मिळाल्याविना खास राहणार नाहीं.' अन्नपूर्णाबाईना हें बोलणें खरें वाटत होतें आणि इकडे गोविंदरावहि विठ्ठलरावांच्या गोडगोड थापांना भुलून गेले होते. अर्थात्, विठ्ठलराव आणि भागीरथीबाई यांच्याप्रमाणें हें जोडपेंहि विभक्त होण्यासाठीं अधीर होऊं लागलें होतें. कलहाग्नि दिवसें-दिवस अधिकाधिक चेतूं लागला. पूर्वी पूर्वी जनार्दनपंत घरीं असले म्हणजे उघडपणें तंटाभांडण होत नसे, त्यांच्या धाकानें जिकडे तिकडे गुपचूप

असे; परंतु आतां आतां त्यांचीहि कोणी फारशी पर्वा करीत नसे. त्यांच्यासमक्ष मोठमोठ्यानें वितंडवाद माजविण्यास धाकटी जाऊ किंवा सासू यांच्यावर, आणि वेळ आली तर प्रत्यक्ष जनार्दनपंतांवरसुद्धां तोंडसुख घेण्यास, त्यांना नाहीं नाहीं तें बोलण्यास भागीरथीबाई किंवा अन्नपूर्णाबाई हल्लीं मुळींच भीत नसत. दोघींपैकीं कोणी एकीनें जरी भांडणास सुरुवात केली असली, तरी दुसरी तत्काळ तिच्या साहाय्यास धांवत असे !

स्वत:च्याच घरांत असा पदोपदीं सोसावा लागणारा अपमान जनार्दनपंतांना पराकाष्ठेचा दुःसह होत होता. त्यांच्या सौख्यसूचक गंभीर मुद्रेवर खिन्नतेची छाया स्पष्ट दिसत होती. दुसऱ्यांच्या कुटुंबांतील तंटेबखेडे मोडून टाकण्याच्या कामीं ज्या जनार्दनपंतांचा सर्वत्र लौकिक असे, त्याच जनार्दनपंतांनीं स्वतःच्या कुटुंबांतील तंटे मोडण्यासाठीं केलेले सर्व श्रम निष्फळ झाले. आपलें सर्व चातुर्य खर्च करूनहि त्यांना आपल्या कुटुंबांत शांति स्थापन करतां येईना. आपल्या अविचाराच्या बळानें ज्यांनीं एखाद्या धूर्त मंत्र्याप्रमाणें शेंकडों गृहराज्यांत शांतता स्थापन केली होती, त्याच जनार्दनपंतांना आज स्वत:च्या घरांत तो मंत्रप्रयोग करण्याची वेळ आली असतां त्या शांतिदायक मंत्राची विस्मृति पडली ! ही विस्मृतीच या जगाच्या नाशास कारणीभूत होत आहे; परंतु असें म्हणण्यांत तरी अर्थ काय ? अशा गोष्टी न घडल्या, तर या पृथ्वींत पृथ्वीत्व तरी राहिलें असतें कसें ? कलीचें अस्तित्व भासलें असतें कसें ? संसारी प्राण्यांना हा संसार जाणवला असता कसा ? आणि त्यांना स्वार्थज्ञान तरी राहिलें असतें कसें ? पुनः सत्ययुगच आलें असतें ! एवढ्यासाठींच मोठमोठे मी मी म्हणणारे विलक्षण बुद्धिवान् आणि तेजस्वी पुरुषदेखील मधून मधून असे घसरतांना दृष्टीस पडतात.

जनार्दनपंत देशमुख आपल्या कुटुंबाची पुढें काय अवस्था होईल या विवंचनेनें व्यग्र होऊन गेले होते. त्यांची मुद्रा निस्तेज झाली होती. शरीर दिवसेंदिवस क्षीण होत चाललें होतें. सदासर्वदा ते दुर्धर चिंतेंत मग्न झालेले दिसत. याप्रमाणें एक एक दिवस चालला होता. काय करावें हें कांहीं केल्या त्यांना सुचेना.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें अन्नपूर्णाबाईनीं आपल्या पतीचे कान भारले त्याच्या तिसऱ्या दिवशीं जनार्दनपंत दिवाणखान्यांत नेहमींप्रमाणें चिंता करीत बसले होते, इतक्यांत विनायकरावहि तेथें येऊन बसले. त्यांना पाहून

जनार्दनपंतांनीं एक दुःखाचा सुस्कारा सोडला आणि म्हटलें "विनू! तुझी रजा संपत आली. चारदोन दिवसांनीं तुला आतां जावें लागेल. तुला कांहीं सांगावें म्हणून मी रोज विचार करतों, पण आजवर कांहीं तें जमलें नाहीं. एव्हांपासून संसाराची चिंता पाठीशी लागली म्हणजे शिक्षणाला व्यत्यय येतो; परंतु त्याला कांहीं इलाज राहिला नाहीं. न सांगून यापुढें कांहीं चालण्याजोगें नाहीं. नीट ऐकून घे मी काय सांगतों तें. घरांत हल्लीं काय चाललें आहे तें तूं पहातोसच; त्याबद्दल काय विचार करावा ?"

विनायकरावांनीं खालीं पाहून उत्तर दिलें "आपण काय कराल तें खरें. मला काय त्यांत कळतें आहे ?"

"अरे विनू! असें आतां किती दिवस चालणार ? माझा आतां वृद्धापकाळ झाला आहे. आमचें आतां काय घेऊन बसलास ? त्यांत तुझ्या भावांचे एकएक चाळे पाहून तर माझी अक्कलच गुंग होऊन गेली आहे."

विनायकराव कांहीं बोलले नाहींत, जनार्दनपंतच पुढें बोलूं लागले "अरे, मी बाप म्हणून पाहिजे तर नका माझी पर्वा करूं, पण माझ्या वयाला तरी कांहीं मान द्या! मीं कांहीं सांगितलें कीं, त्याच्या विरुद्ध यांचें वर्तन. मी म्हणजे जणूं काय यांचा हाडवैरी लागून गेलों आहें! हिताहित गुलामांना कळत नाहीं, मन मानेल तसें करीत असतात. घराण्याचा लौकिक कसा राखतील तो राखोत, नारायणालाच त्याची काळजी!" बोलतां बोलतां जनार्दनपंतांची मुद्रा अगदीं गंभीर झाली. ते पुढें म्हणाले, "तूं आपला बहुधा मुंबईसच असतोस, संसाराची कांहीं काळजी तुला नाहीं; परंतु बाबा, हल्लीं जे कांहीं प्रकार चालले आहेत त्यावरून तूं आतां थोडेबहुत संसारांत लक्ष्य घालावेंस हें चांगलें, असें मला वाटतें."

जनार्दनपंत थांबले आणि थोडा वेळ विचार करून पुढें म्हणाले "तुझा दादा म्हणजे पक्का कावेबाज आणि अप्पलपोट्या! पैशासाठीं काय करील याचा कांहीं नेम नाहीं. हा पैशाचा अनावर लोभ एक दिवस त्याला पक्का भोंवल्याखेरीज राहणार नाहीं. मीं त्याला पुष्कळ सांगून पाहिलें, पण त्याचें आपलें आहे तें आहे."

"त्यांत कांहीं मोठेंसें नाहीं. ही खोड आपोआप कांहीं दिवसांनीं जाईल." विनायकराव हळूच म्हणाले.

" तुला काय वेड लागलें आहे ! ही कांहीं अशी तशी खोड नव्हे. जन्माचें नुकसान केल्याशिवाय ती जायची नाहीं. अरे, एव्हांपासून तुम्हांला ठक-विण्याचे त्याचे आंतल्या आंत उद्योग चालले आहेत; पण ध्यानांत ठेव, अशी भिकेची हांडी कधींहि शिक्याला चढायचीं नाहीं ! पैशाच्या लोभानें जो प्रत्यक्ष आपल्या पाठच्या भावांबहिणींनाहि ठकविण्यास तयार झाला, तो आणखी काय करणार नाहीं ? अशा कावेबाज, धनलोभी मनुष्याला संसारांत कधीहि सुख व्हायचें नाहीं. जो दुसऱ्याला खाड्यात घालण्याची मसलत करील, तो आज म्हणा किंवा आणखी चार दिवसांनीं म्हणा, पण स्वतः खाड्यांत पडल्याविना रहावयाचा नाहीं !"

वडिलांचें बोलणें अक्षरशः खरें आहे, अशी विनायकरावांची पक्की खात्री झाली; परंतु ते कांहींएक न बोलतां स्तब्धपणें ऐकत होते.

" बरें, गोंद्या तो तर शुद्ध नंदीबैल आहे. गुलामाला कवडीची देखील अक्कल नाहीं. बायको म्हणेल ती याची पूर्वदिशा ! हे दोघे माझ्या संसाराचें वाटोळें करायला बसले आहेत. या गुलामांच्या डोक्यांत जर कांहीं अक्कल असती, तर हे तमाशे कशाला झाले असते आणि माझ्या संसाराची तरी धूळधाण कशाला होती ? विनू ! तूं पक्कें लक्ष्यांत ठेव कीं, ज्या घरांत बायकांनीं मर्यादा सोडली, त्या घरांतून लक्ष्मीचें ठाणें उठलेंच ! बायका आपली मर्यादा धरून राहिल्या म्हणजे त्या खरोखर या संसारांतील देवता आहेत; परंतु तीच का त्यांनीं एकवार मर्यादा सोडली, म्हणजे त्या कधीं अगोधतीला जातील, कांहीं सांगतां येणार नाहीं. मग त्या पिशाचापेक्षांहि पिशाचें होतात. या मूर्खांना कांहीं हें कळत नाहीं. भोगतील आपल्या कर्माचीं फळें ! बायकांना दाबांत ठेवण्याची बुद्धि आणि ताकद तरी आहे कुठें याच्या अंगांत ? तुझ्या भावजयांचे एक एक चाळे पाहून मला आतां अगदीं वीट आला आहे या संसाराचा. एक दिवस देखील येथें रहायची माझी इच्छा नाहीं. रात्रंदिवस माझ्या डोळ्यांसमोर हेंच दिसतें, दुसरें मला कांहींएक सुचत नाहीं."

जनार्दनपंतांची मुद्रा अगदीं खिन्न झाली. ते पुढें म्हणाले " विनू, मीं आतां सांगितलें तें नीट ध्यानांत धर, आणि कोणता मनुष्य कसा आहे हें ओळखायला शीक. नाहीं तर पदोपदीं संकटांत सांपडशील. माझा मानलौकिक जो कांहीं आहे, तो राखण्याचा भार आतां सर्वतोपरी तुझ्यावर आहे. आपलें काय आहे नाहीं तें पाहून घ्या. मी आपला आतां काशीयात्रेला जाणार."

वडिलांचें हें भाषण ऐकून विनायकरावांना फार वाईट वाटलें. वडिलांना अतिशय दुःख होत आहे, हें ते समजून चुकले. इतक्यांत गोविंदराव शाळेंतून घरीं आले आणि त्यांच्या मागोमाग विठ्ठलरावहि येऊन थडकले. वडिलांच्या आज्ञेवरून दोघेहि विनायकरावाजवळ बसले. जनार्दनपंतांनीं त्यांना संसारासंबंधीं अनेक गोष्टी सांगितल्या आणि शेवटीं ते म्हणाले "तुम्हांला तिघांनाहि मी पुनः एकदा सांगतों कीं, बाबांनों! या तंट्यावखेड्यांचें मूळ नाहींसें होईल असें करा. आपापल्या बायकांना चांगलें शासन द्या, म्हणजे रोज उठून मला शिव्यागाळी ऐकाव्या लागणार नाहींत. माझ्या घरांतील तंटे मिटविण्याकरितां बाहेरचे लोक गोळा व्हावे, हें मला मुळींच सहन होत नाहीं. जर तुम्हांला याप्रमाणें वागावयाचें नसेल, तर मला तसें स्पष्ट सांगा, म्हणजे मीच आपला कोठें तरी निघून जातों."

बोलतां बोलतां जनार्दनपंतांचे डोळे भरून आले. त्यांच्यानें पुढें बोलवेना. विनायकरावांचें हृदय कळवळलें. आपल्या अभिष्टसिद्धीचा योग जवळ येत चालला हें पाहून विठ्ठलरावांना मनांतल्या मनांत परमानंद झाला. गोविंदरावांच्या मनावर याचा मुळींच कांहीं परिणाम झाला नाहीं.

---

प्रकरण दहावें

## तिघे भाऊ

वडिलांनीं सांगितलेल्या एकंदर गोष्टी ऐकून विनायकरावांना फार वाईट वाटलें. घरासंबधीं इतके दिवस ते जी उदासीनता दाखवीत होते, ती आतां सोडून देण्याचा त्यांनीं निश्चय केला. काय केलें असतां भावांभावांमध्यें पुनः खराखरा प्रेमभाव उत्पन्न होईल, भावजयांच्या मनांतील मत्सर निघून जाऊन त्या एकमेकींशीं चांगल्या रीतीनें वागूं लागतील, आपल्या वाडवडिलांचा आजवर चालत आलेला लौकिक कायम राहील, इत्यादि विचार रात्रंदिवस त्यांच्या मनांत घोळूं लागले. या दुर्धर चिंतेपुढें रजा कधीं संपली, हें देखील त्यांना समजलें नाहीं. उद्यां मुंबईस जावयाचें तो आदल्या दिवशीं संधि साधून त्यांनीं आपल्या दोघां वडील भावांना एकत्र गांठलें आणि त्यांच्याजवळ ही गोष्ट काढिली. ते म्हणाले "बाबांनीं त्या दिवशीं जें सांगितलें त्याबद्दल आपल्याला कांहीं तरी विचार केला पाहिजे. आधींच त्यांचे म्हातार-

पण झालेलें, त्यांत संसाराची काळजीहि पाठीशीं आहेच. तेव्हां अशा स्थितींत आपल्या वेड्यावांकड्या वर्तनानें आपण त्यांना निष्कारण कष्ट देणें योग्य नाहीं—"

"मग कोण सांगतो? ज्याचा त्यानें आपल्यापुरता विचार पहावा. लहान तोंडीं मोठा घांस घेण्याच्या भानगडींत पडूं नये!" एखाद्याला निष्कारण टोंचून बोलणें म्हणजे विठ्ठलरावांना कांहींच वाटत नसे.

विनायकरावाना दादांचें हें बोलणे कसेंसेंच वाटले. ते नम्रतेनें म्हणाले "पण दादा, ही गोष्ट मला एकट्यालाच कशी करतां येईल? आपण सर्वांनीं एकमतानें—"

कपाळाला आंठ्या घालून विठ्ठलराव कर्कश स्वरानें मध्येंच म्हणाले "हे जे तंटे होतात, त्यांच्या मुळाशीं कोण आहे त्याचा नीट तपास करून त्याला शासन करा, म्हणजे झाले. त्यांत एकमत आणि बहुमत पाहिजे कशाला?"

"मी तरी तेंच म्हणतों." विनायकराव म्हणाले. "पण मी एकटा याचा तपास करून काय होणार? थोड्याबहुत प्रमाणानें सर्वांचाच यांत दोष असणार. केवळ एकाच हातानें टाळी वाजेल, असें संभवत नाहीं."

या कामीं सरस्वतीचाहि थोडाबहुत दोष असल्याचे कबूल केले, हे पाहून विठ्ठलरावाना मनांतल्या मनांत आनंद झाला आणि आपली पत्नी अगदींच निर्दोषी आहे, असें दाखविण्यासाठीं ते निर्लज्जासारखें तोंड करून मोठ्या डौलानें म्हणाले "मूर्खपणा तो हाच! एका हातानें टाळी कदाचित् नसेल वाजत, पण तेवढ्यावरून एक मनुष्य भांडण करूं शकणार नाहीं, असें म्हणणे म्हणजे निव्वळ मूर्खपणा. तुझ्या मनांत सगळ्यांच्याच बोडक्यावर खापर फोडायचे आहे वाटतें?"

"खापर फोडण्याची गोष्ट कोणीं का—"

पण विठ्ठलराव मध्येंच म्हणाले "नाहीं तर काय? एखादें मनुष्य विना-कारण एखाद्याला त्रास देईल किंवा अज्ञान मुलानें एखादी खाण्याची वस्तु तोंडांत घातली म्हणून तेवढ्यावरून जर कुणी त्या मुलाला मारमारून त्याचा प्राण घेण्यास निघेल, तर अशा वेळीं एखाद दुसरा शब्द तोंडांतून काढणें म्हणजे मोठाच अपराध म्हणावयाचा नाहीं का?"

गोविंदरावांची स्वारी हा वेळपर्यंत स्तब्ध होती. अन्नपूर्णाबाईंनीं दिलेल्या कानमंत्राचा प्रयोग करण्याची संधि साधण्यासाठीं ते टपून बसले होते. ती

संधि त्यांना आतां मिळाली. दादांचें बोलणें पुरें होतें न होतें तोंच ते म्हणाले "कुणीं आपले कपडे वाळत घातले असले तर गुपचुप फाडून टाकावे, मन मानेल तसें एखाद्यावर तोंड सोडावें, आणि याबद्दल कुणी कांहीं बोलायला गेलें म्हणजे त्याजवरच भांडण केल्याचा उलट आरोप आणावा, नाहीं का?"

बिचाऱ्या विनायकरावांच्या काळजाला सारखे चरके बसत होते दुःखितांतःकरणानें ते म्हणाले "मी तरी तेंच सांगत आहें. हे सर्व चाळे कोण करतें, याचा तपास लावून त्याला चांगली शिक्षा करावी, असेंच माझेहि म्हणणें आहे."

हें ऐकून गोविंदराव विठ्ठलरावाच्या तोंडाकडे पहात म्हणाले "मग त्यांत बोलायला आणि सांगायला कशाला पाहिजे? चांगली आठवण राहीशी शिक्षा केली पाहिजे झालें"

"तर आणखी काय!" विठ्ठलरावहि भिवया चढवून म्हणाले. विनायकराव तत्काळ समजून चुकले कीं, आपल्या दोघांहि वडील बंधूंच्या मताप्रमाणें हा सर्व अपराध आपल्याच पत्नीचा आहे. विनायकरावांना फार दुःख झालें. ते कातरस्वरानें म्हणाले "उगाच नुसत्या संशयावरून कशी कुणाला शिक्षा करावी?"

"संशय! संशय रे कशाला पाहिजे? या सगळया माकडचेष्टा कोण करतें, हें तुला कळत नाहीं वाटतें?" गोविंदराव रागानें म्हणाले.

"नाहीं, बरोबरसें नाहीं कळत."

"कशाला कळेल आता! शिकवतांना तरी कळत होतें का? अरे, तुम्ही इंग्रजी शिकलेली पोरें अशींच! खोटे बोलायला म्हणजे तुम्हांला कांहींच वाटत नाहीं!"

अन्नपूर्णाबाईच्या ओंजळीनें पाणी पिणाऱ्या गोविंदरावांचे हे शब्द बिचाऱ्या विनायकरावांच्या हृदयाला जाऊन पोंचले. त्यांच्या अंतःकरणाची तळमळ होऊं लागली, संतापानें आणि दुःखानें त्यांच्या डोळयांतून अश्रु वाहूं लागले. भावाला न कळत त्यांनीं आपले अश्रु पुसून काढलें; परंतु अतःकरणाची खळबळ कांहीं केल्या शांत होईना. त्यांना असत्यवादी, कपटी समजून गोविंदरावांनीं त्यांच्याशीं जें तिरस्कार येण्याजोगें वर्तन केलें, त्याच्या योगानें त्यांना पराकाष्ठेचें दुःख झालें. संसारांत अगदींच अनभिज्ञ आणि सरळ स्वभावाचे विनायकराव पुनः कातर स्वरानें म्हणाले "अप्पा! उगाच कां बरें असें बोलतोस? मी तर आजवर कधींहि खोटा शब्द म्हणून या तोंडानें उच्चारला नाहीं, किंवा कुणाला दुसऱ्याचे कपडेहि चोरून फाडायला शिकविलें नाहीं."

विनायकरावांचें सरळ आणि कातरस्वरानें उच्चारलेलें हें भाषण ऐकून गोविंदराव किंचित् विरमले. अन्नपूर्णाबाईंच्या सांगण्याच्या खरेपणाबद्दल देखील त्यांना किंचित् संशय आला. परंतु तो केवळ क्षणभरच ! आपण आतां माघार घेतली, तर आपली बायको आपल्याला मूर्ख म्हणून आपला तिरस्कार करण्याला खास चुकायची नाहीं, ही गोष्ट तत्काळ त्यांच्यापुढें उभी राहिली, आणि त्याबरोबर त्यांचें मन पुनः बदललें. भागीरथीबाईला आणि अन्नपूर्णाबाईला दाराच्या आड उभें राहून दुसऱ्याच्या गोष्टी ऐकण्याचा मोठा प्रबळ रोग होता. बाहेर दिवाणखान्यांत किंवा घरांत कोठेंहि कोणीं कांहीं बोललें, तरी यांना तें तत्काळ कळल्याविना रहात नसे. बायकोच्या तंत्रानें चालणारे गोविंदराव आपल्या कजाग बायकोला संतुष्ट करण्यासाठीं पूर्वीपेक्षांहि कठोर हृदय करून मोठ्या रागानें म्हणाले " तो लाघवीपणा मला समजतो. आणखी एक मी तुला सांगतों. घरांत खोलीला कडी लावून बायकोजवळ आमचीं नाकें ठेंचायची जर पुनः गोष्ट काढशील तर सांभाळून रहा. थोबाड फिरवून टाकीन इकडचें तिकडे, समजलास ! मजजवळ तें आंतबाहेर चालायचें नाहीं ! मी स्पष्ट बोलणारा मनुष्य आहें."

हें ऐकून विनायकरावांची स्थिति काय झाली असेल, ती कल्पनेनेंच जाणिली पाहिजे. किती वेळ तरी त्यांच्या तोंडांतून शब्द उमटेना. आपल्या वडील बंधूंच्या बुद्धीला असा भ्रंश कशानें झाला, हेंच त्यांच्या ध्यानांत येईना ! त्यांचें तोंड उतरलें, मुद्रा खिन्न झाली, तरी देखील थोड्या वेळानें ते किंचित् रागानें म्हणाले, " अप्पा, कोणा तरी दुष्ट मनुष्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून तूं मला उगाच दोष देत आहेस. मी इतका का अधम आहें ? तुझें बोलणें ऐकून मला मोठी लाज वाटत आहे आणि दुःखहि होत आहे. मी पायां पडतों हवा तर, पण या सगळ्या भयंकर खोट्यानाट्या गोष्टी तुझ्या मनांत कुणीं भरवून दिल्या, तें मला एकवार सांग."

साध्या भोळ्या विनायकरावांनीं खरोखरच गोविंदरावांच्या पायांवर हात ठेविला. त्यांची सुंदर मुद्रा आरक्त दिसूं लागली. अन्नपूर्णाबाईंच्या कानमंत्रानें गोविंदराव पक्के भारले होते. विनायकरावांचें करुणाजनक आणि सरळ भाषण ऐकून त्यांचे हृदय द्रवतें न द्रवतें, तोंच अन्नपूर्णाबाईंची मूर्ति त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. त्याबरोबर ते घाबरून गेले. अंतःकरणांतील दयामाया कठोरपणानें काढून टाकून त्यांनीं नारसिंह अवतार धारण केला. आपल्या

पायांवरील आपल्या धाकट्या भावाचा हात हिसडून टाकून ते क्रुद्धस्वरानें म्हणाले " बस्स बस्स ! अप्पाबिप्पा करण्याचें काम नाहीं ! दोन बुकें इंग्रजी शिकला नाहींस तोंच इतका ताठा नको करायाला ! असे पायलीचे पन्नास इंग्रजी शिकलेले लोक मी पाहिले आहेत. पण तेवढ्यावरून ज्यांचीं त्यांचीं नाकें उंचण्याचा उद्योग ते नाहीं करीत, किंवा अशी मूर्खपणाची बडबडहि नाहीं करीत !"

गोविंदराव थांबले; परंतु इतक्यांत त्यांना आणखी कांहीं स्मरण झालें. त्याबरोबर ते पुनः म्हणाले " काय रे ! मीं सांगितल्या त्या सगळ्या गोष्टी खोट्याच नाहीं का ? बरोबर आहे ! आम्ही म्हणतों तें सगळें खोटें. तुम्ही दोघे नवराबायको जें कांहीं म्हणतां तें मात्र अगदीं खरें !"

विनायकरावांची अक्कल गुंग झाली. घरांतील तंट्याबखेड्यांचें बीज काढून टाकण्याची त्यांची आशा समूळ नष्ट झाली. आपल्या दोघांहि वडील भावांचा मूर्खपणा आणि दुर्बुद्धि पाहून त्यांना फार लाज वाटूं लागली आणि पराकाष्ठेचें दुःखहि झालें. पुनः त्यांचे डोळे अश्रूंनीं भरून आले, बऱ्याच वेळानें मन किंचित् स्वस्थ झाल्यावर ते विठ्ठलरावांकडे वळून मोठ्या नाखुषीनें म्हणाले " दादा ! तुम्ही तरी याचा विचार करा. माझा यांत कांहीं दोष असेल तर लागेल ती शिक्षा भोगण्याला मी तयार आहें; पण हे खोटेनाटे आरोप ऐकून माझा जीव जळत आहे. मी तुमच्या पायां पडतों, तुम्ही तरी याचा कांहीं निकाल करा."

" मला ते विचार आणि निकाल कांहीं समजत नाहीं. तुझ्या मनास येईल तें तूं करून घे." विठ्ठलरावांनीं कर्कश स्वरानें रोकडा जबाब दिला.

विनायकराव अगदीं हताश झाले आणि पुढें कांहींएक न बोलतां तेथून उठून गेले. ते गेले असें पाहून गोविंदराव विठ्ठलरावांस म्हणाले " पहा कशी मिजास चढून गेली आहे ती !"

" आज किती दिवस माझ्या लक्ष्यांत आली आहे ही गोष्ट. ऐट तर मोठी पण बायकोला शिक्षा लावण्याची कांहीं छाती नाहीं !"

विठ्ठलराव आणि गोविंदराव यांचें अगदीं एक मत पडूं लागलें. विठ्ठलरावांची स्वारी मोठी धूर्त आणि कावेबाज होती. त्यांनीं पाहिलें कीं, गोविंदराव आणि विनायकराव यांचा परस्पर तंटा लावून दिला, म्हणजे आपलें काम झालें. विभक्त होण्याचा मार्ग सुलभ होऊन शिवाय आपण अगदीं नामानिराळे !

विनायकरावांची बुद्धि आणि उदार प्रकृति यांची त्यांना चांगली ओळख असल्यामुळें त्यांच्याजवळ आपली डाळ शिजणार नाहीं, हें ते पक्कें जाणून होते, आणि एवढ्याचसाठीं तर त्यांनीं अक्कलशून्य गोविंदरावांना हातीं धरिलें होतें. त्यांचें वरकांतीं प्रेम आणि कळकळ पाहून मूर्ख गोविंदराव तेव्हांच भुलून गेले आणि त्यांच्या तंत्रानें चालून त्यांच्या उपदेशानुरूप दिवसेंदिवस कलहाग्नि अधिकाधिक वाढवूं लागले.

या वेळेपासून विनायकरावांनींहि त्याचें पाणी ओळखलें. अप्पांच्या बुद्धीची धांव कोठवर होती, हें त्यांना कळून आलें. कुत्र्याचें शेंपूट सरळ करण्याचें काम असाध्य आहे, हें त्यांच्या पूर्ण प्रत्ययास आलें. कारणाशिवायहि भांडण होणें संभवनीय आहे, हेंच तर काय, परंतु मूर्ख मनुष्यासंबंधीं सर्व कांहीं संभवनीय आहे, याबद्दलचीहि त्यांची पूर्ण खात्री झाली. विनायकरावांनीं आपले वडील, मातुःश्री आणि त्याचप्रमाणें आपली पत्नी यांना हा सर्व वृत्तांत सांगितला. सरस्वतीला नाना प्रकारें सदुपदेश करून, वडीलमातुःश्रींना प्रणाम करून ते मोठ्या जड अंतःकरणानें मुंबईस जाण्यास निघाले. वडील बंधूंना आणि भावजयांना जातेवेळीं नमस्कार करण्याचें या खेपेला त्यांच्या जिवावर आलें.

---

प्रकरण अकरावें

## दोघे मित्र

विनायकराव आणि जगन्नाथराव हे सहाध्यायी असून गेलीं सात वर्षे दोघेहि एके ठिकाणीं अभ्यास करीत होते. दोघांनींहि बरोबरच कॉलेजांत प्रवेश केला होता. दोघांची प्रवेशपरीक्षाहि एकाच वर्षीं झाली होती; हल्लींहि ते कॉलेजांतील 'बोर्डिंग' मध्यें रहात असून दोघांचें बसणें उठणेंहि एकाच ठिकाणीं असे. कोठेंहि जावयाचें झालें तरी ते दोघे बरोबर असावयाचे. सुटी होतांच घरीं देखील दोघे बरोबर जावयास निघावयाचे. असा अगदीं अकृत्रिम स्नेह जमला होता. सख्ख्या भावापेक्षांहि ते एकमेकांना अधिक मानीत असत. तशांतून विनायकरावांची पत्नी सरस्वती ही जगन्नाथरावांच्या गांवची होती, इतकेंच नव्हे तर त्यांच्या नातलगांपैकीं होती. ती जरी नात्यानें त्यांची दूरची बहीण लागत असे, तरी जगन्नाथराव तिला सख्ख्या बहिणीपेक्षांहि अधिक मानीत. सरस्वती तर लहानपणीं त्यांना 'जगूदादा' याच नांवानें हाक मारीत असे, हें मागें

सांगितलेंच आहे. इकडे, जगन्नाथरावांची प्रियपत्नी यमुना ही विनायकरावांच्या नातलगांपैकीं होती. इतर बाबतींतहि त्या दोघांच्या स्थितींत बरेंच साम्य होतें. जगन्नाथरावांचा जन्म उच्च कुलांत झाला असून त्यांचे वडील फार सधन गृहस्थ होते. देशमुखांचें घराणेंहि केवळ असें तसें नसून निदान विनायकरावांना तरी गरिबी म्हणजे काय याचा अनुभव स्वप्नांत देखील आला नव्हता. एकमेकांच्या घरींहि एकमेकांचें जाणेंयेणें होतें. याप्रमाणें परस्परांच्या मनांत परस्परांविषयीं उत्पन्न झालेला अकृत्रिम स्नेहभाव दिवसेंदिवस वृद्धिंगत होत होता.

विनायकराव मुंबईस आल्याच्या दुसरे दिवशीं संध्याकाळीं उभयतां मित्र फिरावयास गेले असतां जगन्नाथरावांनीं त्यांच्या घराकडील गोष्टी काढिल्या. त्याबरोबर विनायकरावांची सदोदित प्रफुल्ल असणारी मुद्रा खिन्न दिसूं लागली. तें पाहून जगन्नाथराव मोठ्या कळकळीनें म्हणाले "या खेपेला घर कांहीं तुला मानवलें नाहीं. तोंडावर तजेला कसा तो मुळींच दिसत नाहीं."

विनायकरावांनीं एक मोठा उसासा सोडला आणि खिन्न स्वरानें ते म्हणाले "न मानवायला काय झालें? ईश्वराच्या कृतीला मान दिलाच पाहिजे. तो ठेवील त्या स्थितींत संतोष मानून राहिलेंच पाहिजे. कारण, त्याचें करणें नेहमीं आपल्या हितासाठींच असतें. आपण अदूरदृष्टि मनुष्यें, आपल्याला हें मुळींच कळत नाहीं. आपण आपल्या मनाला उगाच त्रास करून घेत असतों—"

हें उत्तर ऐकतांच जगन्नाथराव समजून चुकले कीं, विनायकरावांच्या मनाला अगदीं लागून रहाण्याजोगी कांहींना कांहीं गोष्ट घरीं घडून आली आहे. त्यांनीं विचारलें "गंगूची प्रकृति ठीक आहे ना?"

"हो."

"बरें, मुलें सगळीं खुशाल आहेत?"

"सगळीं खुशाल आहेत."

"आई आणि बाबा?"

"शारीरिक पीडा तरी कांहीं दिसत नाहीं."

"मग कांहीं मानसिक पीडा आहे वाटतें?"

"मानसिक यातना मात्र त्यांना पराकाष्ठेच्या भोगाव्या लागत आहेत."

"तें सांगणें मोठ्या दुःखाची आणि मोठ्या शरमेची गोष्ट आहे; परंतु तुला सांगितल्याशिवाय मनाला समाधान व्हावयाचें नाहीं."

इतकें बोलून विनायकराव स्तब्ध राहिले.

हें पाहून जगन्नाथराव म्हणाले " काय झालें असेल तें मोकळें मन करून सांग. मी कुणी परका नाहीं !"

विनायकराव गंभीर मुद्रेनें आपल्या घरची एकंदर स्थिति हलुहळू सांगूं लागले. आपले वडील बंधु आणि दोघी भावजया मनसोक्त वर्तन करून आपल्या वृद्ध वडिलांचा आणि मातुःश्रींचा पदोपदीं कसा अपमान करितात आणि क्षणोक्षणीं त्यांना कसा ताप देतात, कोणाचाहि दाब न राहिल्यामुळें उच्छृंखल झालेल्या आपल्या भावजयांच्या कर्णकटु शब्दांनीं विद्ध होऊन आपली सरळ स्वभावाची पत्नी रात्रंदिवस कशी अश्रु ढाळीत असते, भावा-भावांमधील हा कलहाग्नि विझवून टाकण्यासाठीं आपण कसकसे प्रयत्न केले आणि त्याचा काय परिणाम झाला, दोघांहि वडील बंधूंनीं आपल्याला कसें झिडकारून टाकिलें, आपल्यावरच खोटें बोलण्याचा, वाईट रीतीनें वागण्याचा वगैरे कसा आरोप आणिला, इत्यादि एकूणएक गोष्टी जगन्नाथरावांना सांगून शेवटीं ते म्हणाले " आतां घरीं सुख म्हणून काय तें राहिलें नाहीं आणि घरीं जायची इच्छाहि राहिली नाहीं; परंतु जगन्नाथ ! काय सांगूं, आईची आणि बाबांची ती खिन्न आणि दुःखानें व्याप्त झालेली मुद्रा पाहिली, त्यांच्या डोळयांत पाणी आलेलें दृष्टीस पडलें, म्हणजे माझा जीव तिळतिळ तुटूं लागतो! त्यांचा विचार मनांत आला म्हणजे सदोदित धुसफुस चाललेल्या घरीं देखील एकवार जावें असें वाटतें—"

" पण त्यांना असें करायला कारण तरी काय ?"

" तें आपल्याला कसें कळणार ?"

" दररोज तंटेभांडणें होतात कीं काय ?"

" अरे दररोजशीं काय ? दर घटकेस कां म्हणेनास !"

हा वृत्तांत ऐकून जगन्नाथराव एकंदर प्रकार समजून चुकले. विनायक-रावांच्या स्थितीबद्दल त्यांना फार दुःख झालें. ते म्हणाले " हें असेंच व्हायचें. माझ्या बोलण्याचा राग मानूं नकोस, पण विनायक ! तुझे दादा आणि अप्पा या दोघांनाहि सुशिक्षणाचा कसा तो गंध देखील नाहीं. सुशील, संभावित मंडळींत जाणेंयेणें नाहीं. कोळीकुणबी हे त्यांचे स्नेही. रात्रंदिवस हलकट मंडळींशीं त्यांचा सहवास. अर्थात्, त्यांचें वर्तनहि तसेंच होऊन गेलें आहे. नीच संसर्गानें त्यांच्याहि मनोवृत्ति नीच बनून गेल्या आहेत. संभावितपणाची

आणि सद्वर्तनाची त्यांना ओळखदेखील राहिली नाहीं. मनाचा मोठेपणा किंवा औदार्य यांचा पूर्णपणें लोप होऊन त्यांचीं मनें क्षुद्र बनून गेलीं आहेत. बायकांना वेळोवेळीं सदुपदेश करून कशा धाकांत ठेवाव्या, याची त्यांना माहिती नाहीं; आणि त्याचप्रमाणें बायकांवरचा एकदा धाक उडून त्या उच्छृंखल झाल्या म्हणजे संसाराची कशी धूळधाण उडत असते, सुखासमाधानानें नांदणाऱ्या कुटुंबांत मग कलीचा प्रवेश कसा होत असतो, आपल्या मुलांलेंकरांच्या कोंवळ्या मनावर यामुळें काय परिणाम होतो, हें समजण्याची त्यांच्या अंगीं मुळींच शक्ति नाहीं."

आपल्या वडील बंधूंचें जगन्नाथरावांनीं रेखाटलेलें हें खेदजनक चित्र पाहून विनायकरावांना दुःख झालें. ते व्यथित अंतःकरणानें म्हणाले "मुलांना ते एव्हांपासून जें कांहीं शिक्षण देत असतात, तें समजलें असतां तूं चकित होऊन जाशील. आंबेविक्याच्या टोपलींतून त्याला न कळत आंबेच आण, कुणाच्या परसांतले पेरूच चोरून आण, कुणाची कांहीं वस्तु विसरून राहिली कीं, तीच पळव, हे धडे त्या बिचाऱ्या अज्ञान पोरांना रोज मिळत असतात! मग त्यांनीं तरी काय करावें? यावरून मी एक दिवस आमच्या हरीवर खुब रागावलों आणि त्याला दोन तडाके दिले. त्याबरोबर आमच्या वहिनींनीं जें कांहीं आकाशपाताळ एक करून सोडलें आहे कीं, सांगायची सोय नाहीं! दोन तास सारखी गर्जना चालली होती. म्हणूं लागली कीं, ममतेनें जवळ येऊन पुतण्याला एखादी खायची वस्तु द्यायला नाहीं सुचायचें, पण दुसऱ्यांच्या पोरांना विनाकारण मारून प्राण घ्यायला मात्र सगळे तयार! मीं तर हें ऐकून थक्क झालों. दादांच्या कानांवर ती गोष्ट घातली पण त्यांना मुळीं तें खरेंच वाटलें नाहीं!"

"नाहींच वाटणार! अरे असें पहा, पुढें मोठेपणीं जो धंदा करून चरितार्थ चालविला पाहिजे, त्या धंद्याचें मुलांना जर आईबापांनीं लहानपणापासून शिक्षण दिलें नाहीं, तर त्यांनीं आपलें कर्तव्य योग्य बजाविलें असें कोण म्हणेल! या सत्कर्माच्या तूं आड आलास, तेव्हां तुला शिव्या नाहीं तर आणखी काय मिळणार? त्यांच्यामुळें दुसऱ्यांना किती त्रास भोगावा लागतो, याची त्यांना कल्पना देखील नाहीं. विनायक, तुझ्या दादांची गोष्ट मनांत आली म्हणजे अद्यापीहि मला हंसू येतें. गेल्या मे महिन्याच्या रजेंत मी तुमच्या घरीं आलों होतों तेव्हां कांहीं वर्तमानपत्रें वगैरे मीं बरोबर घेतलीं

होतीं. वेळ सांपडला म्हणजे मधूनमधून तीं मी वाचीत असें; हें पाहून एके दिवशीं मला तुझ्या दादासाहेबांनीं गंभीर मुद्रेनें विचारलें ‘ ही वाचून तुम्हांला काय हो मिळतें ? उगाच कागदांत पैसे घालवायचे !’ हें ऐकून मला खरोखर हंसूं आलें. मी म्हणालों ‘ कां बरें ! चोंहोंकडे काय चाललें आहे तें समजतें, ठिकठिकाणची हालहवाल कळते.’ हें ऐकून दादासाहेब म्हणाले ‘ आम्हीं आजवर कधीं कांहीं असल्या पंचायती केल्या नाहींत; पण आमचें बुवा कांहीं अडून राहिलेलें नाहीं मला आठवत ! शिवाय ‘ ही ठिकठिकाणची हालहवाल समजून तुम्हाला काय लाभ ? आपल्या घरची हालहवाल नीट समजून घेऊन त्याप्रमाणें वागतां आलें म्हणजे झालें.’ हा उपदेश ऐकून मी मनांतल्या मनांत हंसलों आणि स्वस्थ राहिलों. पुनः उत्तर म्हणून देण्याच्या भानगडींत पडलों नाहीं. विनायक ! आतां तूंच सांग, अशा मनुष्यांना आपल्या मुलांना दुसरें चांगलें काय शिकवतां येणार आहे ? अरे बाबा, पैसा खर्च झाल्याविना आंबे, पेरू किंवा अशाच दुसऱ्या वस्तु मिळाल्याबद्दल ते उलट मुलांवर संतुष्ट व्हायचे !”

“ होतात, खरोखरच होतात. हा एकंदर प्रकार पाहून माझी मति तर गुंग होऊन जाते. पुढची स्थिति डोळयांसमोर दिसूं लागून मन व्याकुळ होतें. त्या घरीं जाण्याचें नांव देखील काढूं नयेसें वाटतें.”

“ तुझे प्रयत्न सगळे निष्फल होणार. तूं हिताची गोष्ट सांगूं लागलास तरी देखील त्यांना तें विपरीत वाटेल. बायकांच्या चिथावणीनें तुझे भाऊ असें निंद्य वर्तन करण्याला तयार झाले आहेत, त्यांना आतां उपदेशाचा यत्किंचितहि उपयोग होण्याची आशा नाहीं. तेव्हां आपलें स्तब्ध बसावें हाच उत्तम मार्ग. असल्या तालमींत तयार झालेलीं हीं यांची मुलें पुढें वयांत आल्यावर जेव्हां यांच्यावर हत्यार धरतील, आईबापांची भीड मुरवत न धरतां उलट त्यांना चापांत धरूं लागतील, चोरी लबाडी करून तुरुंगांत जातील-आईबापांच्या नांवाचा चोहोंकडे डंका वाजवितील, तेव्हांच यांचे डोळे उघडतील आणि तेव्हांच यांना तुझी आठवण होईल !”

“ त्यांच्याबद्दलची काळजीच मी आतांपासून सोडून देतों. परंतु बाबांना आणि आईला आतां या वयांत जो पराकाष्ठेचा त्रास सोसावा लागत आहे, त्याचें निवारण करण्यास काय उपाय करावा ? आणि सरस्वतीची—”

" उपाय काय करायचा! पाहूं काय होतें तें. गंगूचें पत्र आलें म्हणजे सर्व हकीगत कळेल. मनुष्य किती नीच वृत्तीला पोंचेल, किती निंद्य वर्तन करूं लागेल, याची कांहीं कल्पना करतां येत नाहीं! यांच्या बायका म्हणजे तरी केवढ्या गुणाच्या खाणी लागून गेल्या आहेत, आणि त्यांना संतुष्ट राखण्यासाठीं हे आईबाप, भाऊबहिणी यांना देखील छळायला तयार झाले आहेत! मी म्हणतों, यांना लाज तरी कशी वाटत नाहीं?"

" लाज? अरे ती तर यांना भिऊन केव्हांच पळून गेली आहे बिचारी! वडील भाऊ म्हणजे प्रत्यक्ष बापाप्रमाणें; त्यांच्याविरुद्ध बोलण्याचा प्रसंग यावा म्हणजे केवढें दुर्भाग्य! आजवर मी कधीं त्यांच्याजवळ फारसा बोलतच नसें, तेव्हां त्यांचा स्वभावहि मला बरोबरसा कळून आला नव्हता; परंतु या खेपेला दोनतीन दिवस त्यांच्या तोंडांतून बाहेर पडलेलीं जीं मुक्ताफळें ऐकिलीं त्यांची आठवण झाली म्हणजे मनाला फार दुःख होतें आणि लाज वाटूं लागते. वडील भावांच्या तोंडच्या अशा गोष्टी ऐकून घ्याव्या लागतील, असें मला स्वप्नांत देखील कधीं वाटलें नव्हतें."

" तें जाऊं दे आतां. झालें तें झालें. पुढचा कांहीं विचार करायला लाग. एव्हांपासून नीट सावधगिरीनें वागत गेलास तर ठीक, नाहींपेक्षां कांहीं धड चिन्ह दिसत नाहीं. मूर्ख शत्रूशीं गांठ असली म्हणजे प्रसंग मोठा कठीण आहे, हें ध्यानांत धर. ज्यांना आपलें हिताहित कळत नाहीं, ते कांहीं देखील करायला चुकायचे नाहींत. कोणत्या गोष्टीचा काय परिणाम होईल, किंवा ती आपल्याला कशी अनिष्ट होईल, हा विचार प्रारंभीं त्यांच्या मनाला शिवत देखील नाहीं; किंबहुना हें समजण्यापुरती त्यांच्या डोक्यांत अक्कलच नसते म्हटलें तरी चालेल, अर्थात्, कोणतीहि गोष्ट करायला ते भ्यायचे म्हणून नाहींत. आणखी एक गोष्ट तुला सांगतों. वेळीं अवेळीं यांना नसतें महत्त्व देऊन यांच्यासमोर स्तब्ध रहात जाऊं नकोस. कारण, ज्याला अशा वर्तनाची किंमत कळत नाहीं, त्याला महत्त्व देऊन तरी फायदा काय? शहाण्या शत्रूनें केलेला अपमान शांतपणें सहन केला, तर तो स्वतःच मनांतल्या मनांत शरमतो आणि पुढें सावध रहातो; परंतु मूर्खानें केलेला अपमान निमूटपणें सहन केला तर तो समजतो, कीं त्याचा प्रतिकार करण्याची तुमच्या अंगीं ताकदच नाहीं. अर्थात्, तो उत्तरोत्तर तुमची अधिकाधिक पाठ पुरवूं लागतो हें नीट ध्यानांत धर. या जगांत आपल्यासारखेच सगळे लोक आहेत, असा तुझा

समज असेल तर तो अगदीं चुकीचा आहे; इतकेंच नव्हे, तर तो अपायकारकहि आहे. हा समज तुला पदोपदीं घोटाळ्यांत घातल्याशिवाय सोडणार नाहीं, हें पक्कें समजून रहा."

विनायकराव एकाग्र चित्तानें आपल्या मित्राचें बोलणें ऐकत होते. आपल्या कुटुंबाविषयींचें त्यांचें मत हळुहळू बदलत चाललें होतें.

---

प्रकरण बारावें

## पत्र आणि उत्तर

मुंबईस आल्यावर कांहीं दिवसांनीं विनायकरावांनीं आपल्या पत्नीला पुढील पत्र लिहिलें—

" प्रेमालंकृत अनेक आशीर्वाद विशेष—

सरस्वती ! तुला वाटत असेल कीं, इकडे आल्याबरोबर पत्र पाठवीन म्हणून कबूल होतें, तें मीं विसरूनच गेलों ! परंतु तसें मुळींच नाहीं. तुझी गोष्ट मनात आली म्हणजे मी व्याकुल होऊन जातों आणि मग तुला काय लिहावें, हें देखील मला सुचत नाहींसें होतें. यामुळें आज किती दिवस झाले तरी पत्र लिहिण्याचें कांहीं घडून आलें नाहीं. अशा वृद्धावस्थेंत बाबांना आणि आईला किती यातना सोसाव्या लागत असतील, कसे मानसिक कष्ट भोगून दिवस काढावे लागत असतील आणि तुला तरी किती छळ सोसावा लागत असेल, या दुर्धर चिंतेंत रात्रंदिवस माझें मन व्यग्र होऊन गेलेलें असतें, त्यापुढें दुसरें कांहींएक सुचत नाहीं. येथे आल्या घटकेपासून एक क्षणभर देखील मला तुझी विस्मृति पडली नाहीं. या इतक्या दिवसांत एखादें पुस्तक उघडून दोन पानें वाचल्याचें कांहीं मला स्मरत नाहीं. ही कुटुंबाची चिंता म्हणजे माझ्या अभ्यासांत मोठाच व्यत्यय होऊन बसली आहे; परंतु पुनः असें वाटतें, कीं या अनिवार्य गोष्टींसंबंधीं व्यर्थ चिंता करून तरी काय फळ ? ईश्वराच्या कृपेनें तुम्ही सर्वजण आजवर खुशाल आहां—जास्तकमी कांहींएक घडून आलें नाहीं, अशी आशा आहे. गेल्या खेपेला घरीं जे कांहीं प्रकार मी पाहून आलों आहे ते मनांत आले म्हणजे अक्कल गुंग होते व अशा अवस्थेंत तुला काय उपदेश करावा, कोणत्या मार्गानें चालण्यास सांगावें, हें माझें मलाच सुचत नाहींसें होतें ! मनुष्यें इतक्या नीच वृत्तींचा अंगीकार

करतील, आईबापांवर भक्ति करण्याचें सोडून उलट त्यांच्याशींच असें निंद्य वर्तन करूं लागतील, बंधुप्रेमाची ओळखदेखील विसरून जातील, हें मला कधींहि खरें वाटलें नसतें. उच्चवर्णातील स्त्रिया या नीच मत्सराला बळी पडून आपल्या पतीच्या मनांत नाहीं नाहीं तें भरवून देण्यास सिद्ध होतील आणि प्रत्यक्ष सासूसासऱ्यांचाहि तिरस्कार करून त्यांची पदोपदीं अवज्ञा करण्यास धजतील, अशी आजवर माझी कल्पना देखील नव्हती. आणि त्याचप्रमाणें सरळ रीतीनें वर्तन करणाराजवळ वाईट आणि खोडसाळपणाचें वर्तन करण्यास, प्रेमाचा मोबदला द्वेषानें देण्यास, विनयशील आणि नम्रतेच्या बोलण्याला कठोर आणि मर्मभेदक प्रत्युत्तर देण्यास कित्येक मनुष्यें कमी करणार नाहींत, असेंहि मला वाटलें नव्हतें. या जगांत असा परमावधीचा नीचपणा भरला असेल, असें मला मुळींच वाटलें नव्हतें. अर्थात्, प्रत्यक्ष आपल्या घरांत—आपल्याच वडील बंधूंच्या व आपल्या भावजयांच्या अंगीं तो असलेला पहाण्याचा अनिष्ट प्रसंग येईल ही गोष्ट तर माझ्या स्वप्नांत देखील कधीं आली नव्हती !

असो. पुरे झाल्या या गोष्टी. पुनः पुनः त्यांचा खल करीत बसण्यांत अर्थ नाहीं ! मी आतां तुला दोन शब्द सांगतों, ते नीट ध्यानांत धर. आजवर मी तुला ज्या उद्देशानें उपदेश करीत आलों, तसा उपदेश आज मला या पत्रांत करतां येत नाहीं, हें मी माझें दुर्दैव समजतों. या पूर्वी मी तुला अनेक वेळा सांगितलेंच आहे व आजहि आणखी सांगतों कीं, तुझ्या वडील जावांबद्दल कोणत्याहि प्रकारचा कुढाभाव तूं कधींहि मनांत बाळगूं नकोस. त्यांच्यावर पूर्ववत् भक्ति असूं दे, त्यांच्या मुलांबाळांवर अंतःकरणात प्रेम वसूं दे; परंतु इतकेंच कीं, ती भक्ति किंवा तें प्रेम बाहेर मात्र दाखवीत जाऊं नकोस. कारण, तूं सद्बुद्धीनें कांहीं देऊं जाशील आणि तें त्या कुबुद्धीनें घेतील; अर्थात्, कलहाला मात्र कारण होईल. तूं प्रेमानें रामूला कडेवर घेतेस याच केवळ अपराधावरून त्या अज्ञान अर्भकाला मरेमरेतों मार खावा लागतो. किंवा तूं मोठ्या कळवळ्यानें त्याला पाजण्यासाठीं आईजवळ नेला असतां स्तनपानाऐवजीं त्या बिचाऱ्याला मातुःश्रीच्या लाथाबुक्या खाव्या लागतात ! तेव्हां अशा स्थितींत तूं त्याच्यावर प्रेम न केलेलेंच बरें नव्हे काय ? हाच न्याय सगळीकडे लागू पडतो. मागचें पुढचें धोरण पाहून वर्तन ठेवलें पाहिजे. जो अमृतपान करूं इच्छित नाहीं, त्याला बळानें तें पाजूं लागलों तर विषाप्रमाणेंच तो तें थुंकून टाकील,

हें पक्कें लक्ष्यांत ठेव. कुणाच्याहि तोंडाला तोंड देऊं नकोस. कुणी तिरस्कार केला तरी नम्रतेनें तो सहन करीत जा. कुणीं अगदीं टाकून बोलूं लागलें तरी माझ्याकडे पाहून तें निमूटपणें सहन करीत जा. हा मार्ग तूं स्वीकारलास तर म्हणजे या त्रासांपासून पूर्णपणें मुक्त होशील, असें मला देखील वाटत नाहीं. परंतु यामुळें तंटे मात्र किंचित् कमी होतील. कारण माझी खात्री आहे कीं, तूं जरी त्यांच्या तोंडाला तोंड दिलें नाहींस, तरी देखील तूं त्यांना अनंत शिव्या दिल्यास असें त्या आपल्या पतीला सांगण्यास मुळींच कमी करणार नाहींत; परंतु त्यांच्या बोलण्याला तूं जर का एका शब्दानें उत्तर दिलेंस, तर त्या तत्काळ पिकवितील कीं, तूं त्यांना नाहीं नाहीं त्या शिव्यागाळी दिल्यास, त्यांना मारायाला उठली होतीस; इतकेंच नव्हे, तर त्यांच्या मुलाबाळांच्या नांवानें देखील तूं बोटें मोडीत होतीस! एवढ्याचसाठीं मी सांगतों कीं, त्यांचा छळ तूं निमूटपणें सहन कर. कुणालाहि उत्तर देण्याच्या भानगडींत म्हणून पडूं नकोस.

आईची आणि बाबांची सेवाशुश्रूषा करण्याचा संपूर्ण भार आतां तुझ्यावरच आहे, हें कधींहि विसरूं नकोस. सगळीं कामें बाजूला ठेवून अगोदर ज्यापासून त्यांना सुख होईल, शांति लाभेल, मानसिक यातना कमी होतील, असे करीत जा. आमच्या कुणाच्याहि दुर्वर्तनानें त्यांच्या मनाला कष्ट होऊन त्यांच्या डोळ्यांतून एक जरी अश्रु निघेल, तरी त्याचें फळ आम्हां सर्वांनाच भोगावें लागेल, हें पक्कें लक्ष्यांत ठेव. जास्तकमी कांहीं हकीगत घडल्यास ती सावंत लिहून कळवीत जा. माझ्या अभ्यासांत व्यत्यय येईल, किंवा माझ्या मनाला त्रास होईल, अशा विचारानें माझ्यापासून कोणतीहि गोष्ट लपवून ठेवूं नकोस. असें करशील तर मात्र उलट मला अधिक त्रास होईल. कारण, एकवार अंतःकरणांत संशयाला जागा मिळाली कीं, शांतीनें आपलें ठाणें तेथून उठविलेंच म्हणून समज. मग काल्पनिक गोष्टी खऱ्या मानून मन अहोरात्र चिंतामग्न होऊन राहतें. यास्तव प्रत्येक गोष्ट जशी घडेल तशीच मला सविस्तर लिहून कळवीत जा, बिलकुल अनमान करूं नकोस.

आतां अधिक तें काय लिहूं? एकच गोष्ट सांगायची आहे—सारा दिवस अश्रु गाळीत बसून मनाला कष्ट देऊं नकोस!

कळावें, हे आशीर्वाद.

विनायक"

या पत्रास सरस्वतीकडून पुढील उत्तर आलें—

" सेवेशीं विज्ञापना विशेष—

आपलें आशीर्वादपत्र वाचून फार आनंद झाला. इकडचें पत्र आलें म्हणजे मला हातीं स्वर्ग आल्यासारखें होतें. शुष्क झालेल्या माझ्या प्राणांवर जणूं अमृताचा वर्षावच होतो! पत्र आल्यापासून पुढें दोनतीन दिवस मला कष्ट म्हणून कसे ते जाणवतच नाहींत. जाऊबाईकडून होणाऱ्या निष्कारण तिरस्काराचें दिखील मला फारसें कांहीं वाटत नाहीं. सगळ्या गोष्टी विसरून जाऊन मी सुखसमुद्रांत पोहूं लागतें व माझ्या साऱ्या कल्पनाहि मग सुखमय बनून जातात. परंतु एकंदरींत मी खरोखरच मोठी हतभागिनी आहें. आणि म्हणूनच मी मनांत आणतें त्याच्या उलट नेहमीं घडून येत असतें. माझ्या सौभाग्यानें जेव्हां मी इकडच्या पदरांत पडलें, तेव्हा इकडचें तें हंसतमुख पाहून आणि त्याचप्रमाणें मामंजींचें आणि सासूबाईचें आनंदाचें आणि ममतेचें भाषण ऐकून मला जो कांहीं आल्हाद झाला, तो सांगतां येत नाहीं. मीं तेव्हां मनांतल्या मनांत म्हटलें कीं, माझ्या पूर्वपुण्याईनेंच मी या कुटुंबांत पडलें. कारण, अशीं सुखी कुटुंबे क्वचितच पहाण्यांत येतात. आतांहि म्हणजे मामंजी किंवा सासूबाई पूर्वीप्रमाणें मला वागवीत नाहींत, असें मुळींच नाहीं; उलट, आतां तर तीं दोघे माझ्यावर पूर्वीपेक्षांहि अधिक ममता करतात; परंतु त्यांच्या मुद्रेवर आतां तो पूर्वींचा तजेला राहिला नाहीं; त्यांचा तो आनंद पार मावळून गेल्यासारखा दिसतो; प्रफुल्लतेची तर छायाहि राहिली नाहीं. तीं दोघेंहि आतां सदोदित खिन्न आणि दुःखी दिसतात. सासूबाईच्या डोळ्यांत तर कधींकधीं पाणीहि आलेलें दिसतें. मीं सहज कुठें याबद्दल विचारिलें, तर तत्काळ डोळे पुसून टाकून, नाहीं ग वेडे, मी ग कशाला रडत बसूं, असें म्हणून त्या माझेंच उलट समाधान करूं लागतात. दुसरें कांहींएक बोलत नाहींत. त्या बोलोत कीं न बोलोत, मला तें सारें समजतें; पण उपयोग काय? त्यांचें दुःख दूर करणें माझ्या हातीं का आहे?

'प्रत्येक गोष्ट जशी घडेल तशी लिहून कळवीत जा' म्हणून लिहायचें पण मी लिहूं कशी? दहा वाईट गोष्टींबरोबर एक जरी चांगली गोष्ट कळविण्याजोगी असती तर कांहींहि लिहिण्यास मीं मागेपुढें पाहिलें नसतें. केवळ तंटेभांडणें आणि रडणेंओरडणें याच हकीगती लिहून इकडच्या मनाला आणखी कष्ट देण्याचें माझ्या अगदीं जिवावर आलें आहे; परंतु काय करूं?

प्रत्यक्ष देवाची आज्ञादिखील मी एक वेळ मानणार नाहीं, पण इकडची आज्ञा अमान्य करणें मजकडून कधींहि व्हावयाचें नाहीं. देव करो, आणि ज्या दिवशीं मला अशी दुष्ट वासना होईल, तोच माझ्या आयुष्याचा शेवटचा दिवस होवो! माझी इच्छा आणि अनिच्छा कसली! इकडची इच्छा तीच माझी इच्छा आणि इकडची अनिच्छा तीच माझीहि अनिच्छा! तेव्हां नाइलाजास्तव इकडून जायचें झाल्या दिवसापासून ज्या ज्या हकीगती घडल्या आहेत, त्या लिहितें.

आपल्या मोरूदादांची बायको गरोदर असल्याचें माहीत असेलच. गेल्या गुरुवारीं तिचें डोहाळेजेवण झालें, तेव्हां आम्हां साऱ्यांना आमंत्रण आलें होतें. माझ्या मनांतून जायचें नव्हतें, पण सासूबाईंच्या पराकाष्ठेच्या आग्रहा-पुढें माझें कांहीं चाललें नाहीं. सासूबाई, जाऊबाई, अन्नपूर्णाबाई यांच्याबरोबर मलाहि जावें लागलें. तेथून परत आल्यावर माझी पैठणी मीं बाहेर उन्हांत वाळत घातली होती. सध्याकाळीं ती आणायला गेलें, तों ती चांगली हातभर फाटलेली! खरोखर सांगतें, सोन्यासारख्या माझ्या नव्या पैठणीची अशी दशा झालेली पाहून मला अतिशयच दुःख झाले. सासूबाई हें पाहून काय म्हणतील, याची मला भीति वाटूं लागली. आतां काय करावें, असा विचार करीतकरीत मीं गुपचूप पैठणीची घडी घातली आणि सासूबाईंच्या नकळत ती तशीच पेटींत ठेवूं लागलें. तोंच यमू माझ्या मागून तेथे आली आणि 'पाहूं दे ग पैठणी कशी आहे ती?' असें म्हणून तिनें ती माझ्या हातांतून हिसकावून घेतली आणि घडी मोडून ती ती पाहूं लागली. अर्थात्, तें फाटलेलें तिच्या तत्काळ दृष्टीस पडले. त्याबरोबर दचकल्यासारखें करून ती मोठ्यानें म्हणाली 'हें ग काय? सोन्यासारख्या नव्या पैठणीची कुणीं अशी दशा केली ही?' सासूबाई जवळच होत्या; त्यांनीं हे बोलणें ऐकिलें आणि त्यांनीं सहजच 'काय ग झालें यमू?' म्हणून विचारलें. यमूनें ती फाटलेली पैठणी त्यांना दाखविली. ती पहातांच सासूबाई एकदम चकित झाल्या आणि क्रोधानें एकसारख्या बडबडूं लागल्या. नांव मात्र त्यांनीं कुणाचें घेतले नाहीं. सासूबाईंचें तोंड वाजूं लागतांच मोठ्या जाऊबाई, व मधल्या जाऊबाई या दोघीहि त्यांच्यावर अगदीं तुटून पडल्या आणि तोंडास येईल तें त्यांना बोलूं लागल्या. बिचाऱ्या सासूबाई खोलींत जाऊन रडत बसल्या. पुढें रामूचे बाबा आणि गंगूचे बाबा घरीं आल्यावर त्या दोघीहि मोठमोठ्यानें रडूं लागल्या आणि नाहीं नाहीं तें तोंडानें भकूं लागल्या. तें ऐकून ते दोघेहि मला उद्देशून अगदीं अश्लील

आणि अभद्र शब्द बोलत सुटले. सासूबाईंना कांहीं तें सहन झालें नाहीं. त्या म्हणाल्या ' अरे, तुम्ही पुरुष होऊन त्या पोरीला नाहींनाहीं त्या शिव्या देतां, तोंडांतून उच्चारूं नये असे शब्द बोलतां, तुम्हांला मेल्यानों लाज कशी नाहीं वाटत ? यापेक्षां झाला तेव्हांच मेला असतां तरी बरें झाले असतें !' या बोलण्यानें तर आगींत तेल ओतल्यासारखेंच झालें. तीं चौघेहि सासूबाईं-वर दांतओंठ खाऊं लागलीं; इतकेंच नव्हे, मोठ्या भावजींनीं तर त्यांच्या-वर हातदिखील उगारला ! हें पाहून सासूबाई अगदीं गांगरून गेल्या आणि मोठमोठ्यानें रडूं लागल्या. इतक्यांत भिवा धावतधावत जाऊन मामंजींना घेऊन आला. हा एकंदर अनन्वित प्रकार पाहून मामंजी मटकन् खालींच बसले. मला तर वाटतें कीं, बेशुद्ध पडले होते. जवळजवळ अर्धा तास ते कांहीं बोलले नाहींत; परंतु मोठे भावजी, अप्पा भावजी, मोठ्या जाऊबाई आणि मधल्या जाऊबाई यांची बडबड एकसारखी चाललीच होती. मामंजीना तें सहन झालें नाहीं. त्यांनीं ' तुम्हांला चूप रहायचें आहे ?' असें रागीट स्वरानें विचारलें. मोठे भावजी जवळच होते, ते म्हणाले ' हे असें होऊं लागलें, तर कोण चूप बसणार आहे ? ही सरस्वती ज्याच्यात्याच्या नांवानें अशा खोट्यानाट्या गोष्टी पिकवते आणि आई तिचा पक्ष घेऊन ज्यालात्याला उगाच शिव्यागाळी देत सुटते. याचा कांहींतरी अगोदर बंदोबस्त करा. मी स्पष्ट सांगतों कीं, मी निष्कारण कोणाचें ऐकून घ्यायचा नाहीं !' ' खरोखरच मी आज याचा पुरा बंदोबस्त करून टाकतों. मात्र ज्याचा अपराध आहे असें दिसून येईल त्याला मी क्षमा म्हणून करणार नाहीं, हें पक्कें लक्ष्यांत ठेवा.' असें रागारागानें बोलून मामंजींनीं मोठ्या जाऊबाईना आणि मधल्या जाऊबाईना आपल्या समोर बोलाविलें आणि दरडावून विचारिलें ' सरस्वतीची ही पैठणी कुणीं फाडली ? तुम्हीं फाडलीत कीं नाहीं, खरें सांगा !"

त्या दोघीहि ती गोष्ट अजिबात नाकबूल करून रागारागानें तेथून निघून गेल्या. तेव्हां मामंजींनीं हरि, कृष्णी आणि वारू यांना समोर बोलावून डोळे लाल करून एकेकाला विचारिलें ' काय म्हणून ही पैठणी फाडलीत तें सांगा, नाहीं तर आज तुम्हांला मरेमरे तों मार देईन ! संभाळून रहा.' हें ऐकून हरि रडत सुटला, कांहींएक बोलला नाहीं. कृष्णी रडतरडत म्हणाली ' मला तुम्ही मारूं नका आजोबा. मीं कांहीं केले नाहीं. आईनें सांगितलें म्हणून मीं ती फाडली. 'मला तुम्ही मारूं नका. मीं जितकी फाडली तितकी शिवून देतें हवी

तर.' तिचें भाषण पुरें होतें न होतें तोंच वारू रडत रडत म्हणाली 'मी नाहीं पैठणी फाडली आजोबा! मी किं नाहीं, डबी विहिरींत टाकून दिली; पण मीं ती आतां काढून देतें आजोबा.' 'कसली डबी ?' म्हणून मामंजी चकित होऊन विचारूं लागले. कारण, ही गोष्ट अद्यापि आम्हां कुणाला समजलीच नव्हती. 'धाकट्या काकीची नथीची डबी!' वारूचें हें उत्तर ऐकतांच मी तशीच उठून खोलींत गेले आणि मोरू भावजीकडून परत आल्यावर नथ काढून ठेविली होती, ती पाहूं लागलें. तों ती खरोखरच तेथें नाहीं. मग वारूला घेऊन आम्ही विहिरीवर गेलों. वारूनें डबी कुठें टाकिली होती तें ठिकाण दाखवून दिलें. मामंजींच्या सांगण्यावरून भिवा आंत उतरला आणि मोठ्या कष्टानें त्यानें ती डबी बाहेर काढिली.

हा एकंदर प्रकार पाहून मामंजी रागानें थरथर कांपूं लागले. कृष्णी आणि वारू यांचे चांगले कान उपटून पुढें असें न करण्याविषयीं त्यांना अगदीं दरडावून सांगितलें आणि त्यांच्या वडिलांकडे पाहून ते रागीट स्वरानें म्हणाले 'आतां तरी समजलें कां कुणाचा दोष आहे तो ? नंदीबैल कुठले! अरे, डोळे असून असें आंधळ्यासारखे करूं नका. आपल्या बऱ्याची इच्छा असेल तर हे निंद्य व्यवहार आणि या माकडचेष्टा सोडून देण्याच्या उद्योगाला लागा. आपल्याच हातानें आपल्या पायांवर धोंडा मारून घेऊं नका.' हें ऐकून मोठे भावजी म्हणाले 'यांत काय झालें ? माराच्या धास्तीनें पोरांनीं एखाददुसरी गोष्ट कबूल केली, म्हणजे तो अपराध झाला वाटतें ?' वारूच्या बाबांनीं पण असेंच सांगितलें. मामंजींचा राग आतां मात्र अनावर झाला. त्यांनीं त्या दोघांनाहि झिडकारून लाविलें. तेहि मग तोंडास येईल तें मामंजींना बोलूं लागले. मोठ्या जाऊबाई आणि मधल्या जाऊबाई मोठमोठ्यानें रडूं लागल्या.

दुसऱ्या दिवशीं पहांटेस आपापलीं बायकामुलें घेऊन दोघेहि आपापल्या सासुरवाडीस निघून गेले. जातेवेळीं मामंजींनीं त्यांचें परोपरीनें निवारण केलें, समजूत करून पाहिली. शेवटीं 'या माझ्या पांढऱ्या केसांना बट्टा लावूं नका.' असें दिखील अगदीं गयावया करून सांगितलें; परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. त्यांच्या बोलण्याकडे लक्ष्य देण्याचें बाजूलाच राहिलें, उलट त्यांना शिव्यागाळी देत 'प्राण गेला तरी या घरांत आतां पाणीदिखील पिणार नाहीं!' अशी प्रतिज्ञा करून ते चालते झाले. जातांना चीजवस्त, कापडचोपड सर्व कांहीं बरोबर घेऊन गेले. मामंजी आणि सासूबाई त्या वेळेपासून बहुधा

शब्दहिखील उच्चारीत नाहींत. अगदींच जरूर पडेल तर एखादा शब्द बोलतात, नाहींपेक्षां सगळा दिवस अश्रु गाळींत असतात.

या एकंदर गोष्टीला मूळ कारण मी झालें, हें पाहून मला पराकाष्ठेचें दुःख होत आहे. ती फाटलेली पैठणी मीं जर तशीच लपवून ठेविली असती, तर हा अनिष्ट प्रसंग खरोखर टळला असता. मी याबद्दल क्षमा मागतें. एकवार घरीं येऊन जायला मिळेल तर बरें होईल. लिहितांलिहितां माझा हात दुखूं लागला, आतां अधिक लिहवत नाहीं. माझ्याबद्दल बिलकुल काळजी करूं नये. वारंवार खुशाली कळविण्याचें करावें.

सेवेशीं श्रुत होय, हे विज्ञापना,

आपली नम्र पत्नी,

**सरस्वती.**"

---

प्रकरण तेरावें

## आणखी खुलासा

सरस्वतीचें पत्र वाचून विनायकरावांचें हृदय पराकाष्ठेचें व्याकुळ झालें. आतां पुढें काय करावें, हें देखील त्यांना सुचेना. बिछान्यावर पडून ते भ्रमिष्टासारखे वर कडीपाटाकडे पहात राहिले. इतक्यांत जगन्नाथराव त्यांच्याजवळ आले आणि किंचित् हंसून म्हणालें "विनायकराव! आज कांहीं आनंदाची बातमी मला समजली आहे!"

परंतु त्यांच्या या बोलण्याकडे मुळींच लक्ष्य न देतां विनायकराव खिन्न आणि निराशाव्यंजक स्वरानें म्हणाले "जगन्नाथराव, आतां आमचें मुंबईस राहणें आटोपलें, आणि शिक्षणहि आटोपलें!"

इतकें बोलून ते क्षणभर स्तब्ध राहिले. नंतर एक मोठा उसासा सोडून पुनः म्हणाले "एकदोन दिवसांत मला घरीं गेलें पाहिजे."

जगन्नाथरावांनाहि यमुनेचें पत्र आलें होतें. त्यावरून त्यांनाहि विनायकरावांच्या घराकडील एकंदर हकीगत समजलीच होती. अर्थात्, विनायकरावांच्या अशा प्रकारच्या उद्गारांचें कारण काय असावें, हें त्यांना विचारण्याची आवश्यकता राहिली नव्हती. तरीहि "घरून कांहीं पत्र आलें आहे कीं काय?" असें त्यांनीं विनायकरावांना सहज विचारलें. त्यावर विनायकरावांनीं सरस्वती-

कडून आलेलें पत्र त्यांच्या हातीं दिलें; आपण स्वतः कांहींच बोलले नाहींत. तें पत्र साद्यंत वाचून जगन्नाथराव म्हणाले "विनायकराव, या दुःखकारक प्रसंगींहि गंगूचें वर्तन पाहून मला आनंद होत आहे. अशा स्त्रिया आमच्या समाजांत अधिक असल्या, तर आम्हांला दुःखाचा अनुभवच आला नसता!"

विनायकराव आपल्या प्रिय मित्राच्या मुखाकडे पाहूं लागले. हें पाहून जगन्नाथराव म्हणाले "तिची आवडती पैठणी फाडून टाकिली, नथ पाण्यांत फेकून दिली, तरी देखील त्या दिवशीं घडून आलेल्या त्या अनन्वित प्रकाराबद्दल ती आपल्यालाच दोषी समजत आहे! अशी सरळ आणि कोमल मनाची स्त्री मी कुठेंहि पाहिली नाहीं! आणखी सांगतों, माझ्या कानांवर ज्या गोष्टी आल्या आहेत त्या सांगितल्या असतां तुझ्या अंतःकरणाला झोंबतील. परंतु या अशा स्थितींत त्या गुप्त ठेवणें म्हणजे मीं माझें कर्तव्य न बजावणें असें होईल. गंगूनें लिहिलें आहे त्यापेक्षांहि आणखी बरेंच झालें आहे. तुझ्या मनाला दुःख होईल म्हणून तिनें फारसें कांहीं लिहिलें नाहीं, इतकेंच. तूं स्वस्थ बैस, मी एकंदर हकीगत सांगतों."

विनायकरावांचें मस्तक फिरूं लागलें. हृदय शून्य झालें. एखाद्या निरपराध मनुष्यावर खुनाचा अपराध ठेवून त्याला न्यायाधिशापुढें उभा केला असतां न्यायाधीश खटल्याचा निकाल सांगत असतांना त्याच्या मनाला जशी अनिर्वचनीय व्याकुलता येत असते, तशीच व्याकुलता विनायकरावांच्या मनाला येऊन त्यांना असह्य यातना होऊं लागल्या. आतां एका क्षणांत आपल्याला कांहीं भयंकर गोष्ट ऐकावी लागेल, या विचारानें वेड्यासारखें मन चंचल होऊन गेलें. ते म्हणाले "काय, काय झालें आहे? झटपट सांग कसें?"

जगन्नाथराव शांतपणानें म्हणाले "विनायक, असा अधीर होऊं नकोस. शांत चित्तानें ऐक. पैठणी कुणीं फाडली म्हणून प्रथम वादविवाद सुरू झाला. पुढें जेव्हां तुझे बाबा घरीं आले आणि त्यांनीं त्याबद्दल तपास करून दोन गुन्हेगार बाहेर काढले, तेव्हां तुझ्या आईनें तुझ्या दोघां भावजयांवर एकसारखें तोंड सोडलें. मग काय विचारतोस! त्यांनींहि सासूची षोडशोपचारें पूजा करण्यास मुळींच कमी केलें नाहीं. तुझे दादा आणि अप्पा दोघेहि स्तब्ध उभे होते. गुन्हेगार शोधून काढण्याच्या वडिलांच्या पद्धतीला नाकें मुरडण्यापलीकडे ते कांहींएक बोलले नाहींत. याप्रमाणें कलहाग्नि क्रमाक्रमानें अधिकाधिक चेतूं लागला. शेवटीं तुझ्या बाबांच्या दबकावणीनें तुझी आई चूप

राहिली; परंतु तुझ्या भावजयांचीं तोंडें मात्र कांहीं केल्या बंद होईनात. उत्तरोत्तर त्यांच्या जिव्हायंत्राचा अधिकाधिक भडिमार होऊं लागला. कानानें ऐकूं नये, असले अभद्र शब्द त्या बोलूं लागल्या. तुझी आई तर शेवटीं हताश होऊन रडूं लागली. हें पहातांच गंगूनें डोळ्यात आसवें आणून तुझ्या त्या मोठ्या भावजईचे पाय धरले आणि म्हणाली 'जाऊबाई, त्या पहा सासूबाई रडत आहेत; मी तुमच्या पायां पडतें, पण तुम्ही त्यांना अशा नका टाकून बोलूं. त्यांचा कीं नाहीं यांत कांहीं अपराध नाहीं.' गंगूच्या या विनवणीनें तिच्या त्या पाषाणहृदयी जावेला दया येण्याचें एकीकडेच राहिलें; उलट आपला पाय सोडवून घेण्याचें ढोंग करून त्या चांडाळणीनें त्या सुकुमार पोरीच्या छातींत थाडदिशीं लाथ मारली! आणि तोंड वेडेंवांकडें करून संतापानें म्हणाली ' पुरे झालं! इतका कांहीं प्रेमाला ऊत नको यायला बरं! अगोदर आग लावायची आणि मग पाण्याची घागर घेऊन धावायचं! कोण मेला चोंबडेपणा हा!' भागीरथीबाईच्या लाथेसरशीं गंगू कोलमडून भिंतीवर आपटली. तिच्या डोक्याला मोठी खोंक पडून तींतून भळभळ रक्त वाहूं लागलें."

बोलतांबोलतां जगन्नाथरावांचे डोळे भरून आले. संतापानें ते अगदीं लाल होऊन गेले. हे वर्तमान ऐकून विनायकराव मोठमोठ्यानें उसासे सोडूं लागले; परंतु एक अक्षरदेखील त्यांनीं उच्चारिलें नाहीं.

थोडा वेळ थांबून जगन्नाथराव पुनः बोलूं लागले "यमुना त्या वेळीं तेथेंच होती; गंगूची ती अवस्था पाहून तिनें तुझ्या बाबांना आणि आईला ताबडतोब हांक मारिली. त्याबरोबर त्यांनीं धावत येऊन गंगूला सावध केली आणि तिची जखम धुवून काढून तीवर पट्टी बसविली. विनायक, काय सांगूं! गंगूची ही अवस्था प्रत्यक्ष डोळ्यानें पाहूनहि तुझे दादा आपल्या पत्नीला एक अक्षर देखील बोलले नाहींत! तुझ्या बाबांचा राग मात्र अनावर झाला. त्यांनीं तुझ्या दादांची आणि अप्पांची यथास्थित धिड काढली. 'आतांच्या आत्तां येथून तोंड काळें करा' म्हणून त्यांना निक्षून सांगितलें, परंतु त्यांना कुठें त्याची लाज होती? 'हो हो' जातों म्हणजे काय?' असा म्हाताऱ्याच्या तोंडावर जबाब देऊन ते तत्काळ निघून जाण्याच्या विचारास लागले. लागलीच बांधाबांधीला सुरुवात झाली. पोरांनादेखील त्या रात्रीं अन्न मिळालें नाहीं; कुणी गडबड केल्यास ताबडतोब मुष्टिमोदक आणि चापटपोळया मात्र यथेच्छ मिळत होत्या. तुझ्या भावजयांनीं घरांत काय होतें नव्हतें तें बांधून घेतले आणि तुझ्या

बंधुराजांनीं गाड्याघोड्यांचा बंदोबस्त केला. तुझे बाबा, आई आणि गंगू या तिघांनाहि ती रात्र जेवणावांचून काढावी लागली. हो पोरांना उपाशीं ठेवून यांना तरी जेवण कसें सुचणार? दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटेस उठून म्हातारा, म्हातारी आणि गंगू या तिघांवर शिव्यांची लाखोली वाहून मंडळी चालती झाली. पोरांच्या मनांत जावयाचें नव्हतें, पण मारहाण होऊं लागल्यावर बिचाऱ्याचें काय चालणार? रामू तर शेवटपर्यंत 'काकी! काकी!' करून सारखा आक्रोश करीत होता."

---

प्रकरण चवदावें

## आतां आनंदाची बातमी ती कसली?

विनायकरावांनीं एक मोठा उसासा सोडिला आणि विचारलें "हें पत्र कधीं आलें?"

"आज सकाळच्या डांकेनें."

"कुणाजवळून ऐकली यमूनें ही सारी हकीगत?"

"तिनें दुसऱ्याजवळून ऐकून लिहिली नाहीं. ती तुमच्याच घरीं होती त्या दिवशीं."

यावर कांहींवेळ विचार करून विनायकराव म्हणाले "हो, बरोबर आहे. सरस्वतीच्या पत्रांत यमूचा उल्लेख आहे खरा. सरस्वतीला फार मोठी खोक पडली आहे का?"

"नाहीं, तसें कांहीं चिंता करण्याचें कारण नाहीं. खोक आतां बहुतेक भरत आली आहे. फारशी दुखतहि नाहीं आतां."

"हें कशावरून?"

"कशावरून म्हणजे! पत्रांत तें सारें लिहिलें आहे. आणि विनायकराव, दुसरें असें पहा, गंगू जर बरी नसती, तर तिनें आपल्या हातानें तुला पत्र लिहिलें असतें कसें? तूं निष्कारण असा घाबरा होऊं नकोस."

या शेवटच्या गोष्टीनें विनायकरावांना बराच धीर आला. आपल्यावर आलेल्या दुःखाचा विचार करण्याकरितां विनायकरावांना अवकाश मिळाला असतां बरें होईल, असें वाटल्यावर जगन्नाथराव हळूच उठून गेले. विनायकराव त्या दिवशीं कॉलेजांत गेले नाहींत. दुर्धर चिंतेंत व्याप्त होऊन ते तसेच तळमळत पडले होते. संध्याकाळीं सुटी होतांच जगन्नाथराव पुनः त्यांच्याजवळ येऊन बसले. बराच वेळ झाला तरी विनायकराव कांहीं बोलत नाहींत, हें

पाहून " चल, आतां थोडावेळ फिरायला जाऊं." असा जगन्नाथरावांनीं त्यांना आग्रह केला. विनायकरावांनीं थोडा वेळ आढेवेढे घेतले, परंतु शेवटीं जगन्नाथरावांबरोबर ते बाहेर पडले. फिरतफिरत दोघेहि वालुकेश्वराला वळसा घालून मलबार हिलवरील बागेंत येऊन पोहोंचले. तेथें दुसरी कितीतरी तरुण मंडळी यावेळीं फिरावयास आली होती. कित्येकजण गप्पागोष्टी सांगत होते, तर कित्येकजण खो खो हंसत होते. एका बाकांवर चौघेपांचजण तरुण विद्यार्थी बसून मोठ्या आवेशानें कांहीं वादविवाद करीत होते. त्यांच्याच पुढ्यांत फुलझाडांच्या आड उभें राहून कित्येक लहान मुलें मनसोक्त क्रीडा करीत होतीं. परंतु आमच्या विनायकरावांना आणि जगन्नाथरावांना त्या गप्पागोष्टी आवडल्या नाहींत किंवा तें हंसणें खिदळणेंहि गोड वाटलें नाहीं. त्या गंभीर वादविवादाकडेहि त्यांचें लक्ष्य गेलें नाहीं, किंवा त्या उल्हासपूर्ण बालकांच्या क्रीडेचेंहि त्यांना कौतुक वाटलें नाहीं. ते बागेच्या अगदीं एका टोंकाला जाऊन तेथें एका धक्क्यावर बसले. इकडच्यातिकडच्या कांहीं गोष्टी झाल्यानंतर जगन्नाथरावांनीं शांतपणें विचारलें " मग काय ? घरीं जायचा विचार नक्की ठरला का तुझा ?"

" हो, घरीं जाण्याचा आणि कॉलेज सोडण्याचा असे दोन्हीहि विचार नक्की झाले. अशा प्रसंगीं मी जर बाबाजवळ आणि आईजवळ नसलों, तर त्यांच्या दुःखाला पारावार रहाणार नाहीं. आईबापांचें दुःख दूर करतां आलें नाहीं तर युनिव्हर्सिटीच्या असतील नसतील त्या सर्व परीक्षा देऊन तरी काय भूषण मिळणार आहे !"

विचार केल्याशिवाय विनायकराव कोणतीहि गोष्ट बोलत नसत आणि त्याचप्रमाणें त्यांचा एकवार झालेला निश्चय फिरविणें म्हणजे कांहीं अशीतशी गोष्ट नव्हती, हें जगन्नाथरावांना पूर्णपणें माहीत होतें, तेव्हां कॉलेज सोडण्याबद्दलची गोष्ट अजिबात सोडून देऊन ते म्हणाले " त्याचा विचार करायला अवकाश आहे; पण मग उद्यांच घरीं जाणार कीं काय ?"

" हो उद्यांच; विलंब करून उपयोगी नाहीं. आजच पुनः बाबांचें पत्र आलें आहे. त्यांत त्यांनीहि ताबडतोब निघून येण्याविषयीं लिहिलें आहे. जगन्नाथराव, म्हातारपणीं काय हे त्यांना कष्ट !"

" अरे बाबा, हे सगळे ईश्वराच्या घरचे खेळ आहेत ! तुझेच एकंदर मनोरथ पहा कसे भग्न झाले ते ! तिघे भाऊ एकत्र राहून मोठ्या सौख्यानें

दिवस काढूं, आम्हां हिंदुलोकांच्या अविभक्त कुटुंबपद्धतीमुळें आमचें घर म्हणजे कसें सौख्याचें आगर होत असतें तें सर्वांच्या प्रत्ययास आणून देऊं; म्हणून आजवर तू केलेले सर्व मनोराज्य मनांतल्यामनांत ठेवण्याची वेळ आली."

" वडील भाऊ असें करतील अशी माझी कधीं कल्पनाहि धावली नव्हती!"

" हेंच तें! चुकतें तें इथेंच! पृथ्वींतले सगळे लोक आपल्यासारखे सरळ स्वभावाचे आणि उदार अंतःकरणाचे आहेत असें मानणें म्हणजे आपणच आपली प्रतारणा करून घेणें, स्वतःला विपद्ग्रस्त करून घेणे होय, ही गोष्ट तूं वारंवार विसरतोस! आतांतरी माझें ऐक. अविभक्त कुटुंबपद्धतीचा नाद आतां सोडून दे, नाहींपेक्षां रोज असे ' फार्स ' होतील. तुझे वडील भाऊ विभक्त होण्यासाठीं हपापले आहेत, त्यांची ती मनीषा पूर्ण होईपर्यंत ते हें असें करीत रहातील."

" बाबांच्या आणि आईच्या जिवांतजीव आहे तोंपर्यंत विभक्त होतां येणें अशक्य आहे. अशी नुस्ती गोष्ट त्यांच्याजवळ कोणीं काढिली, तरी त्यांना पराकाष्ठेचें दुःख झाल्याविना रहाणार नाहीं."

" तें सगळें खरें, पण याला आतां दुसरा उपायच राहिला नाहीं. रोज उठून हा त्रास आणि हें दुःख सोसण्यापेक्षां जर विभक्त झाल्यानें जिकडेतिकडे शांतता होत आहे, हा त्रास चुकतो आहे, तर विभक्त होणेंच श्रेयस्कर आहे. कारण, या रोगाला दुसरें औषधच राहिलें नाहीं! तूं आतां घरीं गेल्यावर आईला आणि बाबांना दोघांनाहि हें चांगलें समजावून सांग; दोघांहि वडील बंधूंना तसें कळीव; आणि एकवार सुखासमाधानानें विभक्त झालां, म्हणजे बाबा, आई आणि गंगू यांना घेऊन इकडे ये कसा! मग पुढचा विचार काय तो आपण पाहूं."

" बाबा आणि आई घर सोडण्याला कधींच कबूल व्हायचीं नाहींत."

" घर अजिबात सोडायला कशाला पाहिजे ? वर्षं दोन वर्षांनीं एखाददुसरा महिना खुशाल घरीं जाऊन रहावें. मुंबईत नेहमीं कथाकीर्तनें होत असतातच, तेव्हां इथे यायला बहुधा तीं नाहीं म्हणणार नाहींत."

" पण दादा आणि अप्पा कुठें यायचे आहेत घरीं ? ते तर जातांना प्रतिज्ञा करून गेले आहेत."

जगन्नाथराव किंचित् हंसून म्हणाले "त्यांच्या प्रतिज्ञेला तूं भिऊं नकोस. अरे वेड्या, अशी आनंदाची बातमी समजल्यावर ते नुस्ते पळत येतील पळत!"

विनायकरावांना जगन्नाथरावांचा उपदेश अगदींच वावगा वाटला नाहीं. हा मार्ग स्वीकारल्यानें जर कुटुंबांतील कलहाग्नि विझून जाईल, तर तो स्वीकारण्यास काय हरकत आहे?' असा ते आपल्याशींच विचार करूं लागले. कुटुंबांत पुनः शांतता स्थापन करतां येईल, या आशेनें त्यांच्या मनाला बरीच स्वस्थता आली. इतक्यांत जगन्नाथराव म्हणाले "आतां उगाच चिंता करीत बसून मनाला ताप देऊं नकोस. मीं सांगितला तो उपाय उत्तम आहे. घरीं जा आणि त्याप्रमाणें बेलाशक कर."

यावर विनायकराव कांहींच बोलले नाहींत. ही संधि पाहून जगन्नाथराव पुनः हंसतहंसत म्हणाले "बरें पण विनायकराव, मला जी आणखी एक आनंदाची बातमी समजली आहे, ती गंगूनें पत्रांत नाहींच लिहिली बरें का?"

"आतां आणखी आनंदाची बातमी ती कसली?"

"हो हो, आनंदाची म्हणजे, अलबत आनंदाचीच आहे! गंगूला कांहीं दिवस गेले आहेत. तुमच्या आईला आणि बाबांना या गोष्टीनें अत्यानंद होणार आहे. या अशा दुःखांत देखील या गोष्टीनें त्यांना अपार सुख होईल."

आपल्या वृद्ध आईबापांना आनंद होईल, हा विचार मनांत येऊन विनायकरावांचें अंतःकरणहि किंचित् आनंदित झालें.

---

## प्रकरण पंधरावें
## हा कोण लाजाळूपणा?

दुसऱ्या दिवशीं विनायकराव घरीं निघून गेले. घरीं येतांच वडील चारपांच दिवसांपासून तापानें पडले आहेत, ताप कांहीं केल्या कमी होत नाहीं, असें त्यांना समजलें. विनायकराव फार घाबरून गेले. संध्याकाळ झाली होती, बोटीचा त्रासदायक प्रवास, पोटांत हा वेळपर्यंत घांसभरसुद्धां अन्न नव्हतें, त्यांत घरीं पाय टाकतात न टाकतात तोंच ही बातमी समजली. विनायकरावांचें तोंड अगदींच सुकून गेलें. मुलगा आल्याचें समजतांच सगुणाबाई पुढें आल्या. विनायकरावांनीं मोठ्या आदरानें त्यांच्या चरणांवर मस्तक ठेविलें. मुलाचें तोंड अगदींच सुकून गेलेलें पाहून सगुणाबाईनीं विचारलें "विनू, अरे, अजून फराळबिराळ कांहीं केलासच नाहीं वाटतं?"

"नाहीं, मला आज भूकच मुळीं लागली नाहीं," असें विनायकरावांनीं कांहींतरी उडवाउडवीचें उत्तर दिलें; परंतु त्यानें सगुणाबाईचें समाधान झालें नाहीं. त्या तशाच स्वयंपाकघरांत जाऊन त्यांच्या जेवणाच्या तयारीला लागल्या. विनायकरावहि मग तडक जनार्दनपंतांच्या खोलीकडे गेले. पाहतात तों वडिलांच्या बिछान्याशेजारींच वैद्यबुवा बसले होते. विनायकरावांना आंत येतांना पाहून वैद्यबुवांनीं हातानें खूण करून त्यांना थांबविलें आणि ते आपणच उठून बाहेर आले. वडिलांच्या प्रकृतीविषयीं विनायकरावांनीं विचारण्यापूर्वीच वैद्यबुवा अगदीं हलक्या आवाजानें म्हणाले "आज तीन दिवसांत त्यांचा डोळ्याला डोळा देखील लागला नाहीं. किती औषधे दिलीं, किती मात्रा दिल्या, परंतु कांहींएक उपयोग झाला नाहीं. आज आतां त्यांना कुठें थोडीशी झोंप लागली आहे, तेव्हां ते होऊन जागे झाल्याविना त्यांची झोंप मोडणें योग्य होणार नाहीं. उद्यां सकाळीं तुम्ही येऊन खुशाल त्याच्याजवळ बोलत—"

"पण आतां त्यांची प्रकृति कशी आहे ?" विनायकरावांनीं अधीरतेनें विचारलें.

"ताप मुळींच उतरला नाहीं, अंगाला ओलावाहि आला नाहीं, परंतु त्यांना आज झोंप लागली आहे, त्या अर्थी आतां भिण्याचें कांहीं कारण नाहीं."

रात्रीं वैद्यबुवांनीं जनार्दनपंतांच्या खोलींत कोणालाच गर्दी करूं दिली नाहीं. सगुणाबाई आणि दुर्गा यांच्याखेरीज कोणीच तेथें गेलें नाहीं. विनायकराव कसेंबसें जेवण आटोपून आपल्या खोलींत गेले. सरस्वतीहि आपलें काम आटोपून त्यांच्या मागोमाग गेली. थोडा वेळ इकडच्यातिकडच्या गोष्टी झाल्यावर "खोंक कुठें पडली ती मला पाहूं दे." म्हणून विनायकराव आग्रह करूं लागले.

सरस्वती प्रथम ती गोष्टच उडवून देऊं लागली. आपल्या पतीला ही गोष्ट कशी कळली, याचाच ती विचार करूं लागली. शेवटीं विनायकरावांच्या पराकाष्ठेच्या आग्रहावरून तिनें दिव्यासमोर उभें राहून खोंक पडलेली जागा दाखविली. विनायकरावांनीं दिवा मोठा केला आणि आपल्या प्रिय पत्नीच्या मस्तकावरील केशगुच्छ बाजूला सारून तिनें दाखविलेल्या जागीं ते पाहूं लागले. जखम पहातांच त्यांच्या अंगावर शहारे आले. ती कांहीं केवळ लहान नव्हती; परंतु आतां ती बहुतेक भरत आली होती. विनायकरावांनीं विचारलें "पत्रांत तूं ही गोष्ट कां लिहिली नाहींस ?"

सरस्वतीनें लाजून खालीं मान घातली. ती म्हणाली " जखम बहुतेक भरत आली होती, आणि फारशी दुखतहि नव्हती, म्हणून नाहीं लिहिलं झालं !"

" पण लिहिलें असतेंस, तर काय पाप लागलें असतें ?" विनायकरावांनीं किंचित् विरक्त स्वरानें विचारिलें.

सरस्वती दुःखितांतःकरणानें म्हणाली " मला असं वाटलं कीं, पत्रांत ही गोष्ट लिहिली, तर इकडे माझ्यापेक्षांहि जास्त वेदना होतील."

" ही लहान का जखम आहे ? तुला असें वाटलें तरी काय !"

परंतु यावर सरस्वती कांहींएक बोलली नाहीं. हें पाहून विनायकरावच म्हणाले " बरें तें राहूं दे, पण याला औषध वगैरे काय लावलें ?"

" वैद्यबुवांनीं कसलंसं मलम दिलं होतं, त्यानंच तर ती भरत आली आहे." इतकें बोलून तो विषय बदलण्याच्या हेतूनें सरस्वतीनें विचारलें "मामंजींजवळ बोलणं झालं का ?"

" नाहीं. वैद्यबुवा म्हणाले आज त्यांना उठवणें बरें नाहीं."

" घरीं यायचं झालं, हें फार चांगलं झालं. या तीन दिवसांत त्यांना झोंप म्हणून कशी ती लागलीच नाहीं ! कुठं गुंगी आलीच, तर इकडच्या नांवानं हांक मारीतमारीत तत्काळ जागे होत."

" ही सारी हकीगत ऐकून आणि त्यांची अवस्था पाहून मला फार भीति वाटूं लागली आहे." बोलतांबोलतां विनायकरावांची मुद्रा गंभीर दिसूं लागली.

हा कसला तरी साधा ताप आहे, अशा समजावर सरस्वती आजवर निर्धास्त होती; परंतु विनायकरावांचें हें बोलणें ऐकून तीहि घाबरून गेली आणि म्हणाली " अग बाई ! खरंच कीं काय ? दुखणं इतकं का जड आहे ?"

विनायकरावांनीं एक उसासा टाकिला आणि म्हटलें " वैद्यबुवा सांगत होते कीं, आतां कांहीं धास्ती राहिली नाहीं—"

" देव करो आणि वैद्यबुवांचं बोलणं खरं होवो ! इकडचं बोलणं ऐकल्यापासून माझा जीव अगदीं उडाल्यासारखा झाला होता."

" दादा आणि अप्पा यांच्याकडची कांहीं बातमी समजली होती का ?"

" हो, ते सध्या आपापल्या सासुरवाडीला आहेत. मुलं गेल्यापासून घर अगदीं सुनं झालं आहे. मला तर अगदीं चुकल्याचुकल्यासारखं वाटतं. चैन कसं तें पडतच नाहीं. घर जसं अगदीं खायला उठतं !"

" बरें, पण तूं एक मोठा अपराध केला आहेस !"

विनायकरावांच्या या आकस्मिक बोलण्यानें सरस्वती कावरीबावरी होऊन पतीच्या तोंडाकडे पाहूं लागली. विनायकराव किंचित् हंसून म्हणाले " मोठ्या आनंदाची एक बातमी तूं माझ्यापासून लपवून ठेविली आहेस ! एवढा मोठा अपराध तूं कां केलास ?"

सरस्वती तत्काळ समजून चुकली कीं, यमुनेच्या पत्रावरून जगन्नाथरावांना आणि आपल्या पतीला आपल्याला कांहीं दिवस गेल्याची बातमी समजली असली पाहिजे. ती अगदींच ओशाळून गेली. लज्जेनें तिच्यानें कांहीं बोलवेना किंवा विनायकरावांकडे नुसतें पाहावेहिना. स्थिर दृष्टीनें ती आपल्या पायांच्या बोटांकडे पहात राहिली. तिच्या सर्वांगाला घाम सुटला. हें पाहून विनायकराव आश्चर्यचकित होऊन म्हणाले "हा कोण लाजाळूपणा !"

हें ऐकून तर सरस्वती अधिकच लाजली. बराच वेळपावेतों ती अगदीं स्तब्ध राहिली.

नंतर जगार्दनपंतांच्या प्रकृतिमानासंबंधीं त्या उभयतांचें बराच वेळ भाषण चाललें होतें. त्या रात्रीं झोंप म्हणून कशी ती एकालाहि आली नाहीं.

---

प्रकरण सोळावें

## मृत्युशय्येवर

विनायकराव दुसऱ्या दिवशीं अगदीं पहाटेस उठून आपल्या वडिलांच्या खोलींत गेले. आपला निःसीम पितृभक्त पुत्र पाहून मृत्युशय्येवर पडलेल्या जनार्दनपंतांना फार समाधान झालें. त्यांच्या त्या शुष्क झालेल्या मुखावर प्रसन्नतेची झांक दिसूं लागली. "विनू ! आलास बाबा, बरें केलेंस. मला फार कष्ट होत होते. तुझ्या वाटेकडे मी अगदीं डोळे लावून बसलों आहें—" असें म्हणून ते थांबले.

विनायकराव भक्तिपूर्ण नेत्रांनीं वडिलांकडे पाहूं लागले. जनार्दनपंतांचें शरीर पांढरें फटफटित होऊन गेलें होतें, डोळे खोल गेले होते. अंगांत त्राण म्हणून कसें तें मुळींच राहिलें नव्हतें. पहातांपहातां विनायकरावांचे डोळे भरून आले. ते म्हणाले " रात्रीं तुम्हाला चांगलीशी झोंप लागल्याचें दिसत नाहीं. डोळे लाल झाले आहेत. तोंडहि अगदीं सुकून गेलें आहे—"

" विनू, आतां या जन्मीं तरी मला झोंप लागेलसें दिसत नाहीं !" वडिलांचें हें बोलणें ऐकून आणि त्यांची ती अवस्था पाहून विनायकराव अगदींच घाबरून गेले. त्यांचा धीर सुटला. हें पाहून वैद्यबुवा जवळच औषध देत बसले होते

ते त्यांना एकीकडे नेऊन म्हणाले "रोग्याच्या मनाला स्वस्थता असल्याविना का त्याला झोंप लागणें शक्य आहे ? रात्रंदिवस हे दुर्धर चिंतेंत मग्न आहेत. या चिंतारोगाला कोण काय औषध देणार ! मी तुम्हाला स्पष्ट सांगतों, यांना चांगली झोंप लागल्याविना कांहीं यांच्या प्रकृतीस आराम पडायचा नाहीं."

वडील तापानें अत्यवस्थ पडल्याची बातमी विठ्ठलराव आणि गोविंदराव या दोघांनाहि कळली होती; परंतु त्यांना पहाण्यासाठीं आजवर दोघांपैकीं कोणीहि आलें नाहीं. त्यांना वडिलांच्या भेटीला येण्यासाठीं विनायकरावांनीं आल्याबरोबर भिवाला पत्र देऊन पाठविलें होतें. विठ्ठलरावांनीं पत्र वाचून फाडून टाकलें आणि गोविंदरावांनीं तर पत्र हातांतहि घेतलें नाहीं. "करायचें आहे काय आम्हांला त्याचें पत्र वाचून ?" असें म्हणून त्यांनीं भिवाची पाठवणी केली. विनायकरावांच्या सांगण्याप्रमाणें भिवानें "बाबासाहेब फार आजारी आहेत, त्यांचा ताप कांहीं केल्या कमी होत नाहीं, यांतून ते उठतील अशी देखील आशा दिसत नाहीं. आपल्या भेटीचा अगदी ध्यास घेतला आहे त्यांनीं. कसेंहि करून एकवार तेथपर्यंत चला–" इत्यादि नाना प्रकारें त्यांना सांगून पाहिलें; परंतु त्या पाषाणहृदयी पुत्रांना त्याचें कांहींच वाटलें नाहीं. उलट, त्या बिचाऱ्या गड्यालाच ते शिव्यागाळी देऊं लागले. गोविंदराव तर त्याच्यावरच तोंडसुख घेऊन म्हणाले "त्यांचा आवडता मुलगा तर आला आहे ना ? मग आतां आमची काय जरूर ?"

वडिलांची या दुखण्यांतून उठण्याची आशा नाहीं, हें ऐकून आपण तेथें जावें, अशी विठ्ठलरावांना अंतर्यामी प्रबल इच्छा झाली होती; कारण, त्यांनीं असा विचार केला कीं, 'खरोखरच वडिलांचा या दुखण्यांत अंत झाला आणि त्या वेळीं आपण तेथें नसलों, तर पैशाच्या दृष्टीनें आपला तोटा होण्याचा खास संभव आहे; परंतु जावें, तर इकडे प्रतिज्ञा मोडते, आणि प्रतिज्ञा मोडली म्हणजे भागीरथीबाई 'भित्रे' म्हणून हंसणार, अर्थात् विठ्ठलराव गेले नाहींत.

इकडे वडिलांची कठीण अवस्था पाहून विनायकरावांनीं जगन्नाथरावांना पत्र लिहिलें. परदुःखानें कळवळणारे जगन्नाथराव पत्र पोहोंचतांच एका क्षणाचाहि विलंब न करितां तत्काळ आले. त्यांना पहातांच जनार्दनपंतांनाहि आनंद झाला.

एके दिवशीं दोनप्रहरीं ताप अतिशय चढला. जनार्दनपंत दुःखानें तळमळूं लागले. विनायकराव आणि जगन्नाथराव त्यांच्या बिछान्याच्या एका बाजूला

बसले होते; वैद्यबुवा दुसऱ्या बाजूला बसले होते सगुणाबाईहि जवळच होत्या. सर्वांचीं अंतःकरणें दुःखानें व्याकुळ झालीं होतीं. विनायकराव हातांत पंखा घेऊन वडिलांना वारा घालूं लागले. हें पाहून जनार्दनपंत म्हणाले "विनू, अरे या वाऱ्यानें का हा ताप कमी व्हायचा आहे? माझ्या या अंतःकरणांत आग लागली आहे बाबा!"

विनायकराव कांहींच बोलले नाहींत. आपल्याकडे कोणाचें लक्ष्य नाहींसें पाहून ते डाव्या हाताने आपले अश्रु पुसूं लागले. जगन्नाथरावांनीं जनार्दनपंतांना विचारलें "आपले हे कष्ट दूर होण्याला कांहींच उपाय नाहीं का?"

जनार्दनपंत किंचित् हंसल्यासारखें करून म्हणाले "हे कष्ट आता माझ्या बरोबरच दूर होतील!"

नंतर बराच वेळ ते कांहीं विचार करून विनायकराव आणि जगन्नाथराव यांना उद्देशून अडखळतअडखळत म्हणाले "बाबांनो! मला कांहीं आतां भरंवसा वाटत नाहीं. माझ्या सर्व शक्ति क्रमाक्रमाने नष्ट होत चालल्या आहेत. मी आतां वांचत नाहीं आणि मला आतां वांचावेंसें वाटतहि नाहीं. परंतु डोळे मिटण्याच्या पूर्वीं सर्वांना एकदा पहावें, अशी माझी इच्छा आहे. गडी जाऊन ते कांहीं आले नाहींत. आतां विनू, तूं स्वतः तरी एकवार जाऊन पहा."

जनार्दनपंतांचें हें बोलणें ऐकून सर्वांच्या डोळ्यांत पाणी आलें. विनायकराव आपलें दुःख आवरून धरून वडिलांची ही शेवटची इच्छा पूर्ण करण्याच्या हेतूने विठ्ठलराव आणि गोविंदराव यांच्या सासुरवाडीस जाण्यास निघाले. इकडे वडिलांजवळ असलेल्या पैशाला आपल्याला मुकावे लागेल, या धास्तीनें विठ्ठलराव घरीं येण्यासाठीं अगदीं उतावीळ झाले होते. अर्थात्, विनायकरावांना पहातांच मग काहींएक आढेवेढे न घेतां ते आपली बायको आणि मुलें घेऊन तत्काळ निघाले. हें समजतांच गोविंदरावहि तसेंच निघाले. याप्रमाणें विनायकराव या सर्व मंडळीला घेऊन घरीं परत आले.

सर्व मुलें माणसें आल्याचें समजतांच जनार्दनपंतांचें निस्तेज झालेलें मुख पुनः प्रफुल्ल दिसूं लागलें. त्यांनीं सर्वांना आपल्याजवळ बोलाविले. विठ्ठलराव आणि गोविंदराव वडिलांच्या बिछान्यापाशीं येऊन बसले. वडिलांची दशा पाहून ते या दुखण्यांतून उठत नाहींत, हें दोघेहि समजून चुकले. परंतु त्यांना त्याबद्दल फारसें वाईट वाटलें नाहीं. उलट, विभक्त होण्याचा सुयोग आतां खात्रीनें येऊन ठेपला, आतां आपल्याला हव्या तशा मौजा मारावयास सांपड-

तील, या विचारांत ते गर्क होऊन गेले. भागीरथीबाई एकवार आणि अन्नपूर्णाबाई कसेंतरी सासऱ्याकडे पाहिलें न पाहिलेसें करून तेथून निसटल्या आणि आपआपलीं गाठोडीं सोडून सामानसुमान जेथल्या तेथें ठेवण्याच्या व आंथरुणेंपांघरुणें पहाण्याच्या उद्योगास लागल्या. हरि, कृष्णी आदिकरून मुलें आजोबांच्या बिछान्याभोंवतीं बसलीं होतीं. डोळे भरून जनार्दनपंत त्यांच्याकडे पहात होते. क्षणार्धांत त्यांचे डोळे अश्रूंनीं भरून आले. आपले श्रम कोणास दिसूं नयेत म्हणून आपला डावा हात त्यांनीं मोठ्या कष्टानें आपल्या डोळ्यांवर धरिला. त्यांना आनंदाचें भरतें आलें आणि आणखी कांहीं दिवस जगावें, असेंसुद्धां वाटूं लागलें !

याप्रमाणें कांहीं वेळ गेल्यावर जनार्दनपंतांनीं पुनः एकवार त्या मुलांकडे पाहिलें. मुलांचीं तीं कोमल आणि निर्दोष मुखकमलें पाहून ते मागील सर्व गोष्टी विसरून गेले. आपल्या डाव्या हातानें त्यांनीं मोठ्या प्रेमानें हरीचा उजवा हात धरिला आणि विचारिलें "हरि ! गुलामा, आजोबाला एकटा टाकून कुठें रे गेला होतां ?"

कुत्सित शिक्षणानें बिघडलेल्या हरीनें तत्काळ उत्तर दिलें "आम्ही इथून खुषीनें गेलों होतों थोडेच ! धाकट्या काकीनें सांगितलेल्या खोट्या नाट्या गोष्टी ऐकून तुम्हींच ना आम्हांला हाकून लावलेंत आजोबा !"

जनार्दनपंतांनीं तोंड फिरविलें. हरीचें मूर्खपणाचें बोलणें त्यांना मुळींच रुचलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर तें त्यांना विषासारखें लागलें. पुनः त्यांचे डोळे भरून आले. पुनः आपला हात त्यांनीं डोळ्यांवर धरिला. तोंडहि पांघरुणाखालीं झांकून घेतलें. कुटुंबाची पुढील स्थिति मनांत येऊन पुनः त्यांना असह्य कष्ट होऊं लागले. अर्ध्या घटकेनें पुनः तोंडावरचें पांघरूण काढून त्यांनीं दोनतीनदां मोठमोठ्यानें उसासे सोडले. यानें त्यांच्या अंतःकरणांतील दुःखाचा वेग कांहीं कमी झालासा दिसला. "भगवंताची मर्जी !" असें म्हणून ते पुनः किंचित् स्थिर झाले आणि आतां कृष्णीला हांक मारून म्हणाले "पोरी, तुला ग मी कां आवडत नाहीं ?"

"तुम्हाला तरी कुठं आम्ही आवडतों आहों ? आणि आजीला तरी कुठं आवडतों आहों ?" कृष्णीनें पोक्तपणाचा आविर्भाव घालून मोठ्या कुऱ्यानें उत्तर दिलें.

एवढ्याशा नखाएवढ्या पोरींच्या तोंडांतून असें उत्तर येईल, असें जनार्दनपंतांना स्वप्नांतदेखील वाटलें नव्हतें. त्यांनीं संतापानें पुनः तोंड फिरविलें. त्या मूर्ख पोरांचें बोलणें ऐकून त्यांचे कान किटले. आईबापांच्या मूर्खपणाच्या शिक्षणाचें बीज या पोरांच्या हृदयांत चांगलेंच रुजलें आहे, या पोरांची पुढें कांहीं धडगत दिसत नाहीं, हें ते समजून चुकले. नातवंडें पहाण्याची त्यांची हौस फिटली. पोरेंहि तेथून निसटण्यासाठीं चुळबुळ करूं लागलीं. धाकटा रामू 'काकी' दृष्टीस पडतांच तिच्या कडेवर जाऊन घट्ट बसला. हें पाहून भागीरथीबाई गरगर डोळे फिरवूं लागल्या. रामूचा त्यांना मोठा राग आला आणि संधि सांपडतांच त्या पोराचीं चांगलींच हाडे ठेंचून आपला राग शांत करण्याचा त्यांनीं मनांतल्या मनांत दृढ संकल्पहि केला.

---

प्रकरण सतरावें

## शेवटचें सांगणें

त्या रात्रीं जनार्दनपंतांना थोडीशी झोंप लागली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांची मुद्रा नेहमींपेक्षां प्रफुल्ल दिसूं लागली, हें पाहून विनायकराव आणि जगन्नाथराव यांना मोठा आनंद झाला; परंतु भर दोनप्रहरच्या सुमारास तापानें पुनः उलट खाल्ली, वैद्यबुवा देखील घाबरून गेले. औषधोपचार चाललेच होते, परंतु ताप सारखा वाढत होता. जनार्दनपंतांच्या समाचाराला गांवांतील कितीतरी लहानमोठे लोक येत होते. सर्वजण त्यांच्याविषयीं सहानुभूति प्रदर्शित करीत होते आणि सर्वजण त्यांचें आरोग्य चिंतीत होते. जनार्दनपंत सर्वांशीं आदरपूर्वक आपली कृतज्ञता दर्शवीत होते आणि त्यांचा शेवटचा निरोप घेत होते. सर्वांना त्यांनीं सद्गदित स्वरानें सांगितलें "आपला कुणाचा मी कधीं कांहीं अपराध केला असला, कुणाला कांहीं लागण्याजोगें बोललों असलों, तर मला आतां त्याबद्दल आपण मोकळ्या मनानें क्षमा करा. आतां तुमची माझी हीच शेवटची भेट!"

याखालीं तिसरा प्रहर उलटून गेला. हळुहळू मंडळी उठून जाऊं लागली. जनार्दनपंतांचा अंतकाळ समीप आला आहे, हें बहुतेक समजून चुकले. एकंदर मंडळी त्यांच्यासाठीं फार हळहळूं लागली. त्यांच्यासारखा सुशील, निष्कपटी आणि सरळ स्वभावाचा मनुष्य मिळणें विरळा. कित्येक बिचारे तर जनार्दनपंतांचे अनेक सद्गुण आठवून अश्रु ढाळूं लागले.

संध्याकाळ होऊन गेली. जनार्दनपंतांच्या बिछान्याशीं एक समई मिणमिण जळत होती. वैद्यबुवा जनार्दनपंतांची नाडी पाहून तोंड वाईट करीत होते. इतक्यांत जनार्दनपंत खोल आवाजानें म्हणाले " आतां कशाला नाडी पहातां–"

हें ऐकून वैद्यबुवा म्हणाले " आपण घाबरूं नका. अद्यापि घाबरण्याजोगें कांहीं दिसत नाहीं. देवाचें स्मरण करा—"

जनार्दनपंत आपली अवस्था समजून होते. ते म्हणाले " वैद्यबुवा, हें ठीक सांगितलेंत. मला देवाचें नांव ऐकवा. हीं औषधें पुरे झालीं आतां—"

असें बोलून त्यांनीं औषध घेण्याचें वद केलें. विनायकराव आणि जगन्नाथराव औषध घेण्यासाठीं त्यांना पुनः पुनः आग्रह करूं लागले. शेवटीं एक दीर्घनिश्वास सोडून जनार्दनपंत म्हणाले " अरे वेड्यांनों ! माझ्यावर तुमची अढळ भक्ति आणि प्रेम आहे, म्हणून माझी सध्याची स्थिति तुम्ही प्रत्यक्ष पहात असूनहि समजून घेत नाहीं, आतां औषधानें काय होणार आहे मला ? तुम्हीं पुष्कळ वर्षे वांचा, देव तुमचें कल्याण करो—"

त्याचे हें बोलणें ऐकून सगुणाबाई रडूं लागल्या. सरस्वती डोळे पुशीपुशीत सासूचें सांत्वन करूं लागली. विनायकराव अत्यंत व्याकुळ होऊन गेले. वैद्यबुवांनी त्या दोघांना बाहेर नेलें आणि हलकेच सांगितलें "नाडी कांहीं आज ठीक दिसत नाहीं. जरा सावध रहा. निष्कारण चिंता करून काय होणार आहे ? होणेंजाणें सगळें परमेश्वराच्या आधीन."

पितृभक्तिपरायण विनायकरावांच्या मस्तकावर जणों आकाश कोसळून पडलें ! डोळ्यांपुढें अंधेरी येऊन सारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या व कंबर खचल्यासारखी होऊन ते मटकन् खालीं बसले. जगन्नाथरावांनीं त्यांचा हात धरिला आणि मोठ्या कळवळ्यानें त्यांना धीर देऊन म्हटलें " विनायक ! अरे, तूं काय वेडा आहेंस ? तूच असें करूं लागलास तर तुझे बाबा अधिक घाबरतील, याचा कांहीं विचार कर, जरा धीर धर, चल मजबरोबर, आपण त्यांच्याजवळ जाऊन बसूं."

विनायकराव आणि जगन्नाथराव जनार्दनपंतांच्या बिछान्यावर जाऊन बसले. विनायकरावांचें म्लान मुख पाहून जनार्दनपंत खोल आवाजानें म्हणाले " धीर धर ! असा घाबरूं नकोस. जगन्नाथ तुझा खरा मित्र आहे. त्याला पाहून मला फार आनंद होत आहे. त्याच्यावर सर्वस्वी भरंवसा ठेव. त्याच्या मर्जी-

विरुद्ध कोणतीहि गोष्ट करूं नकोस. आतां आणखी काय सांगू? या, तुम्ही दोघेहि माझ्या अगदीं जवळ या—"

दोघांचेहि डोळे अश्रूंनीं भरून आले. दोघेहि जनार्दनपंतांच्या अगदीं जवळ जाऊन बसले. सगुणाबाई आणि सरस्वती जवळच होत्या, त्या खालीं मान घालून अस्फुट स्वरानें रुदन करूं लागल्या. जनार्दनपंत जगन्नाथरावांचा हात आपल्या हातांत धरून म्हणाले "जगन्नाथ! कितीतरी त्रास सोसून इथे आला आहेस. या वेळीं आशीर्वादापलीकडे तुला देण्याजोगे माझ्याजवळ कांहीं एक नाहीं. देव तुला दीर्घायु करो, तुझे सदैव मंगल करो—"

असें बोलून जनार्दनपंतांनीं मोठ्या कष्टानें आपला हात जगन्नाथरावांच्या पाठीवरून फिरविला. या वेळीं जगन्नाथरावांना कांहींकेल्या गहिंवर आवरून धरवेना. ते ढळढळ रडूं लागले. "आपल्या आशीर्वादानेंच आमचें कल्याण होईल. आपल्याला मी प्रत्यक्ष वडिलांप्रमाणें मानितों. हा विनायक म्हणजे माझा सख्खा भाऊ आहे, आपण बिलकूल काळजी करूं नये."

यापुढें कोणाच्यानें बोलवेना. विनायकराव, सगुणाबाई, सरस्वती, दुर्गा सर्वच डोळ्यांवर पदर धरून रडूं लागलीं. हें पाहून जनार्दनपंत अस्वस्थ होऊन म्हणाले "छे! तुम्ही रडतां कां? तुम्हाला असें रडतांना पाहिलें म्हणजे माझा जीव अगदीं कासावीस होतो. जरा स्वस्थ बसा. जगन्नाथ, तुझ्या बोलण्यानें माझा जीव शांत झाला. कितीतरी दिवसांत असे गोड शब्द मीं ऐकले नव्हते. आज माझे सगळे कष्ट दूर झाले—"

नंतर विनायकरावांकडे पाहून ते म्हणाले "विनू! जगन्नाथला सदोदित तुझा सख्खा भाऊ समजून वागत जा. मला वाटलें होतें, बंधुसुख तुझ्या नशिबीं नाहीं म्हणून. पण आज ती चिंता दूर झाली. मला फार समाधान वाटत आहे. बाबारे, माझ्या संसाराची भिस्त सारी तुझ्यावर आहे, हें नेहमी मनांत वागव—देवसेवा, मातृसेवा—"

बोलतां बोलतां त्यांना ग्लानि आली. ते कांहीं वेळ थांबले आणि नंतर चोहोकडे पाहून म्हणाले "सरस्वती—माझी लक्ष्मी कुठें गेली? आहे का इथें? ये, मुली, मजजवळ ये! अग, मजजवळ यायला लाजतेस?"

सगुणाबाईंनीं स्फुंदत स्फुंदत तिला जाण्यास सांगितलें. सरस्वती शेवटीं जनार्दनपंतांच्या बिछान्याशीं गेली. विनायकराव किंचित् बाजूला सरून बसले. सरस्वती जवळ आली असें पाहून जनार्दनपंत म्हणाले "मुली! तूंच या

माझ्या संसाराची लक्ष्मी आहेस ! तूं आहेस म्हणून माझ्या संसाराची शोभा आहे. सुखानें संसार कर, पुत्रवती हो, सदैव सुखी रहा ! परंतु मुली माझी एक गोष्ट ऐक. या तुझ्या म्हाताऱ्या सासूला कधींहि अंतर देऊं नकोस बरें ! माझ्या घराण्याचा लौकिक आतां तूं राख. हं कबूल कर हें माझ्यासमक्ष."

सरस्वतीनें आपल्या सासऱ्याच्या पायांवर हात ठेविला आणि मान हालवून आपली कबुली दर्शविली परंतु त्यानें जनार्दनपंतांचें समाधान झालें नाहीं. ते म्हणाले " अशी नुसती मान कां हालवितेस मुली ? माझ्याशीं देखील का बोलायला तूं लाजतेस ? नाहींना हिला कधीं तूं सोडून जाणार ? तोंडाने साग पाहूं ?"

लज्जाशील सरस्वतीने रडत रडत " नाहीं—" म्हणून उत्तर दिलें. जनार्दनपंतांचें समाधान झालें. ते म्हणाले " देव तुझें कल्याण करो–तुला सदैव सुखी ठेवो—" त्यांच्याने अधिक बोलवेना. सरस्वतीहि परत आपल्या सासू जवळ गेली.

ह्या वेळपर्यंत विठ्ठलराव, गोविंदराव किंवा त्यांच्या बायकामुलांपैकीं कोणीहि जनार्दनपंताच्या खोलींत पायदेखील टाकिला नव्हता. ते आपापल्या खोलींत स्वस्थ पडून होते. मुलें आजोबांकडे जाण्यासाठीं नाचत होतीं. परंतु "बसा मेल्यांनों ! हांक मारल्याविना गेलां तर सांभाळून असा !" अशी धमकी देऊन भागीरथीबाईनीं त्यांचें निवारण केलें. जनार्दनपंत आपल्या दोघा वडील मुलांना आणि नातवंडांना पहाण्यासाठीं उत्तरोत्तर अधीर होऊं लागले आणि ह्या वेळपर्यंत त्यांचें ठिकाण नाहीं हें पाहून शेवटीं म्हणाले " अरे, मला मरतांना पहायला देखील का रे येत नाहींत ?"

बोलतां बोलतां म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें. हें पाहून विनायकराव जाऊन त्या सगळ्यांना खोलींत घेऊन आले. आपलीं सगळीं मुलें माणसें आपल्याभोंवतीं जमलीं आहेत असें पाहून जनार्दनपंतांना बरेंच समाधान वाटलें. विठ्ठलराव आणि गोविंदराव या दोघांना उद्देशून ते म्हणाले "बाबांनो ! माझी आतां शेवटची वेळ आली आहे. आतां फार वेळ मी वांचेनसें मला वाटत नाहीं. आतां तुम्हांस शेवटचे दोन शब्द सांगतों, ते नीट ध्यानांत धरा. सगळे सुखासमाधानानें आणि गुण्यागोविंदाने रहा. नीच स्वार्थाच्या नादीं लागून उगाच आपापसांत यादवी माजवूं नका. कोणीहि कोणाची प्रतारणा करण्यास उद्युक्त होऊं नका. सर्वसाक्षी परमेश्वराला तें कधींहि सहन व्हायचें नाहीं.

या जगांत शाश्वत असें कांहींच नाहीं जन्म आणि मृत्यु यांची एकाच सूत्रानें गांठ मारिली आहे–जन्माशीं मृत्यूचा नित्य संबंध आहे. संसार म्हणजे मनुष्याच्या परीक्षेचें ठिकाण आहे. या परीक्षेच्या कसोटीला आम्ही कसे काय उतरतों, हें पहाण्यासाठींच जगदीश्वर आम्हांला या संसारांत घालीत असतो. माझी परीक्षा आटोपली. मी आतां चाललों—"

बोलतांबोलतां त्यांचे खोल गेलेले डोळे पाण्यानें भरून आले. वृद्ध जनार्दनपंतांनीं आपला हृदयाचा वेग आवरून धरिला आणि हळुहळू ते पुढें बोलूं लागले "आज मी जातों आहें, याप्रमाणें सगळ्यांना एक दिवस त्या जगत्पित्यासमोर गेले पाहिजे. मनुष्यप्राणी ही गोष्ट अगदीं सहज विसरून जातो. नाहींपेक्षां कुणीहि कुणाचें अनिष्ट चिंतिले नसतें. पापकर्माकडे कुणाचीहि प्रवृत्ति झाली नसती. अरे, हा संसार म्हणजे किती दिवसांपुरता–अं–हं ! माझी शक्ति अगदींच नष्ट झाली—मला आतां अधिक बोलवत नाहीं. माझा विनू तुमच्यापेक्षां लहान आहे, त्याला ममतेनें वागवा. दुसऱ्याचें अनिष्ट कदापि चिंतूं नका–त्यानें तुमचें कधींहि कल्याण व्हावयाचें नाहीं. दुसऱ्यावर सदोदित उपकार करीत असावें–निदान केव्हांहि कुणावर अपकार करण्याच्या तरी भरीस पडूं नये. भागीरथी, अन्नपूर्णा, तुम्ही देखील हें माझें बोलणें ध्यानांत धरा. आणखी दुसरें–आपल्या अज्ञान मुलांना भलभलत्या गोष्टी सांगूं शिकवूं नका. नाहीं तर त्यांच्या सर्व आयुष्याचा तुम्हीं नाश केल्यासारखं होईल. आईबापांच्या दोषानें मुलें खोटें बोलण्यास, चोरी करण्यास, आप्पलपोटीं होण्यास, गर्विष्ठ होण्यास, मत्सरी होण्यास–इतकेंच नव्हे, तर एकंदर दुर्गुणांचा अंगीकार करण्यास प्रवृत्त होत असतात. बाल्यावस्थेंत मुलें आईबापांच्या स्वभावाचें, आचारविचारांचें अगदीं हुबेहुब अनुकरण करीत असतात. आईबापांचा जसा स्वभाव असेल आणि त्यांचे जसे आचारविचार असतील, तशाच स्वभावांचीं आणि आचारविचारांचीं मुलें निपजत असतात. असो–हें दुसरें घर अर्धेंच राहिलें आहे–पेटींत पैसे आहेत, पहिल्यानें तें पुरें करून टाका. आपल्या आईला कधींहि त्रास देऊं नका. तिला चांगल्या रीतीनें वागवा. तिला कष्ट द्याल, तर देव तुम्हांला कधींहि सुखांत ठेवणार नाहीं, तुमचें कधींहि बरें करणार नाहीं, हें पक्कें लक्षांत ठेवा ! आतां काय सांगायचें राहिलें आहे ! तुम्हांला सर्वांना देव दीर्घायु करो. माझ्या डोळयांपुढें अंधेरी येऊं लागली. कृष्णे, वारे, हरि, बाळांनों, या रे–सगळीं माझ्याजवळ या—"

सगळीं नातवंडें आजोबांजवळ गेलीं. मरणाधीन झालेल्या जनार्दनपंतांनीं त्यांना अनेक आशीर्वाद दिले आणि सांगितलें " बाळांनों, तंटाभांडण करूं नका बरें ? खोटें बोलूं नका, चोरीचहाडी कधींहि करूं नका, म्हणजे देव तुमचें कल्याण करील. म्हातारीं व्हा, जा–" बोलतांबोलतां जनार्दनपंतांची वाचा बंद झाली. दृष्टि ऊर्ध्व लागली !

दोन प्रहर रात्र होऊन गेलेली; जिकडेतिकडे सामसूम झालेलें; जनार्दनपंताना श्वास लागला होता; जीभ आंत ओढत होती, चैतन्य नष्ट झालें होतें; शरीर गार पडत चाललें होतें. ही अवस्था पाहून विनायकराव, जगन्नाथराव, सगुणाबाई, सरस्वती, दुर्गा आणि भिवा गडी सुद्धां सर्व मंडळी रडूं लागली. विठ्ठलराव आणि गोविंदराव डोळ्यांवर उपरण्याचा पदर घेऊन बसले. वैद्यबुवांनीं जनार्दनपंतांना खालीं उतरविण्यास सांगितलें. खालीं उतरतांच 'रा–म' एवढीच दोन अक्षरें अगदीं खोल आवाजानें म्हटलेलीं ऐकूं आलीं. क्षणार्धांत जनार्दनपंतांचा प्राणवायु निघून गेला. घरांत एकच हलकल्लोळ होऊन गेला.

---

प्रकरण अठरावें

## पेटींत काय होतें ?

जनार्दनपंतांचा अंतकाळ होऊन दोन दिवस झाले. गांवांतील वृद्ध वृद्ध शिष्टमंडळी जनरीतीप्रमाणें देशमुखांच्या कुटुंबाच्या सांत्वनार्थ येऊं लागली. अगदींच निकटसंबंधीं होते ते और्ध्वदेहिक क्रियेसंबंधीं वाटाघाट करू लागले. जनार्दनपंताच्या लौकिकाला साजेशोभेसा दानधर्म करण्याविषयीं आपापल्यापरीनें सूचना करूं लागले. विठ्ठलरावांनीं सासऱ्याच्या घरून विनायकरावांबरोबर परत येतांच प्रथम युक्तिप्रयुक्तीनें जनार्धनपंतांच्या पेटीच्या किल्ल्या आपल्या ताब्यांत घेऊन ठेविल्या होत्या. इतके दिवस त्यांनी या गोष्टीची दाद दिली नव्हती; परंतु आतां ते अगदीं अधीर झाले. केव्हां एकदा या किल्ल्या दुसऱ्या कोणाजवळ तरी देऊं, असें त्यांना झालें होतें. गेल्या दोन दिवसांत तसें करण्याला कांहीं संधि सांपडली नाहीं. परंतु आतां ही दानधर्म वगैरे करण्याची गोष्ट निघतांच त्यांनीं किल्ल्या बाहेर काढून विनायकरावांसमोर ठेविल्या आणि गंभीर मुद्रेनें म्हटलें " बाबा रे, झालें तें झालें, आतां आपण सगळीं कितीहि शोक करीत बसलों, म्हणून त्याचा कांहीं उपयोग का होणार आहे ? आतां

हळुहळू पुढच्या व्यवस्थेला लागलेंच पाहिजे. बाबांच्या या किल्लया आज दोन दिवस मजजवळ आहेत, त्या आपल्या संभाळा काय आहे नाहीं तें या चार मंडळीसमक्ष पाहून घ्या, म्हणजे बरें. नाहीं तर पुढेंमागें उगाच गडबड व्हायची! तसेंच मी म्हणतों, काय आहे तें समजलें, म्हणजे त्याप्रमाणें दान-करण्यासंबंधीं ठरवायला पण बरें."

विठ्ठलरावांचें हें पोक्त भाषण सर्वांना पसंत पडलें. सर्वजण माना डोलवूं लागले. परंतु विनायकराव कांहीं बोललेहि नाहींत किंवा त्यांनीं त्या किल्लया उचलल्याहि नाहींत. उपरण्याच्या पदरानें ते आपले डोळे पुशीत बसले होते. हें पाहून जगन्नाथराव विठ्ठलरावांस म्हणाले "तुमच्याजवळच असत ना का त्या किल्लया? तुमच्याबद्दल तर नाहीं ना कुणी संशय घ्यायचें?"

"छे छे! त्याचा काय नियम सांगावा! ही पैशाची गोष्ट, जितकी सावध-गिरी घ्यावी तितकी बरी. आपण सगळे एकवार काय आहे नाहीं तें पाहून ठेवूं, मग पाहिजे तर मी या किल्लया ठेवीन."

तेथें सगळी आप्तमंडळीच होती. त्यांनाहि जनार्दनपंतांचा आजवर मोठा भ्रम होता. तेव्हां अनायासें जर काय आहे नाहीं तें पहावयास मिळत आहे, तर मग ते तरी कशाला नको म्हणतील! सगळयांचाच आग्रह पडला, मग काय करणार! तशीच सर्व मंडळी उठून जनार्दनपंतांच्या खोलीत गेली. गोविंद-राव अद्यापि निजलेलेच होते; त्यांनाहि जागें करून बोलाविण्यांत आलें. सर्वा-समक्ष विठ्ठलरावांनीं वडिलांची पेटी उघडली. त्याचा हात थरथर कांपत होता. त्यांनीं पेटी उघडतांच गोविंदराव पुढें झाले आणि आंतील पिशवी काढून ती जमिनीवर ओतून ते रुपये मोजूं लागले. हें पाहून जगन्नाथराव म्हणाले "अगोदर त्या पेटींत हजार रुपयांचे तोडे किती आहेत, तें पहा—"

हजार रुपयांचें नांव ऐकतांच आपल्या हातांतील काम बाजूला ठेवून गोविंद-रावांनीं अगोदर त्या पेटींत हात घातला; परंतु त्यांना आंत कांहींच सांपडेना. तेव्हां ते आश्चर्यानें म्हणाले "कुठें, या पेटींत? यांत तर कांहीं रुपयांचे तोडे-बिडे नाहींत!"

"नाहींत कसे? नीट पहा. असलेच पाहिजेत!" जगन्नाथराव किंचित् जोरानेंच म्हणाले.

"आतां आणखी कसें पहाणार? कागदपत्राशिवाय आपल्याला तर बुवा यांत कांहीं दिसत नाहीं."

जगन्नाथराव आणि विनायकराव आश्चर्यचकित होऊन पेटीजवळ गेले आणि पहातात, तों, आंत एक कपर्दीकहि नाहीं! दोघे एकमेकांकडे पाहूं लागले. जगन्नाथराव म्हणाले " मोठें आश्चर्यच आहे म्हणायचें! तुमचे हे वडील बंधु येण्याच्या आधल्याच दिवशीं या पेटींत मीं तीन हजारांचे तीन तोडे असलेले पाहिले होते! ते काय या तीनचार दिवसांत खर्च झाले कीं, या पेटीनेंच गिळून टाकिले?"

विनायकराव घोटाळ्यांत पडून म्हणाले " भलतेंच कांहींतरी! इतके रुपये कसे खर्च होतील?"

" मग ते आहेत कुठें?"

" हें मी कसें सांगू! कदाचित् चोरून नेले असतील कुणीं?"

या पेटींतील पैशांविषयीं विनायकराव आणि जगन्नाथराव यांना माहिती असेल, असें विठ्ठलरावांना वाटलें नव्हतें. नाहींपेक्षां पेटींत काय आहे त्याची सर्वांसमक्ष मोजदाद करण्याची इतकी घाई त्यांनीं केली नसती. आतां त्यांचा थरकांप उडाला, परंतु ही आपली स्थिति इतरांच्या दृष्टोत्पत्तीस न येऊं देतां ते मोठ्या धिटाईनें म्हणाले " पाहिलेंत! आणखी कांहीं दिवस किल्ल्या अशाच मजजवळ राहिल्या असत्या, म्हणजे निष्कारण संशयाला कारण झालें असतें कीं नाहीं?"

त्यांच्या या बोलण्याकडे मुळींच लक्ष्य न देतां जगन्नाथराव विनायकरावांस म्हणाले " तुझी कांहीं तरी चूक झाली असली पाहिजे. पैसे त्या दुसऱ्या पेटींत तर नाहीं ठेवलेस विसरून?"

" छे छे याच पेटींत ठेविल्याची मला पक्की आठवण आहे."

" पण, एकवार पहा तर खरा त्या पेटींत! एखाद्यावेळीं आपल्याला अशी भ्रांति पडते."

विनायकरावांनीं एक सुस्कारा सोडिला आणि म्हटलें " गहाण ठेविलेले सोन्याचे दागिने, कांहीं खतेंपत्रें आणि इतर कांहीं किरकोळ वस्तु मात्र त्या पेटींत आहेत. रोकड सगळी याच पेटींत होती. चारपांच दिवसांत इतकें का मला विस्मरण पडेल? पाहिजे तर ती पेटी उघडून पहा, म्हणजे खात्री होईल."

गोविंदरावांनीं तत्काळ ती दुसरी पेटी उघडली; सर्व मंडळी अधोर दृष्टीनें पाहूं लागली; परंतु आंत काय होतें! पैसे तर त्या पेटींत मुळीं नव्हतेच; परंतु दागदागिने, खतेंपत्र इत्यादिकांचाहि मागमूस नाहीं! हें पाहून विनायक-

रावांची कंबरच खचली. मटदिशीं ते खालीं बसले आणि कपाळाला हात लावून म्हणाले "आतां मात्र कुणीं तरी सर्वस्वीं बुडविलें खास! या पेटींत तर कांहींहि राहिलें नाहीं! आम्ही भिकारी झालों याबद्दल मला कांहींहि वाटत नाहीं, परंतु लोकांचे गहाणाचे दागिने होते, तेसुद्धां गेले—"

सर्व मंडळी स्तब्ध राहिली. गेल्या एकदोन दिवसांत ही चोरी झाली असली पाहिजे, असें सर्वांनीं ठरविलें. देशमुखांच्या घरीं मोठी चोरी झाल्याची बातमी हां हां म्हणतां सगळ्या गांवभर पसरली. एकमेकांच्या कानाशीं लागून लोक कुजबुजूं लागले. जो तो मोठ्या आश्चर्यानें म्हणूं लागला, कीं, "अशी नव्हती बुवा आपण कधीं मौज पाहिली! अहो, पेट्यांचीं कुलुपें जशींच्यातशीं बंद आणि आंतला ऐवज मात्र पसार! मोठेंच आश्चर्य नाहीं का हें? चोराला फिरून कुलुपें बंद करून ठेवण्याची जरूर काय? आणि शिवाय नगद माल त्यानें नेला तर नेला, पण खतेंपत्रें कशाला नेलीं?" कित्येक म्हणूं लागले "तें कांहीं नाहीं. हें त्या भिवाचेंच काम असलें पाहिजे." यावर कित्येक म्हणाले "भलतेंच कांहीं तरी! अहो, भिवा म्हणजे आज कितीतरी वर्षे देशमुखांकडे आहे. जनार्दनपंतांचा त्याच्यावर पराकाष्ठेचा विश्वास होता. तो नाहीं असें करणार. आणि त्या बिचाऱ्याच्या हातीं किल्ल्यातरी कुठून लागणार? तो जर चोर असता, तर आज सगळी हयात त्यानें त्यांच्याच घरीं घालविली नसती."

इकडे लोक जसजसे तर्कवितर्क करूं लागले तसतसें विठ्ठलरावाच्या तोंडचें पाणी पळूं लागलें. ते अगदीं घाबरून गेले. इतर कोणाच्या ध्यानांत हें आलें नाहीं, परंतु विठ्ठलरावांचेंच हें काम असलें पाहिजे, असें चोरी झाल्याचें उघडकीस आल्या क्षणापासून जगन्नाथरावांच्या मनानें पक्कें घेतलें असल्यामुळें विठ्ठलरावांच्या हालचालीवर त्यांनीं अगदीं बारकाईनें नजर ठेविली होती. अर्थात्, ही चलबिचल त्यांच्या तेव्हांच ध्यानांत आली आणि त्यांचा संशय दृढ झाला. या गोष्टींचा आपल्याशीं बराच वेळ विचार करून त्यांनीं शेवटीं विनायकरावांस आपल्याजवळ बोलाविलें आणि त्यांच्या कानांत सांगितलें "विनायकराव, कुणी कांहीं म्हणो, मला तर हें तुझ्या दादाचेंच काम दिसतें आहे! तूं त्यांच्याकडे जरा बारकाईनें नजर ठेव म्हणजे तुझ्या ध्यानांत येईल मी असें कशावरून म्हणतों तें!"

"ईश्वर जाणे!" विनायकराव फक्त एवढेंच म्हणाले; परंतु क्रमाक्रमानें त्यांनाहि तोच संशय येऊं लागला.



---

## प्रकरण एकोणिसावें
## विठ्ठलराव घाबरले !

जनार्दनपंतांच्या मृत्यूच्या दुःखदायक बातमीबरोबरच देशमुखांच्या घरीं झालेल्या चोरीचीहि बातमी चोहोंकडे पसरली. कोणी म्हणूं लागले "देशमुखांचें घर चोरांनीं फोडिलें." कोणी म्हणूं लागले "त्यांच्या घरावर दरोडा पडला. हातांत बंदुका, तरवारी घेऊन चोर आले होते. पांचसहा मशालीसुद्धां त्यांच्याबरोबर होत्या. चोरांनीं कुऱ्हाडींनीं पुढचें दार फोडिलें आणि आंत शिरून सगळें घर लुटून नेलें. दहा हजार रुपयांची तर रोकड होती! शिवाय सोन्या-रुप्याचे दागिने किती गेले त्याचा पत्ताच नाहीं!" कोणीकोणीतर असेंहि म्हणाले कीं, " त्या दरोडेखोरांनीं घरांतील माणसांना मारहाणदेखील केली!" अशा एकावर एक कंड्या पिकूं लागल्या.

आतां पुढें काय करावें, हें विनायकरावाना कांहीं सुचेना. पोलिसांत ही गोष्ट कळवावी कीं कळवू नये, हाच निश्चय ठरेना. पोलिसांत कळविलें आणि त्यांनीं जर खरोखर चोर पकडला, तर आपल्या घराण्याची अब्रू जाऊन प्रत्यक्ष वडील भाऊ तुरुंगांत पडण्याची धास्ती. बरें कळवू नये, स्वस्थ बसावें, तर आपोआप ही बातमी पोलिसांना कळणारच. शिवाय लोकाचे गहाणाचे दागिने गेले त्याबद्दल काय करावयाचें, हाहि विचार होताच. विनायकरावांना कांहींच सुचेना. शेवटीं सर्वांचें मत घेऊन जगन्नाथरावांनीं असें ठरविलें कीं, एकंदर खरीखरी बातमी आपण आपली नुसती पोलिसांत कळवून ठेवावी, तें बरें. परंतु विठ्ठलराव या गोष्टीला कबूल होईनात. ते म्हणाले " पोलिसाला कळवून होणार काय? आपणच चागली चौकशी करूं, म्हणजे झालें. पोलिसांचा सुळसुळाट मात्र घरात होईल, बायकापोराना ते उगाच ताप देतील आणि फायदा नाहीं व्हायचा काडीचा देखील!"

बोलतांबोलतां विठ्ठलरावाचें तोंड काळें ठिक्कर पडलें. जगन्नाथराव आणि विनायकराव या दोघांच्याहि तें लक्ष्यांत आलें, आणि विठ्ठलरावांविषयींचा त्याचा संशय अधिकच दृढ झाला. त्यांच्या या निंद्य वर्तनाचा त्या दोघानाहि किळस येऊन अशा मनुष्याला चांगली शिक्षा झालेलीच बरी, असें देखील त्यांचें मन त्यांना सांगूं लागलें.

शेवटीं पोलिसांत चोरी झाल्याबद्दलची हकीगत कळविण्यांत आली, परंतु तिकडे ही बातमी अगोदरच कळली होती. देशमुखांच्या घरावर दरोडा पडून

सुमारें दहा हजारांचा ऐवज गेला, असा 'रिपोर्ट' गांवांतील पोलिस शिपायांनीं केव्हांच आपल्या फौजदारांकडे पाठविला होता. देशमुखांचें घराणें मोठें सधन असल्याबद्दलचा सर्वत्र लौकिक होता. तेव्हां फौजदारांनाहि ही गोष्ट अगदींच असंभवनीय वाटली नाहीं. आपण स्वतः जाऊन चौकशी करून यावें, असें त्यांनीं ठरविलें. कर्मधर्मसंयोगानें पोलिस सुपरिन्टेंडेंट मि. व्हाइट यांची स्वारीहि त्या वेळीं तेथेच होती. हे साहेब नुक्तेच या जिल्ह्यांत बदलून आले होते. खेडींपाडीं पाहण्याची आणि 'नेटिव्ह' लोकांत मिळूनमिसळून वागण्याची याना फार हौस होती. देशमुखांचा गांवहि तेथून कांहीं फारसा लांब नव्हता. साहेबांच्या कानांवर ही बातमी जातांच ते तत्काळ घोड्यावर बसून निघाले. काळ्या डगल्याचें बरेंच मोठें लष्करहि त्यांच्या मागोमाग चाललें होतें, हें सांगावयाला नकोच. खेड्यापाड्यांतील लोकांना साहेब म्हणजे अद्यापिहि एक अपूर्व चीज वाटते. रामाच्या वेळच्या माकडांचे हे अवतार असून सीतेच्या वरदानानें त्यांना राज्य प्राप्त झालें आहे, हा समज अद्यापिहि या लोकांत आहे. साहेब लोकांना शेपूट असल्याबद्दल तर पुष्कळांची खात्रीच आहे. तेव्हां देशमुखाच्या गांवांत व्हाइट साहेबांची स्वारी आपल्या काळ्या लष्करासह शिरतांच जिकडे तिकडे मोठी धांदल उडाली. लढाईवर माणसें धरून पाठविण्याकरितां साहेब आले आहेत, अशी देखील तितक्यांतल्या तितक्यांत कोणी गप्प उठविली ! मग काय विचारतां ! जिकडेतिकडे धावाधाव आणि पळापळ सुरू झाली. कित्येकांनी तर आपले दरवाजे देखील बंद करून घेतले !

दहा वाजण्याच्या सुमाराला साहेबांची स्वारी देशमुखाच्या दाराशीं येऊन थडकली. ही बातमी समजतांच जगन्नाथराव आणि विनायकराव आंतून उठून बाहेर आले. विठ्ठलरावांची तर पांचावर धारण बसली. अगोदरच आपापसांत सगळें कबूल करून मोकळें व्हावे, असा त्यांनीं मनांतल्या मनांत विचार केला. कारण, पोलिस म्हणजे काय आहे, हें त्यांना थोडेंबहुत माहीत होतें, आणि कोणत्याना कोणत्या कारणानें म्हणाना, परंतु सगळ्याना आपलाच संशय आला आहे, हेंहि ते समजून चुकले होते. इतक्यांत गोविंदराव देखील आपल्या दादांवर उठले आणि वेळ पडली तर त्यांच्याविरुद्ध साक्ष देण्यासहि तयार झाले. हें पहातांच तर विठ्ठलरावाच्या नाड्या आखडल्या. कसेंतरी करून गोविंदरावांना आपल्या बाजूला ओढण्याची ते मसलत करूं लागले. बाहेर पोलिसचे लोक आल्याचें समजतांच त्यांनीं मोठ्या तांतडीनें गोविंदरावांना हांक

मारून आपल्या खोलींत नेलें आणि कांपऱ्या आवाजानें ते म्हणाले "गोविंदा ! अरे तूंहि यांच्या बरोबर लागून वेडा कसा झालास ? तुला टाकून मीं आजवर कधींतरी कांहीं केलें आहे का ? मीं हल्लींहि जें कांहीं केलें आहे तें केवळ आपल्या दोघांच्या हितासाठींच केलें आहे, समजलास ? असा मूर्ख होऊं नकोस. बाबांनीं आपल्या नकळत विनूला किती पैसा दिला आहे तें कुठें तुला माहीत आहे ? मीं जें लपवून ठेविलें आहे त्याचा गोंगाट करून त्यांतला आणखी भाग त्याला देणार कीं काय ? ही गडबड एकदां शांत झाली, म्हणजे तूं आणि मी गुपचूप तें सारखे वाटून घेऊं. तूं वेड्यासारखा नाचूं नकोस त्यांच्याबरोबर ! मला तूं अद्यापि ओळखलें नाहींस वाटतें ?"

"पण, हें मला अगोदरच कां नाहीं सांगितलें ? म्हणजे मुळीं इतका गोंगाटच होऊं दिला नसता. बरें, एकंदर किती रुपये आहेत ?" गोविंदरावांनी हंसतहंसत विचारलें.

"तें मग मी सगळे तुला सांगेन. माझ्यावर तरी तुझा विश्वास आहे ना ? आतां या गडबडींत नको. नाहीं तर उगाच संशयाला कारण व्हायचें." असें म्हणून विठ्ठलरावांनीं गोविंदरावांला उडवून लाविलें.

मूर्ख, अक्कलशून्य गोविंदराव याप्रमाणें पुनः आपल्या दादांना सामील झाले. विठ्ठलरावांची पक्की खात्री होती कीं, विनायकराव आणि जगन्नाथराव हे दोघेहि अत्यंत सुस्वभावी आणि सज्जन आहेत. तोंडानें काय पाहिजे तें बडबडोत, परंतु आपल्याला विपत्तींत ते कधींच पहावयाचे नाहींत. या भरंशावर ते मग स्वस्थ राहिले. घशाखालीं उतरलेल्या रोख पैशांचा किंवा दागदागिन्यांचा मुळींच पत्ता लागूं द्यावयाचा नाहीं, असा त्यांनीं ठाम निश्चय केला.

---

प्रकरण विसावें

## व्हाईटसाहेब

इकडे साहेब कसा असतो तें पहाण्याच्या हेतूनें गांवांतील कितीतरी मुलें आणि मोठमोठीं माणसें देखील देशमुखांच्या घरासमोर जमलीं होतीं. व्हाईटसाहेबांना याचा मुळींच घुस्सा आला नाहीं. उलट, हे इतके लोक कशाला जमले आहेत म्हणून ते फौजदारांना विचारूं लागले; आणि "केवळ आप-

त्याला पहाण्यासाठींच !" असें फौजदारांनीं अदबीनें उत्तर देतांच त्यांना त्याचें मोठें कौतुक वाटलें.

हें सगळें बोलणें इंग्रजींत चाललें होतें. अर्थात्, तेथें जमलेल्या लोकांपैकीं कोणाएकाला त्यांतले एक अक्षरदेखील समजत नव्हतें. ते आपले साहेबांच्या तोंडाकडे पहात उभे राहिले होते. नंतर चोरीची गोष्ट काढून "कुठून चोरी झाली ? कशी झाली ? किती ऐवज गेला ?" इत्यादि माहिती साहेब विचारूं लागले.

हें पाहून जगन्नाथराव विनायकरावांकडे बोट दाखवून म्हणाले "यांच्या घरीं चोरी झाली, तेव्हां हेच आपल्याला सर्व वृत्तांत सांगतील. हें माझे घर नव्हे. मी आपला येथे सहज आलों आहें."

विनायकराव किंचित् पुढें सरून साहेबांसमोर आले. व्हाईटसाहेबांनी एकवार त्यांच्याकडे पाहून पुनः जगन्नाथरावांना विचारिले "तुम्हीं या गांवीं रहात नाहीं म्हणता तर मग तुमचें घर कुठें ?"

जगन्नाथरावानीं थोडक्यांत आपल्या वडिलांचें नांव गांव वगैरे सर्व हकीगत साहेबांस सांगितली. ती ऐकून साहेब मोठ्या आश्चर्यानें म्हणाले "काय ! नानासाहेब देशपांड्याचे तुम्ही चिरंजीव ? वाः ! तुम्हाला पाहून मला फार आनंद होत आहे. नानासाहेब खानदेशांत होते तेव्हांपासून माझा त्यांच्याशी परिचय जमला होता. मी वारंवार तुमच्या घरीं येत असें. तुम्ही त्या वेळीं लहान होतां."

असें म्हणून त्यांनीं जगन्नाथरावांचा हात धरून त्यांना आपल्याजवळ बसविलें, त्यांच्या कुटुंबाच्या कुशलतेसंबंधीं अनेक प्रश्न त्यांना विचारिले आणि शेवटीं त्यांचा व विनायकरावांचा स्नेह कसा जमला, हेंहि समजून घेतलें. याप्रमाणें व्हाईटसाहेब बराच वेळ जगन्नाथराव व विनायकराव यांच्याशीं गप्पागोष्टी सांगत होते. सुंदर इंग्रजी बोलण्याबद्दल त्यानीं त्या दोघांचीहि फार प्रशंसा केली. नंतर विनायकरावांच्या पितृवियोगाच्या दुःखाबद्दल आपली अत्यंत सहानुभूति प्रगट करून त्यांनीं पुनः चोरीची गोष्ट काढिली.

विनायकराव म्हणाले "वडील वारल्याला अझून दोन दिवस देखील झाले नाहींत. त्यांच्याजवळ काय होतें नव्हतें तें देखील अद्यापि मला बरोबरसें समजलें नाहीं. रोकड किती, दागदागिने काय काय होते, त्यांपैकीं चोरीस काय काय गेलें, आणि राहिलें आहे काय, हें कांहीं मला खात्रीपूर्वक सांगतां

येत नाहीं. आणि एवढ्याचकरितां चोरीची फिर्याद तूर्त तरी मी करूं इच्छीत नाहीं. पुढें प्रसंग पडल्यास पहातां येईल."

हें ऐकून व्हाईटसाहेब हंसले आणि म्हणाले " समजलों, समजलों ! तुमच्या मनांत ही गोष्ट दाबून ठेवावयची आहे. तुमच्या नातलगांपैकींच कुणाचें तरी अंग आहे वाटतें यांत ? असूं द्या. तुम्ही ज्या अर्थी फिर्याद करूं इच्छींत नाहीं, त्या अर्थी मीहि या बाबतींत कांहीं करणार नाहीं. तुमच्याशीं संभाषण केल्यावर मला फार आनंद झाला आहे, परंतु हें पहा, तुम्हाला जर या कामांत कुणाचा संशय येत असेल तर तुम्ही मला तसें बेलाशक सांगा. तुम्हाला इतका देखील त्रास पडूं देणार नाही. बिलकुल काळजी करूं नका त्याबद्दल."

विनायकराव पराकाष्ठेचे सरळ आणि सत्यप्रिय होते. परंतु तसेच मायाळूहि होते. विठ्ठलरावांनीं जो त्यांच्यासंबधीं तर्क केला होता, तो चुकीचा नव्हता. पैशासाठीं आपल्या वडील भावाला हालअपेष्टा भोगावयास लावणे त्यांना बरें वाटलें नाहीं. ते म्हणाले " साहेब, आपण फार थोर मनाचे आहा, आपल्याजवळून कांहीं लपवून ठेवणें योग्य होणार नाही एका मनुष्याचा मला संशय येतो खरा; परंतु केवळ संशयावरून एखाद्याला संकटांत पाडणें मला बरें दिसत नाहीं."

" तुमच्या या सरळ भाषणानें मला फार संतोष होत आहे. मीहि तुम्हाला उगाच आग्रह करूं इच्छीत नाहीं. पुढें जरूर पडल्यास मला कळवा. शक्य तेवढें तुमच्यासाठीं करण्यास मी कधीहि अनमान करणार नाही."

असें म्हणून बरोबर आणलेल्या 'खान्या'चा यथास्थित समाचार घेऊन साहेब परत जाण्यास निघाले. जातांना ते जगन्नाथराव आणि विनायकराव यांना म्हणाले " तुमच्याशी परिचय झाला याचा मला फार आनंद होत आहे. केव्हांहि आमच्या सदर स्टेशनाला आला तर मला भेटल्याशिवाय जाऊं नका. माझ्याकडून कोणतेंहि काम होण्याजोगे असलें तर तें मी तुमच्यासाठीं मोठ्या खुषीनें करीन."

साहेबांच्या बरोबर पोलिसची फौजहि गेली. अगदींच रिक्तहस्तानें परत जाण्याचा प्रसंग येईल, असें त्यांना देखील पूर्वी वाटलें नव्हतें. अर्थात् या गोष्टीचें त्यांना फारच वाईट वाटलें. स्वतः साहेब तपासासाठीं आलेले, इतकें थोरले काळ्या डगल्याचे लष्कर बरोबर आलेले, परंतु कोणालाहि पकडून चौकीवर नेण्यांत आलें नाहीं, कोणालाहि कडीतोड्यांचें बक्षीस मिळाले नाहीं, कोणालाहि चतुर्भुज करून बरोबर नेलें नाहीं, हें पाहून गांवांतील लोक परा-

काष्टेचे विस्मित झाले. कित्येकांना तर याबद्दल वाईटहि वाटले! साहेब इतका वेळ काय काय बोलत होते हें पुनः पुनः विचारून सर्वजण जगन्नाथरावांना व विनायकरावांना बेजार करूं लागले.

---

## प्रकरण एकविसावें
## जगन्नाथराव आणि यमुना

विनायकरावांच्या गांवींच परंतु त्याच्या घरापासून बऱ्याच अंतरावर जगन्नाथरावांच्या सासऱ्याचें घर होतें, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. जगन्नाथरावांची पत्नी यमुना ही विनायकरावांच्या नातलगापैकींच होती, हेंहि मागें सांगितलेंच आहे. यमुनेचे वडील गोपाळराव हे मूळचे बरेच सधन होते; परंतु मध्यंतरीं व्यापारांत त्यांना अशी कांहीं जबर ठोकर बसली होती कीं, त्यांना अन्नानें राहतां येण्याची देखील मारामार पडूं लागली. त्याचा स्वभाव मोठा न्यायी, सत्यनिष्ठ आणि निस्पृह होता. आपल्यामुळें दुसऱ्या कोणाचे एक पैचेंहि नुकसान त्यानीं होऊं दिलें नाहीं. घरदार अगदीं धुऊन काढून त्यांनीं लोकांच्या देण्याची फेड करून टाकिली. शेवटीं जें कांहीं होतें नव्हतें तें सर्व खर्च करून लग्नाला आलेली आपली मुलगी यमुना हिला सुस्थळीं दिली. या खर्चामुळें तर त्यांची स्थिति फारच खालावली. जेमतेम ते आपला प्रपंच चालवीत होते. प्राप्ति मुळींच राहिली नाहीं, अशा स्थितींत अब्रूनें दिवस काढणें किती कठीण आहे, हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. त्यातूनहि गोपाळरावांचा स्वभाव म्हणजे पराकाष्ठेचा मानी. दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाणें हें ते महान् पातक समजत असत. नाहींपेक्षां आपल्या इष्टमित्रांच्या साहाय्यानें त्यांनी आपल्या धंद्यांत नवें भांडवल घालून बसलेली ठोकर केव्हाच भरून काढिली असती. यांचे व्याही जगन्नाथरावांचे वडिलहि कांहीं कमी श्रीमंत नव्हते; परंतु दुसऱ्याजवळ तोंड वेंगाडण्याचा अपमानकारक प्रसंग येण्यापेक्षा मरण देखील पुरवलें, असें मानणाऱ्या बाणेदार गोपाळरावांकडून ही गोष्ट व्हावी कशी? दैवदुर्विलासानें प्राप्त झालेल्या स्थितींत आपल्या मनगटाच्या जोरावर ते कसेबसे परंतु मोठ्या अब्रूनें दिवस काढीत होते. ही दीनावस्था त्यांच्या मानी स्वभावाला इतकी कांहीं डंवचत होती कीं, प्रत्यक्ष आपल्या जावयाला देखील अलीकडे कधीं आपल्या घरीं बोलविण्याच्या भानगडींत ते पडले नाहींत. अशा श्रीमंत मंडळीला घरीं आणून आपलें दारिद्र्य उघडें करणें

त्यांना प्रशस्त वाटत नसे. जांवयाला दोन दिवस आपल्या घरीं आणावें, त्यांचें आदरातिथ्य करावें, अशी यमुनेच्या आईची फार इच्छा होती; आणि त्या प्रमाणें ती या कामीं गोपाळरावजींची अगदीं पाठ पुरवीत असे; परंतु गोपाळरावजींनीं आज बरेच दिवसांत तिकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं.

आता देशमुखांच्या घरी जावई आल्याचें समजल्यापासून त्यांना एक दिवस तरी आपल्या येथे बोलावून आणण्याविषयीं यमुनेची आई गोपाळरावांजवळ सारखा आग्रह धरून बसली होती जावई गांवांत आले असतां गोपाळरावानाहि मग नाहीं म्हणवेना. शेवटी देशमुखाच्या घरी ते समाचारासाठीं गेले असता त्यांनी जगन्नाथरावांजवळ ही गोष्ट काढिली. त्यांनीं जरी गोष्ट काढिली नसती, तरीं जावई आपण होऊनच या खेपेला श्वशुरगृहीं गेले असते. निदान, जगन्नाथरावांना तरी आपल्या सासऱ्याकडे जाण्यास निमंत्रणाची किंवा अत्याग्रहाची बिलकुल आवश्यकता वाटत नव्हती. आणि या खेपेला तर ती खास वाटली नसती. कारण, त्याची प्रिय पत्नी यमुना ही या वेळीं माहेरींच होती, तेव्हां अनायासें सासऱ्यांनीं गोष्ट काढतांच ते विनायकरावांना विचारून मोठ्या खुषीने त्यांच्याबरोबर निघाले.

जामाताच्या आगमनाने गोपाळरावांच्या घरीं आज आनंदीआनंद झाला. यमुनेचीं धाकटीं भावंडें "भावोजी आले, भावोजी आले!" म्हणून आनंदानें नाचूं लागलीं. स्वयंपाकघरांत सासूबाईची तारांबळ उडून गेली. जांवयासाठीं काय करूं आणि काय नको, असें त्याना होऊन गेलें. यमुनाबाईची धांदल तर विचारूंच नका!

श्वशुरालयींच्या आदरातिथ्यानें जगन्नाथरावांचें अत्यंत समाधान झालें. आजवर आपला इतका थाटमाट कोठेंच झाला नव्हता, असें त्यांना वाटूं लागलें. भोजन वगैरे यथास्थित झाल्यानंतर सासऱ्याजवळ थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी करून ते शयनमंदिरात गेले. एका प्रशस्त खोलींत एका पलंगावर सुंदर बिछाना घातला होता. जगन्नाथराव त्या बिछान्यावर पडून उत्सुकतेनें आपल्या पत्नीची मार्गप्रतीक्षा करूं लागले. यमुनाहि आपलें कामकाज आटोपून लवकरच तेथें आली आणि स्मित करून म्हणाली "अहाहा! आज केवढा महद्भाग्याचा दिवस उगवला हा!"

पत्नीचें हें विनोदपूर्ण मधुर भाषण ऐकून जगन्नाथराव आनंदानें म्हणाले "कां बरें! एवढें कसलें भाग्य उदयाला आलें?"

" वाः कसलं ! कसलं म्हणून काय विचारायचं ? अमावास्येला पूर्णचंद्राचा उदय झाला–निर्धनाच्या हातीं धनाचा ठेवा लागला—रंकाच्या घरीं राजा—"

" वाहवा ! तूं आणखी माहेरीं राहिलीस, तर मला वाटतें, कांहीं दिवसांनीं कवीच बनून जाशील !"

यमुना मृदु मधुर हास्य करून म्हणाली " कांहीं दिवसांनीं कशाला ! सध्या कुठं नाहीं येत मला कविता करतां ? आपल्याकडून मला शिक्षणच मुळीं तसं मिळालं आहे ! चंद्रोदय होतांच समुद्र जसा आनंदानं उचंबळूं लागतो, तसंच आपल्या दर्शनानं माझ्या कवित्वशक्तीला, माझ्या आनंदाला स्फुरण येतं—"

" हं हं ! मग आतां असें करा. रिकामपणीं बसल्याबसल्या एक शाळा तरी घाला !"

" फार चांगली मसलत सांगितली ! आपल्यासारखी शिष्यमंडळी मिळाली तर शाळा घालण्याची मजकडून या घटकेस तयारी आहे !"

" पण त्यांना शिकविणार काय ?"

" काय म्हणजे ? संसारांतील कित्येक गोष्टी. उदाहरणार्थ, पुरुषांप्रमाणंच स्त्रियांनाहि सुखदुःख होत असतं, ही पहिली गोष्ट ! पुरुषाच्या हें लक्ष्यातच येत नाहीं कांहीं केल्या !"

पत्नीला आपल्याजवळ ओढून जगन्नाथरावांनीं प्रेमभरानें विचारिलें " आज या सगळ्या नव्यानव्या गोष्टी चालल्या आहेत, आहे काय हा प्रकार ?"

" आज मुळीं सगळंच नवं आहे ! मग गोष्टी तरी नव्या कां नकोत ? स्वारीला फार कष्ट होत असतील, नाहीं का ?"

" हो, राणीसाहेबांच्या गजेंद्रगमनानें तर फारच कष्ट झाले. मला वाटलें, आज मुळीं आगमनच होत नाहीं. येण्याची काहीं मोठीशी इच्छा होतीसें दिसत नाहीं— "

" माझ्यासाठीं तर इकडे झोंप देखील आली नसेल !"

" हो, हें कांहीं अगदींच खोटें नाहीं !"

" हें काय सांगितलं पाहिजे ! विनूभाऊंकडे येऊन आज किती दिवस झाले. पण कधीं एकवार दिखील कांहीं यावसं वाटलं नाहीं. बाबा आज गेले नसते तर मला वाटतं परस्पर जाणं दिखील झालं असतं !"

जगन्नाथराव काय बोलावें या विचारात आहेत तोंच यमुना किंचित् रागावल्यासारखें करून म्हणाली " बिचारे सासुसासरे काय गरीब दुबळे ! तेव्हां

त्यांच्या भेटीला नाहीं आलं, तरी शोभण्यासारखं आहे म्हणा. पण मी तर कांहीं आतां तशी दुबळी नाहीं ना राहिल्यें ? मग मला तरी एकवार दर्शन द्यायचं होतं कृपा करून ? इथं यायचं झाल्यावर दोन दिवस मीं वाट पाहिली. नाहींच कुणाला यायची वासना झाली, तेव्हां शेवटीं मींच एक दिवस आईच्या बरोबर विनूभाऊंकडे जाऊन चोरून दर्शन घेऊन आल्यें !"

जगन्नाथरावांनीं आपल्या प्रियपत्नीच्या सुंदर मुखकमलाचें प्रेमभरानें चुंबन घेऊन हंसतहंसत म्हटलें " वाः ! एकून तूं आमच्यावर आघाडी मारलीस खरी ! जायचें जायचें म्हणून मी रोज विचार करीत होतों, पण या अशा प्रसंगांत विनायकरावाला एकटे सोडून कसें यावे बरें ?"

" मनांत असलं म्हणजे सर्व कांहीं होतं ! त्या मोठमोठ्या इंग्रजी पुस्तकांत बायकांच्या सुखदुःखाविषयीं मला वाटतं कांहींच लिहिलेलं नसतं ! नाहींपेक्षा एवढ्या मोठमोठ्या गोष्टी समजतात आणि ही मेली लहानशी गोष्ट कशी कळत नाहीं ? बरं तें राहो. पण आज बरेच हाल काढावे लागत असतील नाहीं का ?"

" कसले हाल ?" जगन्नाथरावांनीं आश्चर्यानें विचारिलें.

" कसले म्हणजे ! अशा सुंदर बिछान्यावर कधीं निजायला मिळालं होतं का, आणि असलं सुरेख जेवण तरी मिळाल्याचं आठवतं का ?" यमुना स्मित करून म्हणाली.

" कां ! जेवणाचा बेत तर मोठा सुरेख होता—"

" हो हो, सुरेख नाहीं तर काय ! विदुराच्या घरच्या कण्या !"

" हें पहा, इतके कांहीं दैन्य नको दाखवायला बरें ?"

" दैन्य ! मी काय म्हणून दैन्य दाखवीन ? मला काय कमी आहे ? माझ्यासारखं सौभाग्य आहे कुणाचं ?"

जगन्नाथरावांनी आपल्या चतुर भार्येच्या मुखकमलाचें पुनः प्रेमानें चुंबन घेतलें. सारी रात्र जागून प्रेमाच्या गोष्टी सांगित्यानेंहि जितका अनुराग प्रगट झाला नसता, त्यापेक्षाहि सहस्रपटीनें अधिक अनुराग त्या एका चुंबनानें प्रकाशित झाला. 'प्राणापेक्षांहि तुजवर अधिक प्रेम आहे' हें त्या एका चुंबनानें व्यक्त करून दाखविलें. असो. फार रात्र झाली असें पाहून यमुनेनें समईला निरोप दिला, तोंच खोलीच्या खिडकींतून चंद्राचीं सोज्ज्वल किरणें आंत आलीं.

आपल्या प्रियपतीला तें दाखवून यमुना प्रसन्नमुद्रेनें म्हणाली " हें पाहिलं का ? हिऱ्यांचे आणि रत्नांचे दिवे लावले आहेत बरं या मंदिरांत ! मला नाहीं

वाटत कधीं अशा मंदिरांत निजायाला मिळालं असेल इकडे! असो म्हणा ‘ उंच उंच माड्या नाहीं कामाच्या, साधूची झोंपडी बरी !’ ही आपली आवडती म्हण सिद्ध करून दाखविण्याचा आपल्यावर प्रसंग आला आहे. कितपत कसोटी उतरते ती पहायची आहे !”

---

प्रकरण बाविसावें

## कावा साधला

दुसरे दिवशीं सकाळीं जगन्नाथराव परत विनायकरावांकडे आले आणि गडप केलेला ऐवज विठ्ठलरावांकडून परत मिळण्याचा सगळे मिळून उद्योग करूं लागले. परंतु विठ्ठलरावांनीं कांहींकेल्या मुळींच दाद दिली नाहीं. आता कांहीं पाठीशीं लचांड येण्याची धास्ती राहिली नाहीं, हे पाहून तेच उलट या मडळीवर फार रागावले आणि म्हणाले “ माझी तुम्ही काय म्हणून पाठ पुरवतां ? मीं काय कुणाची चोरीविरी केली आहे वाटतें ? कुणाला तसा संशय असेल तर खुशाल नेऊन मला पोलिसांत द्या, असे भितां कां ? मी कांहीं कुणाच्या काकाचे दोन चव्वल लागत नाहीं, तर मला त्याची धास्ती ! इकडे न्याय आहे कुठें ? नाहीं-पेक्षा आजवर मीं मिळविलेला सर्व पैसा या संसारांत खर्च झाला आहे तोच उलट मला परत मिळाला असता.”

विठ्ठलरावांचें हें बोलणें ऐकून सर्वजण चकित झाले. जगन्नाथराव किंचित् रागावल्यासारखे करून म्हणाले “ सगळयाच ठिकाणीं नरमपणा चांगला नाहीं खरोखरच पोलिसांत द्यायला पाहिजे होता खटला. आणि मला वाटतें, आता-तरी निदान आपला कुणावर संशय आहे वगैरे हकीगत पोलिसांत कळवावी हेंच चांगलें.”

इतके बोलून ते विनायकरावांकडे वळले आणि म्हणाले “ अरे, विचार कसला करीत बसला आहेस ? जे गेलें तें गेलें. आतां पाणी सोड त्यावर. या नरमपणानें कांहीं व्हायचें नाहीं; मन जरा कठीण केलें कीं, हूं हूं म्हणता निकाल !”

यावर कांहीं वेळ स्तब्ध राहून विनायकराव दुःखानें म्हणाले “ प्रारब्धापुढें कांहीं कुणाच्यानेंहि जावयाचें नाहीं. वडिलांच्या कीर्तीला काळिमा आण-ण्याचें माझ्या हातून होणार नाहीं. वडिलांच्या संपत्तीची मीं मुळींच आशा धरली नाहीं.”

झालें. विठ्ठलरावांनाहि मग मुळींच कसली भीति उरली नाहीं. बिचाऱ्या जनार्दनपंतांसाठीं त्यांच्या लौकिकाला शोभण्यासारखा दानधर्म होण्याचें बाजूलाच राहिलें; उलट त्यांची और्ध्वदेहिक क्रियादेखील कशीबशी उरकून घेण्यांत आली.

तेरा दिवस होतात न होतात तोंच विठ्ठलरावांनीं विभक्त होण्याचा प्रश्न काढिला. गोविंदरावांनीं त्याला अनुमोदन दिलें. हें पाहून विनायकरावांनींहि मग कांहीं अडथळा आणिला नाहीं. अर्थात्, तिघे भाऊ विभक्त झाले. विठ्ठलराव आणि गोविंदराव यांनीं आपल्याला हव्यातशा वाटण्या करून घेतल्या. अवशिष्ट जें कांहीं राहिलें तें विनायकरावांनी आपला हिस्सा म्हणून घेतले. रहातें घर चांगलें होतें तें दोघां वडील बंधूंनीं घेतलें. बाजूचें अर्धवट राहिलेलें घर विनायकरावांच्या वांट्याला आलें. तें पुरें करण्याला लागणाऱ्या खर्चासाठीं कांही रक्कम अर्थात् दोघां वडील भावांनीं विनायकरावांना देण्याचें कबूल केलें. सगुणाबाईनींहि तूर्त त्याच घरांत रहावें, असें ठरविण्यांत आलें. विठ्ठलराव आणि गोविंदराव यांनीं याप्रमाणें वांटण्या केल्या. विनायकरावांच्या तर्फे कोणींकोणीं यांत हरकत घेतली परंतु स्वतः विनायकरावांनीं यांत मुळींच हरकत घेतली नाहीं. ते म्हणाले "तंट्या बखेड्याशिवाय जें काय होईल तें चांगलें. मी यासाठीं भांडण करायचा नाहीं. दादा, अप्पा जें कांहीं करतील तें मला मान्य आहे."

घरांतील भांडींकुंडी वगैरे जे कांहीं होतें त्याचेहि तीन भाग करण्यात आले. विठ्ठलराव व गोविंदराव आपापलें सामानसुमान आपापल्या जागेत नेण्याच्या उद्योगाला लागले. विनायकरावांच्या वांट्याला नवें घर आलें होतें खरें, परंतु त्याचें अद्यापि बरेंच काम व्हावयाचें होतें. जमिनीदेखील चांगल्याशा झाल्या नव्हत्या. विनायकरावांना तेथेच जाऊन रहावें लागलें. सर्व चांगल्या चांगल्या वस्तु वडील बंधूंच्या वांट्याला जाऊन निरुपयोगी वाईटसाईट एकंदर वस्तु अगदीं बिनचूक त्यांच्या वांट्याला आल्या होत्या. मुलाच्या संसाराची ही दुर्दशा पाहून सगुणाबाई दुःखानें रडूं लागल्या. हें पाहून सरस्वती त्यांचें सांत्वन करून म्हणाली "रडून काय होणार आहे? देवाच्या मर्जीच्या या गोष्टी; त्याची कृपा असली तर ही स्थिति बदलण्यास कांहीं वेळ का लागायचा आहे?"

बोलतां बोलतां सरस्वतीच्या डोळ्यांतहि अश्रु आले; आणि हें पाहून तर सगुणाबाईंच्या दुःखसमुद्राला अधिकच भरतें आलें. विनायकराव जवळच होते, ते आईचें समाधान करून म्हणाले "आई! तूं उगाच कां दुःख करतेस? देव

करील तर आपलें सर्व कांहीं यथास्थित होईल. तो ठेवील त्यांतच संतोष मानून राहिलें पाहिजे. त्याबद्दल दुःख आणि चिंता करून काय होणार आहे ?"

"अहो, तुम्हाला कशाला काळजी हवी? तुमचा विनायक आहे. तुमची सून आहे आणि मींहि कुणी परका नाहींच! तुम्हाला हो कसलें दुःख आहे? सगळेच कांहीं आपले शत्रु नाहींत. हेहि दिवस निघून जातील!" असा जगन्नाथरावांनींहि सगुणाबाईंना धीर दिला. तेव्हां म्हातारीच्या मनाला किंचित् स्वस्थता आली. याप्रमाणें स्थिरस्थावर झाल्यावर जगन्नाथराव आपल्या गांवीं निघून गेले.

अर्ध्यावरच पडलेल्या त्या घरांत सोय म्हणून कसलीच नव्हती. डोक्यावर धड छप्परहि नव्हतें. त्यामुळें त्यांत रहाणाऱ्या मंडळीचे फार हाल होऊं लागले. आपली दुःखानें पोळलेली आई आणि पत्नी यांना होत असलेले कष्ट पाहून विनायकरावांचें हृदय फाटूं लागलें. कसेंहि करून घर तात्पुरतें तरी नीट करून घेतलेंच पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें; परंतु हातांत पैसा नाहीं. रोख पैसे आणि त्याचप्रमाणें खतेंपत्रें सर्व कांहीं विठ्ठलराव गडप करून बसले होते. स्थावर मिळकत जी कांहीं होती तिच्या उत्पन्नाचा एकतृतीयांश विनायकरावांना मिळत असे, त्यावर कसाबसा त्यांचा उदरनिर्वाह होत होता. घर पुरें करण्यासाठीं विठ्ठलराव आणि गोविंदराव यांनीं जें कांहीं देण्याचें कबूल होतें तेंहि 'आज देऊं उद्यां देऊं' करून त्यांनीं अद्यापि दिलें नव्हतें. या गोष्टीला ते बऱ्याच संभावित मंडळीसमक्ष कबूल झाले होते. विनायकरावांनीं मनांत आणिलें असतें तर कोर्टाच्या साहाय्यानें त्यांचें तें वचन पुरें करून घेतां आलें असतें; परंतु ते म्हणत "जाऊंद्या. त्याचीहि मी आशा सोडली. हत्ती गेला आणि आतां शेपटासाठीं कोर्टाची पायरी चढायची हें आपल्याला नको!"

अर्थात्, ती गोष्टहि तेवढ्यावरच राहिली. कोठेंतरी दोन पावलें दूर जाऊन चांगलीशी नोकरी पाहूं, असा विनायकरावांनीं बेत ठरविला आणि त्याप्रमाणें आईचा व पत्नीचा निरोप घेऊन ते घराबाहेर पडले. जातांना आपल्या दोघांहि वडील भावांना आईसंबंधीं विशेष काळजी घेण्याबद्दल त्यांनीं पुनः पुनः विनंति केली.

त्याच रात्रीं गोविंदरावांला आपल्या खोलींत गुपचूप बोलावून आणून विठ्ठलराव म्हणाले " पैशासाठीं तूं मला अगदीं घाबरें करून सोडिलें होतेंस. हे घे तुझे पैसे. सहाशेंबारा रुपये मीं लपवून ठेवले होते एकंदर, त्यांतले हे दोनशें रुपये तुला देतों—"

असें म्हणून त्यांनीं दोनशें रुपये गोविंदरावांच्या पुढ्यांत ठेविले. ते न घेतां गोविंदराव म्हणाले "असें कां बरें दादा? अर्धा हिस्सा देण्याचें नाहीं त्या दिवशीं कबूल केलेंत?"

त्याबरोबर विठ्ठलराव मोठ्या उदार मनानें म्हणाले "बरें आहे बुवा. तसें का होईना? एकवार गेलेला शब्द मी कधींहि परत घेणार नाहीं! आणखी एक तुला सांगून ठेवतों. माझ्या विचारानें चाललास तर थोडाबहुत तुझा फायदाच होईल; तोटा व्हायचा नाहीं, हें लक्ष्यांत ठेव."

"पण मी कधींतरी तुमच्या विचाराबाहेर गेलों आहे का?" अक्कलशून्य गोविंदराव मोठ्या समाधानाने म्हणाले.

विठ्ठलरावानीं थैलींतून रुपये बाहेर काढून त्यांचे सारखे दोन भाग केले. तीनशें सहा रुपये गोविदरावाच्या हवालीं करून बाकीचे तीनशें सहा त्यांनीं पुनः त्या थैलींत भरून ठेविले. ते घेऊन गोविंदराव मोठ्या आनंदानें निघून गेले. विठ्ठलरावांचा कावा चांगलाच साधला.

येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, वडिलांजवळ भांडण करून गोविंदराव रागारागाने सासुरवाडीस निघून गेले होते त्यावेळीं त्यांची शाळाहि अर्थात् बंद झाली. कित्येक दिवसानीं दुसऱ्या एका इसमानें शाळा घातली, त्याबरोबर गोविंदरावांची सर्व मुलें त्या नव्या शाळेंत जाऊन दाखल झालीं. गोविंदरावांचें बस्तान मग कांहीं केल्या जुळलें नाहीं. त्याचें हे बाहेरचें उत्पन्न याप्रमाणें बंद झालें. विठ्ठलरावानीं दिलेल्या पैशावर पुढें कांहीं दिवस ते स्वच्छंदानें संसार चालवूं लागले. विठ्ठलरावांचीहि अवस्था नीच झाली. हुकमावांचून ते निघून गेल्यामुळें आणि पुढेहि कित्येक दिवस त्याचा पत्ता नसल्यामुळे त्याच्या यजमानाने त्यांच्या जागीं दुसरा इसम ठेवून दिला, परंतु त्याचें विठ्ठलरावाना कांहींच वाटलें नाहीं. अगोदरपासून त्यांनीं थोडाबहुत पैसा जमवून ठेविलाच होता. त्यांत वडिलांच्या पेटींतून रोख तीन हजारांचे तीन तोडे त्यांनीं पसार केले होते तेहि त्यांच्या पदरात पडले. याशिवाय लोकांकडून येणें असलेल्या कितीतरी रकमांचीं खतें आणि सोन्यारुप्याचें दागिनें त्यांनी हाताखालीं घालून ठेविलेच होते. न्यायानें म्हणा, कीं अन्यायानें म्हणा, परंतु पैसा जमवावयाचा हा त्यांचा मूळमंत्र होता; आणि या मंत्राचा प्रयोग कोठें व कसा करतां येईल या दुष्ट विचारांत त्यांचें अंतःकरण सदैव मग्न असे.

---

## प्रकरण तेविसावें
# चाकरी मिळाली

दूरदेशीं जाऊन चांगलीशी नोकरी पहावी, अशा उद्देशानें विनायकराव घराबाहेर पडले खरे, परंतु निरोप घेतेवेळीं आईची आणि पत्नीची झालेली दुःखद स्थिति पुनः पुनः डोळ्यांसमोर उभी राहून त्यांचें हृदय भडभडून येऊं लागलें. एक पाऊलहि पुढें टाकण्याची त्यांना इच्छा होईना; परंतु करणार काय ! नोकरी केल्याशिवाय तर गत्यंतरच नव्हतें. इतकी दुर्दशा झाली, तरी विनायकरावांच्या उदार अंतःकरणांत प्रतिहिंसेला म्हणून जागादेखील मिळाली नाहीं. त्याबद्दलचा विचारहि कधीं त्याच्या मनांत येत नसे. तेंच विठ्ठलराव आणि गोविंदराव यांजकडे पहा ! नोकरी करण्याच्या उद्देशानें विनायकराव घराबाहेर पडतांच त्या दोघांनाहि धास्ती पडली कीं, न जाणों, याला वेळेस कोठें मुनसफाची नाहीं तर मामलेदाराची जागा मिळावयाची. म्हणून ते दोघेहि मनांतल्या मनांत जळूं लागले. विठ्ठलरावांनीं तर विनायकरावांचें हें जाणें निष्फळ व्हावें म्हणून देवाला नवस देखील केला !

विनायकराव शून्य हृदयानें आपल्या मार्गाला लागले. संसाराची खरी ओळख त्याना आतां पटूं लागली. आईची आणि पत्नीची त्यांना वारंवार आठवण होऊन त्यांचें हृदय व्याकुळ होऊं लागलें. कोठें जावें, कोणाचा आश्रय धरावा, कोणाजवळ याचना करावी, इत्यादि विचारांनीं त्यांच्या अंत.करणांत काहूर उठविलें. अफाट समुद्राच्या मध्यभागीं वादळात सापडलेल्या गलबतावरील नावाड्याप्रमाणें त्यांची स्थिति झाली होती. कोणत्या दिशेने गेलें असतां सुखरूपपणें किनारा हातीं येईल, हेंच त्यांना समजेना. अशा या विपन्नावस्थेंत क्षितिजावर अकस्मात् एक सौख्यसूचक तारा चमकूं लागला, आणि त्या योगानें मन बरेंच थाऱ्यावर आलें. 'केव्हांहि आला तरी मला भेटल्यावांचून राहू नका. तुमचें एखादें काम माझ्याकडून होण्याजोगें असलें तर तें मी मोठ्या खुशीनें करीन.' म्हणून व्हाईटसाहेबांनीं आश्वान दिलें होतें, त्याची विनायकरावांना यावेळीं आठवण झाली. साहेबांचा स्वभाव फार दयाळू असल्याचें त्यांच्या अनुभवाला नुक्तेंच आले होतें. तेव्हां आपली आई आणि पत्नी यांना दुःख दारिद्र्यांतून मुक्त करण्यासाठीं व्हाईटसाहेबांनाच या प्रसंगीं शरण जावें, असा त्यांनीं विचार ठरविला आणि ते तसेच साहेबांची स्वारी होती त्या गांवीं जाण्यास निघाले. तेथें पोहोंचतांच ते एकदम साहेबांच्या बंगल्यावर गेले. साहेब वर्त-

मानपत्र वाचीत बसले होते. विनायकराव आंत येतांच तें टेबलावर ठेवून देऊन साहेबांनीं त्यांना हंसतहंसत जवळच्या एका खुर्चीवर बसावयास सांगितलें आणि मोठ्या अगत्यानें ते त्यांचा कुशलसमाचार विचारूं लागले. कृतज्ञतापूर्वक साहेबांचे आभार मानून विनायकराव म्हणाले " इतकें सहज मला आपण ओळखाल, असें मला वाटलें नव्हतें—"

व्हाईटसाहेब हंसून म्हणाले " मला तुम्हीं मोठा निष्ठुर आणि बेपर्वाई मनुष्य समजतां, नाहीं का? बरें, तें असो. पण तुमची मुद्रा इतकी खिन्न आणि चिंतायुक्त कां दिसते आहे? काय असेल तें मला मोकळया मनानें सांगा, लाजूं नका."

साहेबांचें हें सदयतेचें बोलणें ऐकून विनायकरावांना धीर आला. वडिलोपार्जित संपत्तीला आपण कसे आंचवलों, दोघांहि वडील बंधूंनीं आपल्याला सर्वतोपरी फसविल्यामुळें आपण एक पैलासुद्धां कसे महाग होऊन बसलों, विभक्त कसे झालों, आतां घर सोडून कोणत्या उद्देशानें बाहेर पडलों, वगैरे सर्व गोष्टी त्यांनीं थोडक्यांत साहेबाना सांगितल्या. तें ऐकून व्हाईटसाहेबांना फार दुःख झालें. ते म्हणाले " तुमचे वडील बंधु आपला तळीराम गार करून घेऊन आतां अगदीं निर्धास्त होऊन बसले असतील; परंतु तुमची मर्जी असेल तर अद्यापिहि चोर पकडून त्याला यथायोग्य शासन होईल अशी तजवीज करतां येईल. पण मला वाटतें, तुमची मुळींच तशी इच्छा नाहीं. तुमच्या लोकांत हा मोठा दोष आहे प्रेमामुळें तुम्हाला कर्तव्यज्ञानाची विस्मृति पडते. असा नीच स्वार्थपरायण, चोर मनुष्य–मग तो आपला प्रत्यक्ष बाप असला तरी देखील इंग्रजलोक त्याला कायद्याप्रमाणें योग्य शिक्षा देण्यास कधींहि कांकूं करणार नाहीं. असे दुष्ट, स्वार्थबुद्धीनें अंध झालेले लोक म्हणजे समाजाचे शत्रु होत. त्यांना चांगलें शासन करण्यांतच पुण्य आहे. परंतु मोठ्या दुःखाची गोष्ट की, सुशिक्षित असोत वा अशिक्षित असोत, परंतु या देशांतील एकंदर लोकांचा समज या बाबतींत अगदींच निराळा आहे. एक भाऊ तुरुंगांत पडला असतां घराण्याचा लौकिक जाईल, या खोट्या भीतीनें आपलें कर्तव्य बजाविण्यास धजत नाहींत!"

विनायकराव नम्रपणें म्हणाले " साहेब! आपलें म्हणणें खरें आहे. वास्तविक पाहिलें असता अशा मनुष्यांना जेव्हांच्यातेव्हांच योग्य शासन मिळालें नाहीं तर यांचा दुष्टपणा अधिकाधिक वाढत जातो, ही गोष्ट अगदीं सत्य आहे;

परंतु अनेक कारणांनीं मीं वडिलांच्या संपत्तीची आशा सोडून दिली आहे. तेव्हां त्याबद्दल वाटाघाट करण्यांत आतां अर्थ नाहीं. आपण मेहेरबानी करून मला कोठेंतरी एखादी नोकरी मिळवून द्याल, तर मी जन्मभर आपले उपकार विसरणार नाहीं."

यावर आणखी कांहीं बोलणें झाल्यानंतर साहेबांनीं विचारलें "पोलिस खात्यांत नोकरी धरण्याची आहे तुमची मर्जी ?"

"नोकरी म्हणजे काय याचा मला अद्यापि चांगलासा अर्थ देखील कळला नाहीं. कोणतें खातें नोकरी करायला चांगलें, कोणतें वाईट, हें मला मुळींच समजत नाहीं. आपण कृपा करून मला सांगाल तें मी करीन."

"दुसऱ्या कोणात्याहि सरकारी खात्यांत माझी ओळख नाहीं. पोलिसखात्यांत नोकरी धरण्याची तुमची इच्छा असेल तर मी प्रयत्न करून पाहीन; परंतु प्रथम हेड कॉन्स्टेबलचें काम करावें लागेल. हें जर आवडत नसेल आणि कोठें खासगी नोकरी करण्याची तुमची मर्जी असेल, तर तसें सांगा. म्हणजे तशीहि कांहीं खटपट करतां येण्याजोगी असल्यास पाहूं. ही पहा या आजच्या वर्तमानपत्रांतसुद्धां एका चांगल्या जागेबद्दल नोटीस आहे. पगारहि चांगला म्हणजे सुरवातीला पाऊणशें रुपये मिळेल. सुदैवानें या नोटीस देणाऱ्या गृहस्थाचा आणि माझा चांगलाच स्नेहहि आहे. परंतु ब्रह्मदेशांत जायला तयार झालें पाहिजे. हा गृहस्थ आणि मी बरोबरच विलायतेंतून आलों. मी या खात्यांत शिरलों आणि तो ब्रह्मदेशांत मोलमेन येथे जाऊन० यापार करूं लागला. माझा शब्द तो कधींहि खालीं पडूं देणार नाहीं. तुमची इतक्या लाब जाण्याची मर्जी असेल तर मी आतां त्याला तार करून एकंदर माहिती विचारतों. आजची रात्र नीट विचार करा आणि उद्यां मला अगत्य येऊन भेटा."

"बरें आहें, मी विचार करून उद्यां काय तें कळवितों. आपण मेहरबानीनें तिकडील खुलासा मागवावा." असें म्हणून साहेबांना सलाम करून विनायकराव तेथून निघून आले.

व्हाईटसाहेबांना आपला निश्चय उतावीळपणाचा किंवा अविचाराचा वाटूं नये, एवढ्याचसाठीं विनायकरावांनीं साहेबांच्या सांगण्याप्रमाणें एक दिवस विचार करण्यासाठीं म्हणून मागून घेतला होता. वास्तविक त्यांचा निश्चय त्याच वेळीं ठरला होता. येथें राहून सबध हयात सरकारी नोकरींत घालविली तरीदेखील पाऊणशें रुपये दृष्टीस पडण्याचा संभव नाहीं, हें ते पूर्णपणें जाणत

होते. व्हाईटसाहेबांचा स्नेही व्हाईटसाहेबांप्रमाणेंच दयाळू आणि उदार स्वभावाचा असेल तर त्याच्यापासून आपल्याला खात्रीनें फायदा होण्याचा संभव आहे. शिवाय तूर्त, आपल्याला पैशाची जरूर विशेष आहे, आणि तो जर अमळ दूर गेल्यानें मिळत आहे तर इतकें धाडस करण्याला काय हरकत आहे? हें मनांत येतांच ब्रह्मदेशांत जाण्याचा त्यांचा निश्चय ठरण्यास मुळींच अवकाश लागला नाहीं. त्यांचा स्वतःचा याप्रमाणें निश्चय ठरल्यावर आणखी विचार तो कसला करावयाचा राहिला होता? त्यांना नोकरी पाहिजे होती आणि ती चांगली पाहिजे. व्हाईटसाहेबांच्या मदतीनें त्यांचा हा हेतु सिद्धीस जात होता; मग थोडें दूर जावें लागलें म्हणून काय झालें? तरुण वय आणि आणीबाणीचा प्रसंग यांचा मिलाफ झाल्यावर ब्रह्मदेशांतच काय, परंतु पृथ्वीच्या दुसऱ्या टोंकाला देखील जाण्याला मनुष्य तयार होईल! येऊनजाऊन इष्टमित्रांचा अशा प्रसंगीं सल्ला घ्यावयाचा; परंतु विनायकरावांना तेंहि इल्लीं करतां येण्याजोगें नव्हतें. फक्त जगन्नाथरावांचा सल्ला घेण्याचीच काय ती त्यांना अपेक्षा होती; परंतु जगन्नाथराव आपल्या घरीं गेले होते. अर्थात्, त्यांना विचारण्याला अवकाश नव्हता. तो दिवस कसातरी काढून दुसरे दिवशीं ते पुनः व्हाईटसाहेबांकडे आले.

साहेब त्यांची वाट पहातच बसले होते. कारण, त्यांच्या मित्राकडून त्यांना पाहिजे होता तो खुलासा तारेनें नुक्ताच मिळाला होता. विनायकरावांना पहातांच ते म्हणाले "कसें काय, मग विचार ठरला!"

विनायकरावांनी विनयपूर्वक उत्तर दिलें "येथे पोलिसखात्यांत किंवा दुसरी एखादी सरकारी नोकरी धरून पंचवीस किंवा तीस रुपयांवर रहाण्यापेक्षां मला ब्रह्मदेशांतच जाणें बरें वाटतें. मला तेथली हवा मानवली नाहीं तर मी परत येईन."

"ठीक आहे. जा तर मग. हें पहा आतांच माझ्या स्नेह्याकडून उत्तर आलें आहे कीं, माझ्या खात्रीचा असून चांगला सुशिक्षित, मेहनती इसम असेल तर तावडतोब पाठवून द्यावा. त्याला शंभर रुपये पगार देण्याला देखील आपल्याला जड वाटणार नाहीं. विनायकराव! तुम्ही जातां, फार चांगली गोष्ट आहे. चांगलें बस्तान जुळलें तर तुमचा फायदा होण्याचा संभव आहे; परंतु एक गोष्ट लक्ष्यांत ठेवा, तेथली हवा बरोबरशी नाहीं."

"मी फार जपून वागेन म्हणजे झालें."

"ठीक आहे, कमजास्त हकीगत मला कळविण्याची हयगय करूं नका."

असें म्हणून साहेबांनीं आपल्या स्नेह्याला एक पत्र लिहून तें विनायकरावांजवळ दिलें. विनायकराव साहेबांचे पुनः पुनः मनःपूर्वक आभार मानून त्यांचा निरोप घेऊन मुंबईस आले आणि साहेबांच्या सांगण्याप्रमाणें जी पहिली बोट मिळाली तींत बसून ब्रह्मदेशाला जाण्यास निघाले.

मोलमेनच्या बंदरांत बोट येऊन उभी राहतांच कोणीएक शिपाई "विनायकराव कोणाचें नांव?" म्हणून ओरडत आहेसें त्याना वाटलें. या नवख्या प्रदेशांत आपल्या कोणी ओळखीचें नाहीं. तेव्हां आपल्याला कोणी हांक मारण्याचाहि संभव नाहीं. दुसरा कोणीतरी आपल्या नावाचा इसम असेल, असा विचार करून विनायकराव स्वस्थ राहिले होते; परंतु बराच वेळ झाला तरी तो शिपाई एकसारखा ओरडतच आहे हें पाहून शेवटी धीर करून विनायकरावांनीं त्याला विचारिलें "कोण विनायकराव तुला पाहिजेत?"

"व्हाईटसाहेबांकडून आमच्या साहेबांकडे आले आहेत ते."

"मीच व्हाईटसाहेबांकडून आलों आहें."

"तर मग चला माझ्याबरोबर."

असें म्हणून तो शिपाई विनायकरावांचें सामानसुमान पाहून घेऊं लागला. विनायकरावांनीं आश्चर्यानें त्या शिपायाला विचारिलें "तुझ्या साहेबांना माझें नांव कसें समजलें? आणि मी आजच्या बोटींतून येणार हें तरी त्यांना कसें कळलें?"

"व्हाईटसाहेबाची तार आली होती. साहेबांकडे रहाण्यासाठीं चारपांच लोक आले होते; पण व्हाईटसाहेबांची तार आल्यामुळें त्यांनीं त्यांपैकीं कोणालाच ठेविलें नाहीं."

व्हाईटसाहेबाचे विनायकरावांनीं मनांतून कितीतरी आभार मानिले. कृतज्ञ बुद्धीनें त्यांचे डोळे भरून आले. साहेबांना शतशः धन्यवाद देतदेत ते आपल्या नोकरीच्या जागी सुखरूप येऊन पोहोंचले. व्हाईटसाहेबांच्या या स्नेह्याचें नांव मिस्टर स्माईल असें होतें. व्हाईटसाहेबांचें पत्र वाचून आणि विनायकरावांना प्रत्यक्ष पाहून स्माइलसाहेब फार खूष झाले. विनायकराव तावडतोब दरमहा शंभर रुपये पगारावर स्माइलसाहेबांचे असिस्टंट मॅनेजर बनले.

विनायकरावांनीं पत्र लिहून तत्काळ ही आनंदाची बातमी आपल्या आईला, पत्नीला आणि जगन्नाथरावांना कळविली. शंभर रुपये पगार ऐकतांच सगुणा-

बाईना आणि सरस्वतीला अत्यानंद झाला; परंतु विनायकराव फार दूर गेल्या-बद्दल त्यांना वाईटहि वाटलें. विठ्ठलराव, गोविंदराव, भागीरथीबाई वगैरे मंडळींच्या अंगाला आग लागली. विठ्ठलरावांनीं तर भागीरथीबाईजवळ बोलूनहि दाखविलें कीं, "कसली नोकरी आणि कसलें काय घेऊन बसलीस? नोकऱ्या अशा वाटेवर पडल्या आहेत वाटतें! मिळालीच असेल तर असेल कसली तरी आठदहा रुपड्यांची झालें! डौल मिरवायला शंभर रुपये लिहिले आहेत, अन् दुसरें काय?"

---

## प्रकरण चोविसावें

## राग भडकला

कित्येक दिवस असेच लोटले. पूर्ण दिवस भरतांच सरस्वतीला एक सुंदर पुत्ररत्न झालें. सगुणाबाईना अत्यानंद झाला. शेजारीपाजारी स्त्रिया मुलाला पाहून त्याच्या मनमोहक स्वरूपाची प्रशंसा करूं लागल्या. "देव तुला उदंड आयुष्य देवो!" असे त्या बालकाला सर्वजणी आशीर्वाद देऊं लागल्या. कित्ये-कांनीं तर विठ्ठलराव आणि गोविंदराव यांच्या अमानुष वर्तनाबद्दल त्यांची निंदा करण्यालाहि कमी केलें नाहीं. शेजाऱ्यापाजाऱ्यांचीं हीं बोलणीं ऐकून भागीरथीबाई आणि त्यांच्याच तंत्रानें चालणाऱ्या अन्नपूर्णाबाई रागानें जळफळूं लागल्या; परंतु शेजाऱ्यापाजाऱ्यांवर कांहीं तो राग काढितां येणें शक्य नव्हतें. तेव्हां अर्थातच म्हातारी सासू, धाकटी जाऊ आणि तें कोमल अर्भक या तिघांना खाऊं कीं गिळूं, असें त्या करूं लागल्या. शेलक्याशेलक्या विशेषणांचा त्या तिघांच्या मस्तकावर सारखा भडिमार होऊं लागला. "अहाहा! काय पण कारटं हो! जसं माकडच कुणी म्हणेल!" अशा सुंदर सुंदर उपमा आणि शब्दालंकार यांचा मनसोक्त उपयोग करून त्या आपला क्रोधाग्नि शांत करून घेऊं लागल्या.

घर सोडून जातांना विनायकराव आपल्या आईला आणि पत्नीला पुनः-पुनः बजावून गेले होते कीं, "काय पाहिजे तें होवो, परंतु तुम्हीं त्यांच्याशीं कधींहि भांडण म्हणून करूं नका. त्या किती पाहिजे तितक्या का शिव्यागाळी देईनात, तुम्ही मुळीं तिकडे कानच देऊं नका. कितीहि त्रास दिला तरी धैर्यानें तो सहन करा. ईश्वराकडे पाहून ही सारी गांजणूक सोसा. इतकेंच माझें तुम्हांला सांगणें आहे."

सगुणाबाई आणि सरस्वती या दोघीहि हें सांगणें ध्यानांत धरून त्याप्रमाणें वागत होत्या. विठ्ठलराव, गोविंदराव, भागीरथीबाई किंवा अन्नपूर्णाबाई यांनीं निर्दयतेनें किती हवींतितकीं मर्मभेदक भाषणें केलीं, तरी त्या एका अक्षरानेंहि त्यांचें निवारण करण्याच्या भानगडींत पडत नसत. फार झालें तर दोघीहि निमूटपणें रडत बसून अंतःकरणाचा भार हलका करीत. यामुळें भागीरथीबाई आणि अन्नपूर्णाबाई यांची कलह करण्याची प्रबळ इच्छा अनेक वेळां निष्फळ होई.

एके दिवशीं सरस्वती आणि सगुणाबाई या दोघींनाहि ऐकूं येईल असा मोठा स्वर काढून भागीरथीबाई बोलूं लागल्या " अशा माकडासारख्या पोराचीहि नांवाजणी करतात, तेव्हां या चोंवडेपणाची आतां शर्थ झाली म्हणायची ! या भेल्या निलाजऱ्या बायकांना डोळे आहेत कुठं ? माझ्या पोटीं असं माकड आलं असतं, तर मीं नख लावून त्यांचा तत्काल प्राणच घेतला असता !"

कोमल आणि सरळ मनाच्या सरस्वतीला या बोलण्यानें पराकाष्ठेचें दुःख झालें. तिच्यानें स्तब्ध रहावेना. रडतरडत ती म्हणाली " काय करायचं जाऊबाई ! आपल्या हातच्या का आहेत या गोष्टी ? देवानं दिलं तें खरं ! तेंच नको का आपल्याला चांगलं मानून घ्यायला ? वांदरासारखं झालं अन् माकडासारखं झालं, म्हणून पोटचा गोळा आतां टाकून तर नाहीं ना द्यायचा !"

सरस्वती फक्त इतकेंच बोलून स्तब्ध राहिली; परंतु सगुणाबाईंना हें भागीरथीबाईचें कुत्सित बोलणें सहन झालें नाहीं. सर्व प्रकारचा अपमान आणि छळवाद मुकाट्यानें सहन करण्याची त्यांनीं संवय करून घेतली होती; परंतु त्या गोजिरवाण्या, कोमल बालकाला उद्देशून भागीरथीबाईनीं उच्चारलेले हे कुत्सितपणाचे घाणेरडे उद्गार त्यांना मुळींच सहन झाले नाहींत. त्यांना अनिवार क्रोध येऊन त्या भागीरथीबाईला म्हणाल्या " समजलीस कीं नाहीं, इतके दिमाख नाहींत कामाचे ! आजच कांहीं देव जगाला सोडून गेला नाहीं, किंवा धर्महि बुडाला नाहीं. पक्कं ध्यानांत ठेव, अशानं भगवान् कधींहि बरं करणार नाहीं ! असे रोजरोज दुसऱ्याच्या अंगाला कांटे लावले कीं नाहीं, म्हणजे शेवटीं आपल्याच अंगाला ते बोचून मरण्याची वेळ येते बरं—" बोलतांबोलतां म्हातारीचा गळा भरून आला, डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

रात्रीं मुलांची निजानीज झाली असें पाहून भागीरथीबाई मोठ्या कुऱ्यानें आपल्या पतिराजांना म्हणाल्या " ऐकल का, आतां कांहीं हें आपल्याच्यानं

सहन होत नाहीं. याचा कांहीं बंदोबस्त करायचा असेल तर करा, नाहीपेक्षां मी कांहीं इथं साफ रहायची नाही !"

" तुला आतां एक नवा बंगलाच बांधून देतों !" विठ्ठलराव हंसतहंसत म्हणाले.

" माणसानं सदोदित थट्टा केलेली मला नाहीं आवडत ! शेजारपाजारच्या बायकांचीं एकएक बोलणीं ऐकून माझ्या अंगाची आग होते. मेल्या म्हणतात ' तुम्ही पांच हजार रुपये चोरून ठेवलेत, भावांना धाब्यावर बसविलं, धाकट्या भावाला देशोधडीस लावला—"

" लावला तर लावला; त्यांत वाईट काय झालें ? आणि यांच्या बापाच्या पदरचे त्यांत काय गेलें ? नुस्ता देशोधडीस काय—म्हणावें, वेळ आली तर दुनयेतून पार करून टाकीन, समजलां !"

" ही सगळी तोंडाची बडबड आहे. हातानं इतकं दिखील कांहीं व्हायचं नाहीं. मग दुनयेतून पार करायची गोष्ट फार लांब राहिली. त्यांनीं दूरदेशी जाऊन आपल्या हिंमतीवर चाकरी मिळविली आहे. महिन्याकांठीं शंभर रुपये पगार मिळवीत आहेत, सगळं जग आज त्यांना धन्य म्हणत आहे. सगळे म्हणतात, विनायक मोठा बुद्धिवान्, इंग्रजी शिकलेला अन् तेच वडील भाऊ पहा ! दोघेहि मूर्ख, अक्कलशून्य ! विनायक आपणच होऊनच त्यांना सर्व कांही देऊन गेला. त्याला काय कमी आहे हो ? भांडणाच्या धास्तीनं घर सोडून गेला. तों साहेबांनीं त्याला केवढी तरी मोठी चाकरी दिली आहे ! बरं हें मेल्यांचं म्हणणंहि कांही खोटं नाहीं. नुक्ती कुठं चाकरी लागली नाहीं, तों कितितरी रुपये घरीं पाठविले ! ते दिवशीं सुद्धां आणखी चाळीस रुपये आले—"

" हें पहा, आम्ही कितीहि मूर्ख असलों किंवा अक्कलशून्य असलों, तथापि एवढें मात्र म्हणावे खूप समजून रहा कीं, मनांत आणूं तर चाकरी उडवून द्यायला एका क्षणाचा देखील अवकाश लागूं देणार नाहीं !"

" तेवढ्या तोंडच्या गप्पा मात्र ऐकून घ्याव्या, हातानं कांहीं होईल तर रामाचं नांव !" पतिराजांना चिडविण्यासाठीं भागीरथीबाई म्हणाल्या. नंतर अगदीं रडका सूर काढून त्या बोलूं लागल्या "मी सगळं कांहीं एक वेळ सोसून घेईन, पण त्या म्हातारडींचीं बोलणीं नाहीं मला आतां सोसवत. आज मी सहज कुठं त्या मुलाला पहायला गेल्यें, तेवढ्यावरून त्या मला नाहीं नाहीं त्या शिव्या देऊं लागल्या. म्हणूं लागल्या कीं, मेल्यांच्या हातापुढं घरींदारीं कांहीं

—कांहीं म्हणतां रहात नाहीं. जरा कुठं कांहीं वस्तु विसरलों, कीं ती गेलीच!' एक शंभर लोकांसमक्ष या गोष्टी झाल्या वरं!"

विठ्ठलराव आणि भागीरथीबाई यांनीं आपल्या मुलांना दिलेल्या सुशिक्षणामुळें आणि सदुपदेशामुळें खरोखरच असें झालें होतें कीं, सरस्वतीच्या घरांत जरा कुठें कांहीं पडलें असलें पुरे कीं, तें झालेंच पसार! वाळत घातलेले कपडे फाडण्याचा किंवा त्यांत धोंडे बांधून ते विहिरींत बुडविण्याचा क्रम तर नेहमींचाच होता. परंतु या गोष्टी प्रत्यक्ष डोळयांनीं पाहूनहि सरस्वती चकार शब्द देखील कधीं काढीत नसे. उलट दुर्गा किंवा भिवा कांहीं बोलूं लागतांच ती म्हणे "तीं लोकाचीं का मुलं आहेत? त्यांना बिलकुल कांहीं बोलूं नका."

दुर्गा आणि भिवा हीं दोघेंहि आपल्या खुषीनें विनायकरावांजवळ राहिलीं होतीं, हें सुज्ञ वाचकांस येथे सांगण्याची आवश्यकता नाहीं.

असो. आपल्या बोलण्याचा कांहीं विशेष उपयोग झाला नाहीं, हे पाहून शेवटीं भागीरथीबाईनीं शेवटच्या अस्त्राचा प्रयोग केला. पदरानें डोळे पुशीत पुशीत अगदी गळा काढून त्या म्हणाल्या "तुम्हाला रोजरोज चोर, मूर्ख, अप्पलपोटे म्हटलेलं माझ्यानं ऐकवत नाहीं. तुम्ही म्हणजे इथं कुणीच का नाहीं? हीं कोण अशी लागून गेलीं आहेत उठल्यासुटल्या असं बोलायला?"

भागीरथीबाईची पतिभक्ति पाहून विठ्ठलरावांचें हृदय कळवळले. आपल्या जन्मस्वभावाची देखील क्षणभर त्यांना लाज वाटूं लागली. विनायकराव आणि सरस्वती यांचा खरोखरच कांहीं दोष नाहीं, हे ते मनांत समजून चुकले; परंतु तरी देखील त्यांचा आणि आपल्या आईचा त्यांना पराकाष्ठेचा राग आला. विनायकरावांचा स्वभाव चांगला होता, म्हणूनच तर लोक विठ्ठलरावांची निंदा करीत होते. विनायकरावांना इंग्रजी येत होतें म्हणूनच तर विठ्ठलरावाना लोक मूर्ख म्हणत होते; विनायकराव घर सोडून परदेशीं गेले होते म्हणूनच तर त्यांच्याविषयीं लोकांच्या मनांत इतकी सहानुभूति होती. आणि सरस्वती शेजाऱ्यांपाजाऱ्यांवर नेहमीं उपकार करीत असे म्हणूनच तर सर्व तिची प्रशंसा आणि भागीरथीबाईची निंदा करीत असत. या सगळया गोष्टींचा विचार करून विठ्ठलरावांनीं सिद्धांत काढला कीं, 'हीं जिवंत आहेत तोंवर कांहीं आपल्याला सुख मिळावयाचें नाहीं; तोंवर लोक विनायक आणि सरस्वती यांचेच गुण गात बसतील आणि आपली व आपल्या बायकोची निंदा मात्र करतील. तशांतून विनायकाला आतां चाकरी लागली आहे, तो आतां

हवा तेवढा पैसा कमवील, अनेक सत्कार्यें करील आणि असें झालें म्हणजे पैशामुळें तरी आपल्याला जो हल्लीं कुठें मानसन्मान मिळत आहे तोहि मग मिळणार नाहीं.' या एकंदर गोष्टींच्या विचारानें विठ्ठलरावांच्या अंतःकरणांत क्षनावर मत्सर उत्पन्न झाला. त्या मत्सरापासून क्षणार्धांत त्यांचा क्रोधाग्नि भडकला आणि त्या क्रोधाग्नीची शांति कशी करावी, याबद्दलचा विचार करीत करीत ते भागीरथीबाईना म्हणाले " शेजारपाजारच्या या मत्सरी बायका काय पाहिजे तें का म्हणेनात, मी यांचा निःपात करीन तेव्हांच स्वस्थ राहीन!"

---

प्रकरण पंचविसावें

## विठ्ठलरावांचा वर्तनक्रम

विठ्ठलराव गांवांत कोणाजवळहि चांगल्या रीतीनें वागत नसत. सगळेच जणूं काय त्यांचे हाडवैरी होते! त्यांच्याजवळ दोन पैसे होते, पोटाची कांहीं-एक चिंता राहिली नव्हती, यामुळें हृदय गर्वानें फुगून गेलें होतें. दुनिया म्हणजे त्यांच्या खिसगणतींत राहिली नव्हती. सहज बोलावयाचें झालें तरी देखील एखाद्याच्या वर्मीं लागेल असें बोलावयाचें. विनाकारण एखाद्याला शिव्यागाळी द्यावयाच्या. पदोपदीं एखाद्याचा अपमान करावयाचा, कोणाची भीडमुरवत म्हणून धरावयाचीच नाहीं. असा पशुवत् वर्तनक्रम त्यांनीं स्वीकारिला होता. 'मी म्हणजे असा मनुष्य आहें कीं, प्रत्यक्ष बापाला बाप म्हणायचा नाहीं, मग इतरांची कथा काय?' असें ज्यालात्याला मोठ्या आढ्यतेनें सांगण्यांत त्यांना भूषण वाटत असे. गरीबदुबळयांचा देखील छळ करतांना त्यांच्या पाषाणहृदयाला काहींच वाटत नसे. विभक्त झाल्यापासून व्याजबट्ट्यानें पैसे देणें हाच त्यांचा मुख्य व्यवसाय झाला होता; परंतु एवढ्यानेंच त्यांची राक्षसी तृष्णा तृप्त होत नव्हती. ज्यांना कोणाला लिहितांवाचतां मुळींच येत नसेल त्यांच्या नांवाचीं खोटींच कर्जखतें तयार करून ते त्या बिचाऱ्या निरपराध मनुष्यांवर चापून फिर्याद करीत व आपल्या तर्फेचे निवाडे मिळवून त्यांचीं घरेंदारें विकून पैसे वसूल करून घेत. एकदा का एखाद्यावर त्यांची इतराजी झाली, म्हणजे मग नाना तऱ्हेचे अनाचार करून, खोटींनाटीं कुभांडें रचून त्यांचीं पाळेंमुळें खणून काढल्याविना ते स्वस्थ बसत नसत. त्यांच्या निढावलेल्या मनाला कोणतीच गोष्ट करण्याची लाज म्हणून वाटत नसे. धर्म, नीति आणि कर्तव्यज्ञान यांना त्यांच्या त्या पापपूर्ण

अंतःकरणांतून अजिबात ठाणें उठवावें लागलें होतें. दया म्हणजे काय पदार्थ आहे, हें बापड्यांना स्वप्नींहि कधीं ठाऊक नव्हतें!

वडिलांच्या पेटींतून पैसे आणि दागिने यांबरोबरच विठ्ठलरावांनीं खतेंहि चोरलीं होतीं, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. कित्येक महिने जाऊं देऊन पुढें त्यांनीं खत लिहून देणाऱ्या प्रत्येक मनुष्याला युक्तीयुक्तीनें एकीकडे गांठून सांगितलें "तुझ्याकडे व्याजासुद्धां ही इतकी रकम फिरत आहे. हें तुझें खत हवें तर पहा. आतां मझे ऐकशील आणि या रकमेचा आतांच्या आतां गुपचुप निकाल करशील, तर व्याज मी तुला साफ सोडून देतों आणि हें खत फाडून टाकतों."

विठ्ठलरावांचा हा युक्तिवाद पुष्कळांना पसंत पडला, हें सांगावयाला नकोच. कोणीं अर्धे, कोणीं एकतृतीयांश तर कोणीं एक चतुर्थांश देऊन आपल्या कर्जाचा निकाल करून घेतला. इतक्या इसमांत केवळ एकच इसम काय तो सचोटीचा भेटला. त्यानें विठ्ठलरावांना साफ सांगितलें कीं, 'मला जें वाजवी देणें आहे त्यांतील पैनपैचा निकाल केला नाहीं, तर मी नरकांत जाईन. तुम्हां तिघां भावांच्या समक्ष मी सगळा निकाल करीन असें चोरून कांहींएक करणार नाहीं!'

याप्रमाणें कांहीं नाहीं तरी विठ्ठलरावांनीं पांचसहा हजार रुपये घशाखालीं उतरले. गोविंदरावांला देखील त्याचा मागमूस लागूं दिला नाहीं. गोविंदराव म्हणजे इतके अकलेचे खंदक होते कीं, जवळ असूनहि त्यांना त्यांतलें कांहीं-एक समजलें नाहीं. चोरलेले दागिनेहि आतां विठ्ठलरावांचेच झाले. गहाण ठेवणाऱ्या लोकांना ते चोरीस गेल्याचें समजतांच मग पैसे देऊन दागिने सोडवून घेण्याच्या भानगडीत ते मुळींच पडले नाहींत. भागीरथीबाईच्या आनंदाला पारावर राहिला नाहीं.

हा डाव पूर्णपणें साधतांच वडिलांच्या स्थावर मिळकतीकडे विठ्ठलरावांची दृष्टि फिरली. तीहि गिळंकृत करून टाकून आपल्या भावांना सर्वस्वी धाब्यावर बसविण्याच्या मसलतीस ते लागले; परंतु पैसे किंवा दागिने गुपचूप गडप करतां आले, तशी जमीन कांहीं चोरतां येणें शक्य नव्हतें. उघडपणें कांहींतरी युक्ति करून ती हाताखालीं घातली पाहिजे होती आणि ती युक्ति शोधून काढण्यांत आतां विठ्ठलराव गर्क होऊन गेले होते. भागीरथीबाईचा भाऊ जिल्ह्याच्या गांवीं मुखत्यारी करीत होता. त्याला विठ्ठलरावांनीं जाऊन गांठलें. दोघांनीं मिळून खलबत करून जनार्दनपंतांच्या नांवचें एक खोटें मृत्युपत्र

तयार केलें. त्यांत इतकेंच लिहिलें कीं, "स्थावर मिळकत जी कांहीं असेल ती सर्व वडील मुलगा विठ्ठलराव यास मिळावी; आणि गोविंदराव व विनायकराव यांना रोकड ऐवज असेल तो अर्धाअर्धा वांटून द्यावा. त्यावर विठ्ठलरावांचा मुळींच कांहीं हक्क नाहीं." या बनावट मृत्युपत्रावर जनार्दनपंतांच्या सहीसारखीच हुबेहुब खोटी सही करण्यांत आली. भागीरथीबाईचा भाऊ माधवराव आणि त्यानेंच आणलेले आणखी तीन लबाड इसम अशा चौघांनी मिळून या मृत्युपत्रावर साक्षी घातल्या. याप्रमाणें विठ्ठलरावांनीं ही आत्मघाताची तयारी पूर्ण करून ठेविली; परंतु त्यांच्या पापाचे घडे अद्यापि पूर्णपणें भरले नव्हते. विठ्ठलरावांनी तूर्त तें मृत्युपत्र तसेंच ठेवून दिलें. आपल्या वडिलांनीं मृत्युपत्र करून एकंदर स्थावर मिळकत आपल्याला दिली आहे, अशी अफवा मात्र ते चोहोंकडे पसरूं लागले. त्यांना भीति काय ती विनायकरावाबद्दलची होती. 'एव्हांच आपण हें मृत्युपत्र बाहेर काढलें तर सर्व लोक खात्रीनें त्याच्याच बाजूला मिळतील, आणि मग हें मृत्युपत्र खरें ठरणें मोठ्या मुष्किलीचें होईल. इतकेंच नव्हे तर वेळेस सगळेंच त्रांगडे फिरून उलट आपल्या गळयांत घोंगडें मात्र यावयाचें. तेव्हां योग्य संधि येईपर्यंत दम धरलेलाच बरा, असा त्यांनीं विचार केला. गोविंदरावांबद्दल त्यांना मुळींच धास्ती नव्हती. फारच झालें, तर पांचपंचवीस रुपये फेकले कीं, त्यांचे तोंड बंद झालेंच! विठ्ठलरावांना हें अगदीं अनुभवानें माहीत झालें होतें.

---

प्रकरण सत्त्विसावें

## केरसुणीचा मार

अशा प्रकारच्या लज्जास्पद आणि नीच वर्तनक्रमानें विठ्ठलरावांनीं गांवांत सर्वांशीं शत्रुत्व मात्र संपादन केलें. कोणीहि त्यांना बरें म्हणून पाहीना. जो तो उघडउघड त्यांची निंदा करूं लागला. विठ्ठलरावांना याचें कांहींएक वाटलें नाहीं. उलट, हा प्रकार जसजसा त्यांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागला, तसतसा विनायकराव, सरस्वती आणि सगुणाबाई या त्रिवर्गाबद्दल त्यांच्या मनांत धुमसत असलेला क्रोधाग्नि अधिकाधिक प्रज्वलित होऊं लागला. त्यांच्यासाठीं नाना तऱ्हेचे भयंकर राक्षसी विचारहि त्यांच्या त्या विचारशून्य पापी हृदयांत येऊं लागले. याच संधीस दोन महिन्यांची रजा घेऊन विनायकराव घरीं आले. त्यांच्या अंगच्या अनेक सद्गुणांनीं त्यांचे साहेब त्यांच्यावर फारच खूष झाले

होते, आणि घरीं येतांना त्यांना दोनशें रुपये बक्षीस देऊन शिवाय रजेवरून परत आल्यावर दरमहा दीडशें रुपयेप्रमाणें पगार देण्याचें साहेबांनीं आपण होऊन अभिवचन दिलें होतें.

हें एकंदर वर्तमान ऐकून विठ्ठलरावांना मर्मांतिक वेदना होऊं लागल्या. ते अत्यंत भयभीत झाले. प्रत्यक्ष पोटच्या मुलाच्या मृत्यूची बातमी ऐकून देखील त्यांना इतकें दुःख झालें नसतें! विनायकरावांना ब्रह्मदेशात गेल्याला जवळजवळ दीड वर्ष होत आलें होतें. तेथील हवापाणी त्यांना बरोबर मानवलें नव्हतें; परंतु घरीं येऊन आठदहा दिवस झाले नाहींत तोंच त्यांना अमळ बरें वाटूं लागलें. त्यांची प्रकृति सुधारत चालली. या दीड वर्षांच्या अवधींत संसाराचा एकंदर खर्चवेंच चालवून पांचसातशें रुपये त्यांनीं मागे टाकिले होते. आतां विनायकरावांना बरीच उमेद आली. आईच्या आणि पत्नीच्या सांगण्यावरून त्यांनी अर्धवट पडलेलें घराचें काम पुरें करण्याचा बेत केला आणि त्यासाठीं लागणारें लाकूड, चुना वगैरे खरेदी करून ठेविली. पुढच्या वर्षीं आणखी कांहीं पैसे शिल्लक राहिले म्हणजे पुनः अशीच रजा घेऊन येऊं आणि घराचें काम पुरें करून टाकूं, असा त्यानीं मनाशीं विचार केला होता. आईच्या आग्रहावरून जाताना त्यानी मुलाला सोन्याचे एकदोन ठळकठळक दागिनेहि करून घातले. जिकडेतिकडे विनायकरावांची प्रशंसा होऊं लागली. कांहीं दिवस सगुणाबाई आणि सरस्वती यांचेहि कष्ट दूर झाले.

घरासाठी आणिलेलें लाकूड, चुना वगैरे सामान आणि त्याचप्रमाणें मुलाच्या अंगावर घातलेले बऱ्याच रकमेचे दागिने पाहून विठ्ठलराव आणि भागीरथीबाई यांचा जीव मत्सराग्नीनें जळू लागला. भागीरथीबाई एक दिवस तोंड वेंगाडून आपल्या पतीला म्हणाल्या "त्याना जगांतून नाहींसं करायला निघालां होतां नाहीं का? आणखी एकदोन वर्ष त्यांना चाकरी करूं द्या, म्हणजे तुम्हालाच तोंड लपवून बसण्याचा प्रसंग नाहीं आला, तर मला विचारा! पहा, घरासाठी किती लांकूड अन् दुसरं सामान आणिलं आहे तें! कांहीं झालं तरी ते चांगले शिकलेंसवरलेले आहेत. तुमच्यासारखे नाहींत! महिन्याला कुठं आठदहा रुपयांची चाकरी होती, ती सुद्धां घालवून टाकिली!"

भागीरथीबाईच्या प्रत्येक शब्दानें विठ्ठलरावांच्या अंतःकरणाला चरके बसत होते. त्यांनीं तोंडावाटे एक शब्द देखील उच्चारला नाहीं, परंतु त्यांच्या अंतः-करणांत आगीचा भडका होऊन गेला होता. मुद्रा कावरीबावरी झाली होती.

कांहींतरी भयंकर विचार त्यांच्या अंतःकरणांत घोळत असावा असें स्पष्ट दिसत होतें.

रजेची मुदत पुरी होतांच सर्वांचा मनोभावानें निरोप घेऊन विनायकराव पुनः ब्रम्हदेशात निघून गेले. जातांना त्यांनीं आपली आई आणि पत्नीं या दोघानाहि धीरानें प्रत्येक गोष्ट सहन करण्याविषयीं पूर्वीप्रमाणेंच मोठ्या आग्रहानें सांगितले. विनायकरावाना निरोप देतांना सगुणाबाईचें अंतःकरण भडभडून आले. अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्यांनीं आपल्या मुलाला अनेक आशीर्वाद दिले. विठ्ठलराव आणि भागीरथीबाई यानीं मंगल आशीर्वाद देण्याऐवजी विनायकरावांच्या मृत्यूची अमंगल कामना मनात धरिली. गोविंदरावांनीं मंगल आशीर्वादहि दिले नाहींत किंवा अमंगल शापहि दिले नाहींत. अन्नपूर्णाबाईनीं मात्र आपल्या धाकट्या दिराला अगदीं मोकळया मनानें आशीर्वाद दिले. सरस्वतीनें सोसलेले कष्ट पाहून अन्नपूर्णाबाईच्या हृदयात हळुहळू दयेचा संचार होऊं लागला होता. पतीच्या पराकाष्ठेच्या मूर्ख स्वभावामुळें त्यांच्या संसाराची स्थिति दिवसेंदिवस निकृष्ट होत चालली होती, त्यामुळें त्यांना मधुनमधून कष्ट भोगावे लागत असत. अर्थात्, त्यावरून त्यांना सरस्वतीच्या स्थितीची कल्पना येत होती, आणि म्हणूनच त्यांचा जीव सरस्वतीकडे हळुहळू ओढत चालला होता. म्हणूनच विनायकरावाना देखील मन मोकळें करून आशीर्वाद देण्यास त्या प्रवृत्त झाल्या होत्या. वडील दिराच्या मसलतींत मिळून आपल्या पतीनें चांगले काम केलें नाहीं, हेंहि आतां त्यांच्या ध्यानांत येत चालले होतें.

विनायकराव निघून जाताच विठ्ठलरावांनी आपल्या नीच पशुतुल्य वर्तनानें पुनः आईला आणि सरस्वतीला त्रास देण्यास सुरवात केली. त्यांना त्रास देण्याच्या आणि अडचणींत आणण्याच्या नवीन नवीन अपूर्व युक्त्या शोधून काढण्यांत स्वारीचा मेंदु नेहमीं गर्क असे. या युक्त्यांची मजल रात्रीच्या वेळीं घरावर धोंडे मारण्यापर्यंत, किंवा त्याच्या दरवाज्यापुढें मलमूत्रविसर्जन करण्यापर्यंतहि नेण्यास त्या अधमाधम विठ्ठलरावांना लज्जा वाटत नसे! एके दिवशीं असेंच कांहीं होऊन सकाळच्या प्रहरीं म्हातारीं दुःखानें संतापली आणि अगदीं वैतागून म्हणाली "मला जें कोणी निष्कारण छळीत असेल, त्याला भगवान् पाहून घेईल. मेल्यांचा सत्यनाश झाल्याविना रहायचा नाहीं!"

दुर्गाहि तोंडानें अशीच शिव्याशाप देऊं लागली. भांडण उकरून काढण्यासाठीं विठ्ठलराव अगदीं टपून बसलेले होतेच. ते रागारागानें बाहेर येऊन

गर्जना करून म्हणाले "हे पहा आई, हें मुलांबाळांचें घर, सकाळच्या राम-प्रहरांत तूं जर अशी शिव्यशाप देत बसलीस तर संभाळून रहा. माझ्या हे नाहीं तुझें उपयोगी पडायचें. आतां चूप राहिलीस तर ठीक, नाहींतर टाळकेंच फोडून टाकीन, समजलीस?"

मुलाच्या तोंडांतून बाहेर पडलेले हे शब्द ऐकून म्हातारी रडत रडत म्हणाली "बाबारे, मीं कुणाचंहि नांव घेतलं नाहीं-मग तुलाच एवढा राग कां बरं आला? माझं म्हातारीचं टाळकं फोडून जर तुला सुख होत असेल, तर खुशाल तसं कर. मी जर तुझी आई असेन-नऊ महिने जर तुला पोटांत वागविला असेल तर, त्या भगवंताच्या घरीं ही गोष्ट रुजू झाल्याविना कधींहि रहायची नाहीं!"

"तुझी जीभ फार लांबत चालली नाहीं थेरडे! आणखी शिव्याशाप देतेस? थांब! तुझी खोड मोडून टाकतों," असें म्हणून क्रोधानें आंधळे झालेले विठ्ठलराव दातओंठ चावीत हात उगारून सगुणाबाईच्या अंगावर धावून गेले.

"मेला कुलांगार कारटा! कशाला देवानं माझ्या पोटीं घातला." असें म्हणून म्हातारी मोठमोठ्यानें रडूं लागली. शेजारपाजारची कितीतरी मंडळी तेथें गोळा झाली. शेवटीं गोविंदरावांनीं मध्यें पडून विठ्ठलरावांचें निवारण केलें.

"नका उगाच रडूं. रडून का कांहीं व्हायचं आहे? हे सगळे दैवाचे भोग आहेत." असें म्हणून सरस्वती आपल्या सासूचें समाधान करूं लागली. म्हातारीला या प्रसंगीं सहजच विनायकरावांची आठवण झाली. विनायक आज जवळ असता, तर हा अनिष्ट प्रसंग टळला असता, असें तिला वाटूं लागलें. "विनायक, विनायक," म्हणून गळा काढून ती रडूं लागली. इतक्यांत शेजारच्या लक्ष्मीबाई त्यांच्याजवळ येऊन त्यांचें समाधान करून कळवळ्यानें म्हणाल्या "कशाला रडतां आजीबाई? तुमचा विनायक देवाच्या दयेनं जगलावांचला तर तुमचे सगळे पांग फेडील बरं! उगी रहा." लक्ष्मीबाईंचें हें समाधानपर भाषण भागीरथीबाईंना मुळींच रुचलें नाहीं. त्या तोंड वेंगाडून म्हणतात "हो! त्या विनायक विनायक करून अष्टौप्रहर रडतील, नाहीं तर काय करतील? जसं काय कुणी म्हणेल कीं, यांचा विनायक स्वर्गालाच गेला! भरल्यासरल्या घरांत हें काय मेलं सारा दिवस!"

भागीरथीबाई पुनः पुनः असे अभद्र शब्द उच्चारूं लागल्या, हें पाहून सगुणाबाई आणि सरस्वती दोघीहि बिचाऱ्या रडूं लागल्या. सरस्वतीला रडतांना पाहून तिच्या कडेवरील एवढेंसें अर्भकसुद्धां रडूं लागलें. लक्ष्मीबाई भागीरथीबाईचा धिक्कार करून म्हणाल्या "काय हें भागीरथीबाई! असलं भलतंसलतं बोलणं शोभत नाहीं बरं तुम्हाला! एखाद्याच्या जिवाला असा निष्कारण तळतळाट दिल्यानं ईश्वर कधीं आपलं बरं करणार नाहीं."

भागीरथीबाई हें बोलणें कोठलें ऐकून घ्यायला! त्यांनीं शिव्यागाळी देऊन तत्काळ लक्ष्मीबाईला तेथून पळवून लाविलें!

इकडे गोविंदराव मध्यें आल्यामुळें आईची चांगली खोड मोडण्याचा विठ्ठलरावांचा सदुद्योग सिद्धीस गेला नाहीं, आणि त्यामुळें त्यांचा अनावर क्रोधहि अर्थातच शांत झाला नाहीं. आज कोणाचातरी यथास्थित समाचार घेतल्याविना हा क्रोधाग्नि शांत होण्याजोगा नव्हता. सगुणाबाईबरोबर दुर्गाहि बडबड करीत होतीच. तांबडे लाल डोळे करून विठ्ठलराव तिच्याकडे वळले, दुर्गानें आजवर पुष्कळ सहन केलें होतें. परंतु विठ्ठलरावांचें आजचें लज्जास्पद वर्तन कांहीं तिला सहन झालें नाहीं. ती एकसारखी बडबडत होती. विठ्ठलराव चिडले आणि रागानें बेफाम होऊन त्यांनीं त्या बिचाऱ्या मोलकरणीच्या अंगावर हात टाकिला. दुर्गाचेंहि डोकें भणाणून गेलें. आपण काय करतों, याचें तिलाहि भान राहिलें नाहीं. हातांत केरसुणी होती तिच्या बुंध्याचा तिनें विठ्ठलरावांच्या मस्तकावर, मुखावर आणि वक्षःस्थलावर यथास्थित प्रयोग केला! गोविंदराव पुनः मध्यें पडले. त्यांनीं मोठ्या कष्टानें विठ्ठलरावांना तेथून दूर नेलें. दुर्गा कोणाचेंहि ऐकेना. शिव्याशाप देत आणि हात चोळीत ती तेथेंच बसून राहिली. सरस्वतीनें तिचें परोपरीनें समाधान केलें, परंतु व्यर्थ.

शेवटीं मौज पहाण्याकरितां जमलेल्या मंडळीपैकीं दुर्गाला कोणीं चिथवली असेल ती असो, तिनें विठ्ठलरावांवर आपल्याला मारहाण केल्याबद्दल पोलिसांत फिर्याद केली. आत्मरक्षणार्थ आपल्यालाहि केरसुणीच्या बुंध्याचा विठ्ठलरावांवर प्रयोग करावा लागला, ही गोष्ट देखील तिनें लपवून ठेविली नाहीं. विठ्ठलरावांवर मॅजिस्ट्रेटसाहेबांकडून प्रथम समन्स निघालें; परंतु नेमलेल्या तारखेस कोर्टापुढें हजर रहाण्याचें विठ्ठलरावांना कांहींएक अगत्य दिसून आलें नाहीं. मॅजिस्ट्रेट साहेबांनीं ताडलें कीं, विठ्ठलरावांसारख्या श्रीमंत मनुष्याला आणण्यासाठीं शिपाई, प्यादे वगैरे इतमाम पाठविला नाहीं,

ही आपलीचूक झाली ! म्हणून त्यांनीं लागलेंच आपल्या सहीचें वारंट काढून विठ्ठलरावांना आणण्यासाठीं योग्य इतमाम पाठविण्याबद्दल पोलिसाला आज्ञा केली. त्याबरोबर पोलिसचे शिपाई तत्काळ विठ्ठलरावांना त्यांच्या मनांत नसतांहि घेऊन आले. शेवटीं मोठ्या प्रयासानें ते जामिनावर सुटले. पाण्यासारखा पैसा खर्च केला, मोठेमोठे वकील आपल्या तर्फे दिले. फिर्याद अगदीं खोटी आहे असा कडेकोट बनावट पुरावाहि कोर्टापुढें रुजू केला. परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. मॅजिस्ट्रेट साहेबांनीं विठ्ठलरावांच्या किंवा त्यांच्या साक्षीदारांच्या सांगण्यावर मुळींच विश्वास ठेविला नाहीं. ते म्हणाले " दुर्गानें कोर्टापुढें स्पष्ट सांगितलें आहे कीं, आत्मरक्षणार्थ आरोपीवर आपल्याला केरसुणीचा प्रयोग करावा लागला. हें तिचें म्हणणें कोर्टाला अगदीं खरें वाटत आहे. तिच्या सांगण्यावरून हें उघड होत आहे कीं, आरोपीनें जर प्रथम मारहाण केली नसती, तर तिलाहि केरसुणी उचलण्याचा प्रसंग खास आला नसता. आरोपीसारख्या संभावित कुळांतील मनुष्यानें अशा प्रकारचें वर्तन करावे, हें लज्जास्पद आणि अक्षम्य आहे. आरोपीला मी अडीचशें रुपये दंड करतों. या दंडाच्या रकमेपैकीं शंभर रुपये फिर्यादी दुर्गा हिला नुकसानीदाखल येण्यांत यावे."

विठ्ठलराव दंडाची रक्कम भरून मोकळे झाले. त्यांना ही शिक्षा याचें झाली कोणालाहि वाईट वाटलें नाहीं. दुर्गाहि शंभर रुपये घेऊन आनंदानें परत आली.

---

प्रकरण सत्ताविसावे

## घर जळालें

प्रज्वलित अग्नींत घृताची आहुति पडली. विठ्ठलराव कावरेबावरे झाले. दंड भरून आल्या दिवसापासून पातकी हृदय बेफाम झालें. नरहत्त्या, स्त्रीहत्त्या, शिशुहत्त्या, गृहदाह इत्यादि नाहींनाहीं ते अधमपणाचे विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले. मनांत कल्पना आल्याबरोबर आपल्या हातून कार्य घडून येत नाहीं, याबद्दल ते आपला आपणच धिक्कार करून घेऊं लागले. युद्धाला आरंभ होण्याच्या पूर्वी रणपटु सेनानीला जसें एक प्रकारचें अपूर्व स्फुरण आणि उत्साह येऊन तो तन्मय होऊन जातो, तशीच अवस्था हल्लीं विठ्ठलरावांची झाली होती. केवळ कल्पनाच करीत बसून त्यांचें आतां समाधान होईना. हातानें कांहींतरी कृति करण्यासाठीं ते अगदीं अधीर झाले. दंड भरतेवेळीं

त्यांनीं भीष्मप्रतिज्ञा केली होती कीं, आजपासून सात दिवसांच्या आंत याबद्दल सूड घेईन, तरच नांवाचा विठ्ठलराव होईन! परंतु या गोष्टीला आज बारा दिवस होऊन गेले, तथापि त्यांच्या हातून कांहींएक झालें नाहीं. आजपर्यंत एक देखील प्रतिज्ञा सिद्धीस गेली नव्हती; आणि यामुळें तर ते डंवचलेल्या सर्पाप्रमाणें जळतफळत होते.

कृष्णपक्षांतील एकादशीची रात्र. जिकतिकडे गाढ अंधकार पडला होता. डोळयांत बोटें घातलीं तरी देखील दिसण्याची मारामार अशा वेळीं मोठ्या सावधगिरीनें एक मनुष्य हातांत कांहीं घेऊन विनायकरावांच्या घराशीं आला. झाडाचें इतकेंसें पान जरी पडलें तरी त्याच्या आवाजानें तो मनुष्य दचकत होता. झाडावरील पक्ष्यांनीं सहज पंख हालविले, तरी त्या शब्दानें तो भयभीत होत होता. दोन प्रहर रात्र होऊन गेलेली. जिकडे तिकडे सामसूम झालेलें. घरांतील मनुष्यें निद्रादेवीच्या शांतिप्रद पाशांत गुंग होऊन गेलीं होतीं. अशा वेळीं हा मनुष्य येथे काय बरें करीत असावा? इतक्या अपरात्री एखाद्या चोरासारखीं हळुहळू पावलें टाकीत टाकीत तो प्रथम पुढल्या दरवाज्याशीं आला आणि हलकेच तो दरवाजा त्यानें बाहेरच्या बाजूनें बद करून घेतला. नंतर तसेंच मागील दरवाज्यापाशीं जाऊन त्यानें तोहि दरवाजा बंद करून घेतला. नंतर तो पहिल्या ठिकाणीं आला. इतक्यांत सुवर्णाच्या थाळीप्रमाणें पूर्व क्षितिजावर चंद्रबिंब हळुहळू दृग्गोचर होऊं लागलें. त्याबरोबर धावरून जाऊन त्यानें एका कांड्यानें हातांत असलेली चुड पेटविली आणि त्या घराच्या वळचणीला लावून दिली. सारा दिवस उन्हानें सणसणलेलीं लांकडें काडकाड पेटूं लागलीं. घराच्या एका वळचणीनें चांगला पेट घेतला, हें पाहून त्या मनुष्यदेहधारी राक्षसानें विठ्ठलरावांच्या दरवाज्याकडे धांव घेतली. इतक्यांत घराचा एक वांसा कडाडून खालीं पडला आणि त्या आवाजासरशी दुर्गा बाहेर निजली होती ती दचकून उठली. कोणींतरी विठ्ठलरावांच्या दरवाज्याकडे गडबडीनें जात आहे असा तिला भास झाला. त्याबरोबर "कोण आहे तें?" म्हणून तिनें डोळे चोळीत चोळीत प्रश्न केला; परंतु तिला मुळींच उत्तर मिळालें नाहीं. हें पाहून "चोर चोर" म्हणत ती बाहेर येऊन ओरडत सुटली. तिची आरडाओरड ऐकून भिवा गडबडून उठला. पहातो तों काडकाड शब्द करून सगळें घर पेटत होतें. पुढें काय करावें, हें त्या दोघांनाहि सुचेना. सगुणाबाईच्या आणि सरस्वतीच्या नांवानें तीं दोघेंहि ओरडत सुटलीं. हा गलबला ऐकून आंत

दोघींहि जाग्या झाल्या. सगुणाबाईनीं "काय झालं ग दुर्गे ?" म्हणून घाबऱ्या घाबऱ्या विचारिलें.

"सत्यनाश झाला—हो सत्यनास ! दार उघडा—दार उघडा ! अहो, आग लागली—आग—" दुर्गा सारखा आक्रोश करूं लागली.

संकटसमयीं बुद्धीचा लोप होतो म्हणतात, तें खोटें नव्हे. यावेळीं तसाच प्रकार झाला. बाहेरून भिवा आणि दुर्गा हीं सगुणाबाई आणि सरस्वती यांना 'दरवाजा उघडून बाहेर या, दरवाजा उघडून बाहेर या' असें अगदीं ओरडून ओरडून सांगत होतीं; परंतु आंत त्या दोघींना दरवाजा म्हणून कांहीं केल्या सांपडेना. बराच वेळ धडपड केल्यानंतर एकदाचा दरवाजा हाताला लागला, तर तो कांहीं केल्या उघडेना. सगुणाबाई आणि सरस्वती दरवाजा उघडत नाहीं म्हणून ओरडून सांगूं लागल्या, परंतु त्यांचें ओरडणें कोणालाहि ऐकूं येईना. बाहेरहि सारखी आरडाओरड चालली होती. कोणाचा शब्द म्हणून कोणाला ऐकूं येत नव्हता. सगळेच मोठमोठ्यानें आरडाओरड करीत होते. दरवाजे बाहेरून बंद केले होते, तिकडे कोणाचें हा वेळपर्यंत लक्ष्यच गेलें नाहीं. अग्नीच्या ज्वाळा भयंकर चेतल्या. दुर्गा बिचारी रडूनरडून आकांत करूं लागली; इकडे आपल्या अगदीं मस्तकावर अग्नि धडधडत आहे आणि अद्यापीहि आपल्याला बाहेर पडण्याला मार्ग सांपडत नाहीं, म्हणून आंतून सगुणाबाई आणि सरस्वती या हृदयभेदक आक्रोश करीत होत्या. इतक्यांत गोविंदराव आणि अन्नपूर्णाबाई हीं या आरडाओरडीनें जागीं होऊन तेथे आलीं. आसपासचे कितीतरी लोक जमले; परंतु विठ्ठलरावांचा दरवाजा कांहीं हा वेळ-पर्यंत उघडला नव्हता. सगळ्या घरानें आतां पेट घेतला होता. सगुणाबाई, सरस्वती आणि तें अर्भक आतां खरोखरच होरपळून जाण्याची वेळ आली. चोहोंकडून आतां भयंकर ज्वाळा वेष्टण घालीत होत्या. गोविंदराव रडूं लागले. अन्नपूर्णाबाईंची तर कंबरच खचली. जमलेल्या लोकांपैकीं पुढें होऊन आंतील माणसांना वांचविण्याची कोणालाच छाती होईना. हें पाहून गोविंदरावांना त्वेष आला. जिवावर उदार होऊन त्यांनीं आगीच्या डोंबाळांत उडी घेतली. हें पहातांच भिवाहि त्यांच्या मागोमाग गेला आणि त्या दोघांनीं दरवाजा उघडून मोठ्या शिकस्तीनें मृतवत् झालेलीं तीं तीन मनुष्यें अग्निमुखांतून बाहेर ओढून काढिलीं. सगुणाबाईंना त्या दिवशीं एकादशी होती. उपासानें म्हातारी क्लांत झाली होती. या ज्वाळा तिला असह्य होऊन ती अगदीं निचेष्ट पडली होती.

अंगावर निखारे पडून जागोजाग भाजलें होतें व सरस्वतीहि कासावीस झाली होती. मुलगा तर माशाप्रमाणें तळमळत होता. अन्नपूर्णाबाईनीं त्यांना आपल्या घरांत नेलें आणि त्या व दुर्गा मोठ्या कळवळ्यानें त्यांना वारा घालूं लागल्या.

इकडे आग विझविण्यासाठीं लोकांनीं केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. सगळें घर जळून खाक झालें. सुतळीचा तोडाहि बाहेर निघाला नाहीं. विठ्ठलरावांच्या भागालाहि थोडेंबहुत नुकसान झालेंच. विठ्ठलरावांचा दरवाजा उघडण्याल शेवटीं हेंच कारण झालें. इतका वेळ चाललेल्या आरडाओरडीनें ते जागे झाले नाहींत. परंतु त्यांच्या घराकडे आगीच्या ज्वाळा फिरल्याचा गोंगाट ऐकतां-क्षणींच खाडकन् दरवाजा उघडून ते बाहेर आले व आपल्या घराचें आगी-पासून रक्षण करण्यांत निमग्न झाले.

---

प्रकरण अठ्ठाविसावें

## दोन मृत्यु

दिवस उगवला. घर जळून खाक झाले तरी देखील आग धुमसतच होती. रात्रीं जमलेले लोक थकून आपापल्या घरीं परत जाऊं लागले. रात्रीं आले नव्हते अशा लोकांचे थवेच्याथवे आतां मौज पहाण्याकरितां येऊं लागले. विठ्ठलराव मोठ्या पहांटेस उठून कांहीं कामानिमित्त बाहेर निघून गेले आणि तिकडून त्यांनीं आपल्या एका स्नेह्यामार्फत विनायकरावांना एक पत्र पाठविलें. त्यांत फक्त इतकेच लिहिलें होतें कीं, "तुमच्या घराला गेल्या रात्रीं एकाएकीं आग लागून त्यात तुमची आई, पत्नी व मुलगा हीं तिघेहि जळून मेलीं." विनायकरावांचें घर दग्ध करून जणूं या राक्षसाचें समाधान झालें नाहीं, म्हणून त्यांचें अंतःकरणहि दग्ध करून टाकण्याची ही तयारी त्यानें केली.

इकडे सगुणाबाई दुःखानें तळमळ करीत होत्या. विनायकरावांचा मुलगा केशव 'आई आई' करून आक्रोश करीत होता. सरस्वतीची प्रकृति रात्रीपेक्षां किंचित् बरी होती. मुलाला मांडीवर घेऊन ती रडत बसली होती. सगुणाबाईंच्या मस्तकावर, छातीवर आणि उजव्या पायावर जळजळीत निखारे पडून भाजलें होतें. मस्तकाचें तर अर्धे कातडेंच जाऊन त्यावर मोठमोठाले फोड आले होते, आणि त्यामुळें सगुणाबाई अगदीं विद्रूप दिसत होत्या. केशव तर बिचारा कोमल अर्भक! अग्नीच्या भयंकर तापानें त्याचें कोमल शरीर रक्तवर्ण होऊन गेलें होतें व जागोजाग त्यावर मोठमोठे फोड आले होते. त्याच्या सर्वांगाला

अशा कांहीं वेदना लागल्या होत्या कीं, त्याला धड निजतांहि येत नव्हतें किंवा उठून बसतांहि येत नव्हतें, अंगाला हात लावतांच तो 'आई आई' करून टाहो फोडीत होता. सरस्वतीच्याहि सर्व शरीराला वेदना लागल्या होत्या; परंतु उत्तरोत्तर तिला बरें वाटत होतें. पोटच्या गोळयाचे आणि सासूबाईचे कष्ट पाहून तिच्या डोळ्यांतून सारखे अश्रु वाहत होते. त्यांना होत असलेल्या असह्य यातना पाहून तिला आपल्या दुःखाचें कांहींच वाटत नव्हतें.

जसजसा उन्हाचा ताप वाढूं लागला तसतशी सगुणाबाई आणि केशव यांच्या अगाची लाहीलाही होऊं लागली. दुःखानें तीं दोघेंहिं तळमळ करूं लागलीं. भिवा आणि दुर्गा दोघेंहि त्यांना सारखा वारा घालीत बसलीं होतीं. शेजारीपाजारी जे कोणी समाचाराला येत ते या दोघांची ही अवस्था पाहून कळवळून जात होते. पुढें ही आग कशी लागली, ती आपोआप लागली कीं कोणीं दुष्टानें मुद्दाम लाविली, हा प्रश्न साहजिकच निघाला.

"कोणींतरी दुष्टानें हें राक्षसी कृत्य करून वैर साधलें असलें पाहिजे. नाहींपेक्षां घराच्या वळचणीनें प्रथम पेट घेतला असता कसा? आणि शिवाय मुद्दाम जर कोणीं नराधमानें हें कृत्य केलें नसतें तर दोन्ही दरवाजे बाहेरून बंद कसे झाले असते? अरेरे! अशा दयाळु, सद्गुणी मनुष्यांशीं असें शत्रुत्व करणारा चांडाळ कोण असावा? अशा निरपराध मनुष्यांचा नाहक प्राण घेण्यास उद्युक्त होणारा निर्दय राक्षस कोण असावा?" असें जो तो म्हणूं लागला.

दुर्गा दुःखानें आणि क्रोधानें संतप्त होऊन रडतरडत म्हणाली "हें खात्रीनें दादाचंच काम. मीं आपल्या डोळ्यानीं त्यांना पाहिलं. इतका गांव आग विझविण्यासाठीं लोटला होता, पण त्यांनीं नुसतं ढुंकूनदिखील पाहिलं नाहीं!"

दुर्गानें आपल्या डोळ्यांनीं पाहिल्याबद्दलची गोष्ट खोटी होती, हें सांगावयास नकोच!

भिवा म्हणाला "दुर्गाची आरडाओरड ऐकून मी धडपडून उठलों आणि बाहेर येतों तों दादा आपल्या दरवाज्यापाशीं उभे असलेले माझ्या दृष्टीस पडले. मला पहातांच त्यांनीं खाड्दिशीं दरवाजा लावून घेतला"

याप्रमाणें अनेक तर्कवितर्क होऊं लागले. सर्वांचा संशय विठ्ठलरावांवर येऊं लागला. विठ्ठलरावांच्या मोठ्या पहाटेस उठून घर सोडून जाण्यानें तर हा संशय अधिकच बळावला. शेजारपाजारचे लोक त्यांच्यावर दांतओठ खाऊं लागले.

सगुणाबाई निचेष्टित पडल्या होत्या त्या आतां किंचित् शुद्धीवर आल्या. अर्थात्, त्यांच्या कानांवरहि या सगळ्या गोष्टी गेल्या. म्हातारीच्या जिवाचा तिळपापड झाला. कपाळावर हात मारून घेऊन त्या म्हणाल्या "भगवंता! हाच का तुझ्या घरचा न्याय? अरे, असं मीं कोणतं भयंकर पाप केलं होतं, ती मी हें सगळं पहायला जगल्यें! नारा—"

असह्य संतापाच्या भरांत म्हातारीनें कपाळावर हात मारिला, तो किंचित् वरच्या बाजूला मस्तकावर आलेल्या फोडावर बसून तो फोड फुटला आणि त्यांतून भळभळां पाणी निघून तिचे डोळे आणि तोंड भरून गेलें! म्हातारी पुनः बेशुद्ध झाली.

सर्वांगाला कळा लागून केशव माशासारखा तळमळत 'आई आई' म्हणून एकसारखा आक्रोश करीत होता. उत्तरोत्तर त्याचा स्वर खोल जात चालला. सरस्वतीच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात होत्या. बिचारी घट्ट मन करून त्या बालकाची शुश्रूषा करीत होती. त्या गोजिरवाण्या मुलाचे हाल पाहून तिचें अंतःकरण भडभडून येत होतें. "सरस्वती, कांहीं विचार कर, उगी रहा," असें म्हणून अन्नपूर्णाबाई तिचें समाधान करीत होत्या. आईचें उदाहरण पाहून बारू देखील आज आपल्या आजीची आणि काकीची शुश्रूषा करण्यांत निमग्न झाली होती.

सगुणाबाई पुनः शुद्धीवर आल्या आणि सरस्वतीला रडतांना पाहून सद्गदित स्वरानें म्हणाल्या "मुली, नको, रडूं नको बाई! तूं रडूं लागलीस तर माझा केशव रडून रडून प्राण टाकील!"

केशवाची काय अवस्था झाली होती, याची त्यांना अद्यापि कल्पना नव्हती. त्यामुळें त्या म्हणाल्या "कुठं आहे माझा केसू? आणा ग त्याला जरा माझ्याजवळ. आजच्या दिवसांत माझा बाबा कसा तो मुळींच मजजवळ आला नाहीं!"

दुर्गा त्यांना वारा घालीत ह्या वेळपर्यंत स्तब्ध बसली होती. सगुणाबाईचें बोलणें ऐकून तिच्यानें स्वस्थ बसवेना. हातावर हात चोळून ती म्हणाली "मेल्याचा सत्यनास होवो! मेल्याचं काळीज कसं अगदींच उफराटं! सोन्यासारख्या माझ्या पोराचे हालहाल करायला निघतांना मेल्याचे ते हात गळून कां पडले नाहींत? देव करील तर एका वर्षाच्या आंत मेल्यांची राखरांगोळी होईल!"

उत्तरोत्तर सगुणाबाई आणि केशव या दोघांचेहि अधिकाधिक हाल होऊं लागले. सरस्वतीच्यानें त्यांचे ते हाल आतां पहावेनात! मुलाला दुर्गीच्या मांडीवर देऊन ती एकीकडे जाऊन पदरानें डोळे झांकून घेऊन एकसारखी रडत बसली. ही संधि साधून भागीरथीबाई अन्नपूर्णाबाईला आपल्या घरांत हांक मारून म्हणाल्या "हें तुम्हीं मांडलं आहे काय अन्नपूर्णाबाई? अद्यापि तुमचा ओढा त्यांच्याकडे आहेच! अहो, इतके कष्ट सोसून तुम्हाला काय फायदा होणार आहे? फुकटचे उपकारदिखील मानणार नाहींत बरं! अद्यापि त्या माणसांना तुम्हीं पुरं ओळखलंत नाहीं वाटतं!"

परंतु आज अन्नपूर्णाबाईनीं आपल्या वडील जाऊचा हा कानमंत्र ग्रहण केला नाहीं. भागीरथीबाईच्या राक्षसी स्वभावाची आज त्यांना पुरी ओळख पटली. त्याचा धिक्कार करून त्या रागानें म्हणाल्या "काय हें जाऊबाई! काय भलतंच बोलतां हें? अहो, एखाद्या पाषाणालादिखील दया येईल त्यांचे हे हाल आणि अपेष्टा पाहून. घरादाराची राखरांगोळी झाली, नेसायला दुसरं लुगडंदेखील राहिलं नाहीं, सासूबाई आणि तें सोन्यासारखं लेंकरूं आता मरतात कीं घटकेनं मरतात याचा भरवंसा नाहीं. जाऊबाई, मी खरंच सांगत्यें, असं गोजिरवाणं मूल मी कुठंकुठं पाहिलं नव्हतं. आणखी असं पहा, त्या बिचाऱ्यांनीं स्वप्नांततरी कुणाचा अपराध केला आहे का? आपण त्यांना निष्कारण इतकं छळलं—इतका त्रास दिला, पण त्यांनीं तोंडांतून कधीं एक अक्षर तरी काढलं आहे का? कोण इतकं सोसून घेणार आहे? असं अगदीं हात धुऊन एखाद्याच्या पाठीस लागणं बरं नव्हे! जाऊबाई, इतक्या कशा तुम्ही निर्दय!"

बोलतां बोलतां अन्नपूर्णाबाई डोळे चोळूं लागल्या. भागीरथीबाई विफलमनोरथ होऊन वेडेंवांकडें तोंड करून तेथून चालत्या झाल्या.

रात्रीं तर त्यांच्या वेदना अगदींच असह्य झाल्या. सगुणाबाईंना आपणा स्वतःला होत असलेल्या दुःसह वेदनाचें कांहीं वाटलें नाहीं; परंतु आपल्या नातवाची अवस्था ऐकून त्यांच्या जिवाचा तडफडाट झाला होता. अनिवार दुःख आणि शोक यांनीं संतापून जाऊन त्या मोठमोठ्यानें शिव्याशाप देत होत्या. "ज्यांनीं माझ्या सोन्यासारख्या पोराची अशी दुर्दशा केली त्या मेल्यांची राखरांगोळी होईल! माझा म्हातारीचा तळतळाट घेतलात–मेल्यांनों! अशींच तडफडून तडफडून मराल! देव नाहीं बरं सुखानं राहूं देणार अशानं—" बोलतां बोलतां म्हातारी पुनः निचेष्ट पडली.

विठ्ठलराव आणि भागीरथीबाई यांना हे शिव्याशाप स्पष्ट ऐकूं जात होते. इतकेंच नव्हे, तर म्हातारीच्या प्रत्येक शब्दाबरोबर त्यांचा थरकांप होत होता. भागीरथीबाईच्या अंगावर तर कांटाच उभा रहात होता. विठ्ठलराव झोपेंत असले तरी देखील दचकून उठत होते.

तीन प्रहर रात्र झालेली. दिवा मिणमिण जळत होता. गेल्या रात्रीच्या जागरणामुळे आणि परिश्रमांमुळे गोविंदरावांना गाढ झोंप लागली होती. सगुणाबाई मधुनमधून अगाला आळेपिळे देत होत्या. दुर्गाजवळून केशवाला आपल्या मांडीवर घेऊन सरस्वती सतृष्ण नेत्रांनीं त्याच्याकडे पहात होती. अन्नपूर्णाबाई जवळच बसल्या होत्या. सर्वच अश्रु गाळीत होतीं. मग धीर तरी कोणीं कोणाला द्यावा !

केशवाची स्थिति आतां अगदींच भयंकर झाली होती. त्याला दुर्धर यातना होत असल्याचें स्पष्ट दिसत होतें. मधुनमधून तो एकदम दचकून उठे. पुढेंपुढें तर रक्त ओंकू लागला. श्वासोश्वास करणेहि त्याला फार अवघड पडूं लागलें. डोळे थिजल्यासारखे झाले. सरस्वती आणि दुर्गा त्यांची ही अवस्था पाहून रडूं लागल्या. अन्नपूर्णाबाईनीं घाबऱ्याघाबऱ्या आपल्या पतीला जागे केलें. गोविंदराव डोळे चोळीत चोळीत तेथें येऊन उभे रहातात न रहातात तोंच सरस्वतीच्या मांडीवर केशवाचें प्राणोत्क्रमण झालें. सरस्वतीनें हृदयभेदक किंकाळी फोडिली अन्नपूर्णाबाईनीं केशवाचें तें अचेतन शरीर सरस्वतीच्या मांडीवरून उचललें आणि त्याहि रडूं लागल्या. हतज्ञान पडलेल्या सगुणाबाईंना ही दुखःद गोष्ट मुळींच कळली नाहीं. त्यांची स्वतःची अवस्थाहि उत्तरोत्तर शोचनीय होत चालली होती. उजाडण्याच्या सुमारास तर त्या भलतीसलती बडबड करूं लागल्या.

" चांगलं केलंस बाबा—चांगलं केलंस ! देईन तर—कां म्हणून देईन ? माझ्या सोन्याला तूं कोण नेणार ? नाहीं—नाहीं—तो पहा बाबा माझा रडतो आहे—आई—आईग ! कळवळला माझा तान्हा अगदीं ! ये—केसूबाबा, ये मजजवळ बरं—अरे गुलामा ! मला भितोस—"

म्हातारी किंचित् थांबली आणि पुनः रडतरडत मोठ्यानें म्हणाली "नेला—नेला—नेला बाई माझ्या सोन्याला ! अरे विनू, तूं तरी बाबा धाव—अरे—धर—धर—त्या मेल्यांना. मेले मां—माझ्या विनूला पण घेऊन गेले—अरे नशिबा !"

साफ उजाडलें. घटकाभर दिवस आला तरी देखील सगुणाबाईंची बडबड थांबेना. " तो पहा मेला चांडाळ पुनः आला—आतां कुणाला आणखी

नेणार ? मार–मार मेल्या मार–जीव घे–आतां रडायची नाहीं. कां म्हणून रडेन मी! माझा केसूबाळ मोठा होईल—कोण तें म्हणालं नाहीं होणार म्हणून ? माझा सोन्या तो—"

म्हातारीचे हे असंबद्ध प्रलाप ऐकून सर्वांच्या डोळयांतून अश्रुप्रवाह वाहूं लागले, सर्वांची अतःकरणें भडभडून आलीं. दोनप्रहरच्या सुमारास, म्हातारी पुनः क्षणभर शुद्धीवर आली. सरस्वती जमिनीवर पडून आक्रोश करीत आहे हें पाहून ती म्हणाली " नको रडूं बये! हें दुःख कांहीं जन्मवेरी रहाणार नाहीं–भगवान् तुझं कल्याण करील. ये मुली मजजवळ ये—"

नंतर सगुणाबाई अन्नपूर्णाबाईकडे दृष्टि फिरवून म्हणाल्या—अन्नपूर्णा–मला फार समाधान वाटलं बरं ? सुखानं रहा. उदंड आयुष्य देव देईल तुम्हांला–भागीरथी कुठं दिसत नाहीं—?"

भागीरथीबाईना कोठें पर्वा होती सासू मेली किंवा जिवंत राहिली त्याची! सगुणाबाईनीं सरस्वती आणि अन्नपूर्णाबाई यांना मनोभावानें आशीर्वाद दिले आणि जे वर आकाशाकडे डोळे फिरविले ते फिरविलेच!

---

प्रकरण एकोणतिसावें

## कडेलोट झाला

मोलमेनची हवा विनायकरावांच्या प्रकृतीला मुळींच मानवली नाहीं. घरीं जाऊन आल्यावर कांहीं दिवस अंमळ बरें वाटलें खरें, परंतु पुढें लवकरच त्यांना पुनः तापानें गांठलें. डॉक्टराच्या औषधानेंहि तो ताप कमी होईना. "आणखी थोडे दिवस हेंच औषध घ्या, म्हणजे खात्रीनें ताप जाईल," असें डॉक्टर नेहमीं सांगत, परंतु त्या सागण्यांत कांहीं अर्थ असल्याचें दिसून आलें नाहीं. मधुनमधून थोडे दिवस ताप येत नसे हें खरें, परंतु कांहीं दिवसांनीं तो पुनः येऊं लागे. विनायकरावांची प्रकृति यामुळें फारच अस्वस्थ झाली होती. दिवसेंदिवस त्यांचें शरीर क्षीण होत चाललें होतें. अशा स्थितींत विठ्ठलरावांनीं आपल्या स्नेह्याकडून पाठविलेलें पत्र त्यांना मिळालें. विनायकरावांना दुःख देण्याचा विठ्ठलरावांचा हेतु होता, तो या पत्रानें चांगलाच साधला. पत्रांतील दुःखकारक मजकूर वाचतांच विनायकरावांचें अंतःकरण व्याकुळ होऊन गेलें. पत्नी, पुत्र आणि जननी यांच्या अकस्मात् घडून आलेल्या मृत्यूची बातमी

समजतांच दुःखातिशयानें त्यांचें अंतःकरण तळमळूं लागलें. तेच दिवशीं त्यांचा ताप अनावर भडकला. ते हतज्ञान झाले.

स्माईलसाहेब विनायकरावांच्या समाचाराला आले होते. त्यांनी ही अवस्था पाहून डॉक्टरांना विचारलें. "आजच एकाएकीं इतका ताप वाढायला कारण काय झालें?"

डॉक्टर विनायकरावाच्या चांगल्या परिचयाचे होते. विनायकरावांना आलेल्या पत्राची हकीगत साहेबांना कळून ते म्हणाले "पत्रांतील या दुःख-कारक बातमीनें त्यांच्या अंतःकरणाला एकदम धक्का बसला आहे. शारीरिक दुर्बलतेमुळें त्यांना हा दुःखभार सहन करवला नाहीं."

"एकंदर चिन्हें कशीं दिसतात?"

लक्षण कांहीं चांगलें दिसत नाहीं! मानसिक यातना कमी झाल्या नाहींत, तर यातून निभावणें कठीण. यांचें हें दुःख निवारण करण्यालाहि कांहीं मार्ग दिसत नाहीं."

स्माईलसाहेबांची मुद्रा चिंताग्रस्त झाली. बराच वेळ अगदीं एकाग्रतेनें ते विनायकरावांकडे पहात होते. विनायकराव हतज्ञान होऊन पडले होते. मधुन-मधून कांहींतरी बडबड करीत होते. साहेब आल्याची त्यांना दाद लागणें शक्य नव्हतें. शेवटीं एक उसासा टाकून साहेब डॉक्टरांना म्हणाले "हें पहा, तुम्ही आपली शिकस्त करून पहा; तुम्हाला वाटेल तर आणखी दुसऱ्या कोणा डॉक्टराला बोलावून आणा. लागेल तितका पैसा मी खर्चीन. त्याची काळजी करूं नका. याला जर यांतून वांचविलेंत तर तुमच्या श्रमांचें मी चांगलें चीज करीन."

"प्रयत्न करण्यांत मी मुळींहि कसूर करणार नाहीं; परंतु यश देणें सर्वस्वीं त्या जगन्नियंत्याच्याच हातीं आहे."

रुमालानें आपल्या कपाळावरील घाम पुशीतपुशीत साहेब तेथून निघून गेले. त्यांना आफिसांतलें काम सुचेना, विनायकरावांवर त्यांचा फार लोभ जडला होता. नुक्तच विनायकरावांना साहेबांनीं आपला मुख्य 'मॅनेजर' नेमिलें होतें. विनायकराव जाग्यावर असले म्हणजे आठआठ दहादहा दिवस साहेबांनीं कामाकडे लक्ष्य दिलें नाहीं तरी चालत असे, इतका साहेबांचा पूर्ण विश्वास त्यांनीं संपादन केला होता.

डॉक्टरहि खरोखरच आपल्याकडून पराकाष्ठा करीत होते; स्माईलसाहेब स्वतः घटकोघटकीं विनायकरावांच्या समाचाराला येत होते. परंतु दुखणें कमी होण्याचें चिन्ह मुळींच दिसेना. उत्तरोत्तर रोग्याची अवस्था वाईट होत चालली. स्माईलसाहेब घाबरून गेले. विनायकरावांच्या इष्टमित्रांपैकीं कोणाला-तरी हें कळविलेलें बरें, असें त्यांना वाटूं लागलें; परंतु त्यांना कोणाचाहि पत्ता माहीत नव्हता. शेवटीं त्यांनीं व्हाईटसाहेबांना ही सारी हकीगत तारेनें कळविली.

दुसरे दिवशीं विनायकराव बरेच शुद्धीवर आले. हे पाहून "तुझ्या दुखण्याची बातमी तुला कुणाला कळवायची आहे का?" असें स्माईलसाहेबांनीं त्यांना विचारले.

"माझे आतां आहे कोण—कुणाला बातमी कळवायची?" बोलतांबोलतां विनायकरावाचे डोळे पाण्यानें भरून आले. उशाखालीं पत्र होते तें काढून त्यांनीं साहेबांच्या हातीं दिलें.

साहेब म्हणाले "मला समजला आहे त्यांतला मजकूर. पण विनायक, त्या पत्राच्या खरेपणाविषयीं मला संशय आहे. हा मजकूर खरा असता, तर तुझ्या भावांनीं पत्र लिहिलें असतें, असें नाहीं का तुला वाटत?"

उजवा हात कपाळावर ठेवून विनायकराव क्षीण स्वरानें म्हणाले "मला आतां भाऊ आहेत कुठें? मी त्यांचा शत्रु! माझे असें आतां या जगांत कुणी राहिलें नाहीं–सर्व मला सोडून—"

बोलतांबोलतां विनायकरावांना दुःखाचा अनावर हुंदका आला. विनायक-रावांचा हुदका किंचित् कमी होतांच पत्रासंबंधानें स्माईलसाहेबांनीं काढलेली शंका त्याच्या मनांत आली. आतां त्यांनाहि त्या पत्राच्या खरेपणाविषयीं किंचित् संशय आला. साहेब म्हणतात तें कांहीं केवळ असंभवनीय नाहीं, असें वाटून त्यांच्या चित्ताला किंचित् स्वास्थ्यहि आलें; परंतु तें केवळ क्षणिक. दुर्धर चिंताग्नीनें त्यांचें कोमल अंतःकरण करपून गेलें होतें. आपले अश्रुपूर्ण नेत्र स्माईलसाहेबांच्या उदार आणि दयाळु मुद्रेकडे फिरवून विनायकराव दुःखव्यंजक स्वरानें म्हणाले "साहेब! आपण म्हणतां तसेंच खरोखर असेल का? पण छे! माझें मनच मला सांगत आहे कीं, त्या पत्रांतील हकीगत अगदीं अक्षरशः खरी आहे. माझें हृदय धडधड उडत आहे, प्राण व्याकुळ होऊन गेला आहे, मन कसें अगदीं उदास आणि शून्य होऊन गेलें आहे.

साहेब, माझें दैवच असें फुटकें आहे! कांहीं दुखणेंबहाणें होऊन त्यांत त्यांचें कांहीं बरेंवाईट झालें असतें, तर त्याचें मला इतकें वाईट वाटलें नसतें; परंतु घरांत जळून तीं दग्ध झालीं, हें ऐकून माझें हृदय दुभंग झालें आहे. माझ्या म्हाताऱ्या आईची गोष्ट मनांत आली–बायको आणि मुलगा यांच्या मुद्रा दृष्टीसमोर दिसूं लागल्या, म्हणजे माझा प्राण तटतटां तुटूं लागतो! साहेब, आपल्याला काय सांगू—"

विनायकरावांना पुनः अनावर हुंदका आला. डोळ्यांतून तर सारख्या अश्रु-धारा वहात होत्या. किंचित् वेळानें डोळे पुसून ते सद्गदित स्वरानें म्हणाले, "साहेब! माझ्या हातून त्यांना सुख म्हणून कसें तें एक दिवस देखील मिळालें नाहीं हो! अरेरे! काय हालहाल होऊन त्यांना मरण आलें हें! साहेब आपण या एकंदर गोष्टींचा विचार कराल, तर आपलीहि छाती फाटून जाईल कशाला मी या दूर देशांत आलों! ज्यांच्यासाठीं मीं आपल्या स्वतःच्या प्राणाचीहि पर्वा केली नाहीं—तींच मला सोडून गेलीं!"

हें हृदयद्रावक भाषण ऐकून साहेबांचें अतःकरणहि गहिंवरून गेलें. विनायकरावांचा हात आपल्या हातांत धरून ते ममतेनें म्हणाले "विनायक, तूं असा निष्कारण घाबरूं नकोस. तूं कितीहि सांगितलेंस तरी त्या पत्रावर कांहीं माझा विश्वास बसावयाचा नाहीं. तुझ्या इष्टमित्रांपैकीं मला कोणाचा तरी पत्ता सांग, म्हणजे मी आतां तार करून काय ती खरी बातमी आणवितों. त्याशिवाय माझें समाधान व्हावयाचें नाहीं आणि तुलाहि बरें वाटावयाचें नाहीं."

विनायकराव किंचित् हंसले आणि म्हणाले "साहेब, बरें वाटून मला आतां करावयाचें आहे काय? या जगाचा मला आतां अगदीं वीट आला आहे! जगण्यापेक्षां मरणेंच मला आतां बरें वाटतें. साहेब, आपणच सांगा, आहे कोण माझें आतां या जगांत—आणि बरा होऊन कुणासाठीं काढूं मी ही आतां दगदग? ज्यांचे कष्ट दूर करण्याच्या हेतूनें घरदार सोडून–ज्यांचा असह्य विरह सहन करूनहि मी या दूर देशांत आलों, तीं सर्व मला सोडून गेलीं. आतां या जगांत माझें राहिलें आहे काय?"

असें म्हणून विनायकरावांनीं डोळ्यांवर पांघरूण घेतलें आणि ते एकसारखे अश्रू गाळूं लागले. त्यांच्याशीं या वेळीं जास्तकमी बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, अशा विचारानें स्माईलसाहेबहि स्तब्ध राहिले. कांहीं वेळानें साहेबांकडे अश्रुपूर्ण नेत्रांनीं पहातपहात विनायकराव त्या तशा अवस्थेंत देखील नम्रपणें म्हणाले,

"साहेब! आपली मर्जीच असेल तर जगन्नाथला तार करा, म्हणजे खरी हकीगत काय ती आपल्याला ताबडतोब कळेल; परंतु कृपा करून मी आजारी आहे हें मात्र सध्या तरी त्याला कळवूं नका. कारण, सुदैवानें या पत्रांतील बातमी खोटी असली, तर तीं माणसें उगाच घाबरून जातील. जगन्नाथ तर तत्काळ इकडे निघून आल्याविना रहायचा नाहीं. या जगांत जगन्नाथ हाच काय तो माझा खरा खरा मित्र आहे. माझें बरेंवाईट कांहीं झालें, तरी त्यालाच मग आपण कळवा, म्हणजे तो पुढची सर्व व्यवस्था करील. आपल्याच आग्रहावरून पांच हजार रुपयाला मीं विमा उतरला आहे. हे पांच हजार रुपये माझी हतभागी पत्नी माझ्या पश्चात् जीवंत असेल तर तिला मिळतील अशी व्यवस्था करा. आपले मजवर अनंत उपकार झाले आहेत मी जन्मोजन्मींहि ते विसरणार नाहीं—"

"अरे! तूं तर अगदी निरवानिरव करण्याच्या पंथाला लागलास! विनायक, इतका का तूं घाबरला आहेस?"

"कोण! घाबरलों आहें? छे छे? साहेब, मृत्यूला हो मी आतां कशाला घाबरूं?" विनायकराव मोठ्या आवेशानें म्हणाले आणि "सरस्वती, सरस्वती!" म्हणून मोठ्यानें एकदम ओरडले.

स्माईलसाहेब भयभीत झाले. त्यांनीं तत्काळ डॉक्टरांना बोलावणें धाडलें. रंगून येथें त्यांच्या ओळखीचा एक चांगला गोरा डॉक्टर होता, त्यालाहि त्यांनीं ताबडतोब निघून येण्याविषयीं तार केली. त्याचप्रमाणें विनायकरावांनीं दिलेल्या पत्त्यावर जगन्नाथरावांना तार करून तिकडील कायती खरी हकीगतहि त्यांनीं मागविली. विनायकराव आजारी असल्याबद्दल तूर्त त्यांच्या घरीं न कळविणेंच त्यांना बरें वाटल्यावरून तें त्यांनीं तारेंत मुळींच लिहिलें नाहीं.

इकडे विनायकराव एकाएकीं भ्रम झाल्यासारखें करूं लागले. "सरस्वती, सरस्वती!" म्हणून वेड्यासारखे क्षणोक्षणीं मोठमोठ्यानें हांका मारूं लागले. डॉक्टरांच्या सांगण्याकडे त्यांनीं लक्ष्य दिलें नाहीं. किंवा स्माईलसाहेबांच्या दरडावणीलाहि जुमानिलें नाहीं. घटकेंत ते "सरस्वती!" म्हणून खदखदां हंसूं लागत, तर घटकेंत "कुठें आहे ती?" म्हणून एकसारखे रडत बसत. एखादे वेळीं तर कांहींतरी बरळतच सुटत. एकदां तर ते म्हणूं लागले "आई—आई—आई—थांब जाऊं नकोस. अरेरे! कोण यातना!—जातील, हेहि दिवस जातील—त्याची कशाला चिंता हवी? या भयंकर पातकाबद्दल ईश्वर प्रायश्चित्तहि भयंकर दिल्याविना रहाणार नाहीं—तो पहा, तो—पहा,

वरून देव देखील 'हो' म्हणून म्हणत आहे—अहाहा कितीतरी सुंदर—किती—"

डॉक्टरांना आणि स्माईलसाहेबांना वाटत होतें कीं, विनायकराव कांहींतरी असंबद्ध गोष्टी बरळत आहेत; परंतु विनायकरावांचा एकंदर वृत्तांत ज्यांना ज्यांना माहीत आहे, ज्यांना ज्यांना त्यांच्या भावांचीं चरित्रें माहीत आहेत, त्यांपैकीं कोणी जर यावेळीं विनायकरावांच्या बिछान्याशीं उभे असतें, तर त्याच्या तत्काळ ध्यानांत आलें असतें, कीं, त्यांच्या या बरळण्यांत एक शब्दहि असंबद्ध नव्हता. आईच्या दुःखानें, पत्नीच्या दु.खानें, आणि वडील भावांच्या अमानुष वर्तनानें ते भग्नहृदय झाले होते. केवळ वडील भावाच्या असह्य छळामुळेंच विनायकराव आज घरदार सोडून ब्रह्मदेशासारख्या दूर देशांत—जेथें आप्तस्वकीय कोणीहि नाहीं अशा स्थळीं—मृत्यूच्या दारुण यातना भोगीत पडले होते. स्माईलसाहेबांना तर पराकाष्ठेचें दुःख झालें.

---

## प्रकरण तिसावें

## सरस्वतीचें सौभाग्य

विनायकरावांचें घर जळालें त्यावेळीं जगन्नाथराव मुंबईस असल्यामुळें त्यांना बरेच दिवस ती बातमी कळली नाहीं. पुढें उडतउडत ती बातमी प्रथम त्यांच्या घरीं समजली; तेव्हां यमुनेनें पत्र पाठवून ती त्यांच्या कानांवर घातली. त्याबरोबर मोठ्या गडबडीनें ते आपल्या घरीं जाण्यास निघाले. तोंच स्माईलसाहेबांनीं पाठविलेली तार त्यांच्या हातीं येऊन पडली. विनायकराव अत्यवस्थ असल्याबद्दल स्माईलसाहेबांनी घाबरून प्रथम व्हाईटसाहेबांना तार केली होती, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. कर्मधर्मसंयोगानें स्वतः व्हाईटसाहेब ठिकाणावर नसल्यामुळें ह्या वेळपर्यंत त्यांच्याकडून ती बातमी जगन्नाथरावांना समजली नव्हती. अर्थात्, स्माईलसाहेबांची ही तार वाचून त्यांना तसा कांहींच संशय आला नाहीं. उलट ही बातमी इतक्या लवकर तिकडे जाऊन पोहोंचली, याचेंच त्यांना आश्चर्य वाटलें. "असेल, कदाचित् गंगूनें पत्रबित्र पाठविलें असेल," असें समजून त्यांनीं "होय, विनायकरावांचें घर एकाएकीं जळलें ही गोष्ट खरी आहे; त्यांची आई आणि मुलगा या दोघांना बरीच इजा झाली आहे; पत्नी खुशाल आहे, घाबरण्याचें कारण नाहीं. मात्र

त्यांना थोडे दिवस इकडे पाठविण्याची कृपा करावी," असें स्माईलसाहेबांना ताबडतोब तारेंतून उत्तर पाठवून ते आपल्या घरीं निघून आले. विनायकरावांची आई आणि मुलगा या दोघांच्या मृत्यूची बातमी त्यांनीं कोणत्या हेतूनें गुप्त ठेविली होतीं, हें वाचकांच्या ध्यानांत येण्याजोगे आहे.

इकडे स्माईलसाहेबांनीं तार केल्याप्रमाणें रंगून येथे असलेला त्यांचा स्नेही डॉक्टर तसाच निघून आला. विनायकरावांची प्रकृति त्यानें अगदीं बारकाईनें तपासून पाहिली आणि पहिल्या डॉक्टरप्रमाणेंच त्यानेंहि आपलें मत दिलें, कीं, "मानसिक व्यथा दूर झाल्या तर विनायकराव खात्रीनें या दुखण्यांतून उठतील. त्यांच्या शारीरिक व्यथेबद्दल इतकें भिण्याचें मुळींच कारण नाहीं."

आपल्या स्नेह्यानें दिलेलें हें मत ऐकल्यापासून जगन्नाथरावांच्या उत्तराकडे स्माईलसाहेबांचे डोळे लागून राहिले होते. कांहीं उत्तर आलें आहे कीं काय, असा तपास करण्यासाठीं घटकोघटकीं ते तार ऑफिसांत आपला शिपाई पाठवूं लागले. त्यांना दुसरें कांहींच सुचेनासें होऊन गेलें. त्यांचे स्नेही इकडे विनायकरावांची शारीरिक व्यथा औषधोपचारांनीं कमी करण्यास झटूं लागले, आणि विनायकरावांच्या आयुष्याची दोरी सबळ होती म्हणून म्हणा किंवा सरस्वतीचें सौभाग्य बळकट होतें म्हणून म्हणा, या हुशार डॉक्टरच्या प्रयत्नाला यश येण्याचीं चिन्हेंहि दिसूं लागलीं. विनायकरावांचा भ्रम बराच कमी झाला आणि तापहि हळुहळू उतरूं लागला, हें पाहून त्या दयाळु स्माईलसाहेबांचा जीवहि थाऱ्यावर येऊं लागला; परंतु त्याबरोबर जगन्नाथरावांकडून काय उत्तर येतें, तें समजण्यासाठीं ते उत्तरोत्तर अधिकाधिक अधीर होत चालले. शेवटीं एकदाचें तें उत्तर त्यांच्या हातांत येऊन पडलें. मोठ्या उत्सुकतेनें तें त्यांनीं वाचून पाहिलें आणि आपल्या स्नेह्याच्या हातीं दिलें. दोघांनाहि बरेंच समाधान वाटलें. "आतां मुळींच धास्ती राहिली नाहीं. थोड्या वेळानें त्यांचें मन अमळ स्वस्थ झाले म्हणजे आपण त्यांना ही बातमी कळवूं. मला वाटतें, हे आतां हां हां म्हणतां हुषार होतील. तरी पण एक मात्र आहे, येथें राहिल्यानें हे या तापाच्या तडाक्यांतून पूर्णपणें असें कधींच सुटावयाचे नाहींत. दोनतीन महिने तरी निदान यांनीं आपल्या गांवीं जाऊन राहिलें पाहिजे. किंबहुना पुनः मुळींच हे इकडे न येतील तर चांगलें. यांच्या प्रकृतीला येथील हवा मुळींच मानवणार नाहीं."

स्माईलसाहेब स्तब्धपणें ऐकत होते. ते कांहींच बोलले नाहींत. ते कांहीं तरी मोठ्या विचारांत असावे, असें त्यांच्या मुद्रेवरून दिसत होतें. असो.

त्या रात्रीं किंचित् डोळा लागल्यामुळें दुसरे दिवशीं सकाळीं विनायकराव बरेच हुशार दिसत होते. हें पाहून डॉक्टरांच्या सल्ल्याप्रमाणें जगन्नाथरावांनी धाडलेलें उत्तर त्याना कळविण्याच्या हेतूनें स्माईलसाहेब त्यांच्या बिछान्याशी जाऊन बसले आणि प्रथम " आज कसें वाटतें ?" वगैरे एकदोन प्रश्न विचारून ते म्हणाले " विनायक, त्या पत्रांतील हकीगत खोटी आहे, असें नव्हतो का मी म्हणत ? ही पहा जगन्नाथाकडून तार आली आहे, यांत तो स्पष्ट लिहितो कीं, तुझी पत्नी अगदीं खुशाल आहे—"

" आणि घर जळाल्याबद्दलची बातमी पण खोटीच का ?" विनायकरावांनीं अधीरतेनें विचारलें.

साहेबांनीं एक उसासा सोडला आणि गंभीर स्वरानें ते म्हणाले " नाहीं, दुर्दैवानें ती बातमी खरीच ठरली. अरे, पण त्यांत काय आहे, तुला दुसरें नाहीं का घर बांधतां येणार ?"

विनायकराव बराच वेळ कांहीं बोलले नाहींत. शुष्क आणि निस्तेज झालेल्या त्यांच्या मुद्रेवर बराच तजेला दिसूं लागला; खोल गेलेल्या त्यांच्या डोळ्यांत अश्रुबिंदु चमकूं लागले. आपला कृश हस्त कपाळावर फिरवीत फिरवीत कांहीं वेळानें त्यांनी विचारिलें " आईबद्दल त्यांत कांहीं आहे का ?"

" होय, तुझ्या आईला आणि तुझ्या मुलाला थोडी इजा झाली आहे खरी."

" सरस्वती तर मग खुशाल आहे !" इतकेंच बोलून विनायकरावांनीं डोळे मिटले आणि ते स्वस्थ पडून राहिले. स्माईलसाहेबहि मग तेथून उठून गेले.

मानसिक व्यथा याप्रमाणें बरीच दूर होतांच मग शारीरिक व्यथेवर तत्काळ डॉक्टराच्या औषधांचा अंमल बसूं लागला. विनायकरावांना त्या रात्रीं तर बरीच झोंप लागली. गेल्या दहाबारा दिवसांत त्यांना अशी स्वस्थ झोंप लागली नव्हती. दुसरे दिवशीं त्यांना बरीच हुशारी झाली. स्माईलसाहेब तेथें येतांच जगन्नाथरावांकडून आलेली तार त्यांनीं मागून घेतली आणि ती स्वतः वाचून पाहिली. नंतर पुनः बराच वेळ विचार करून ते म्हणाले "तर मग मी आतां घरीं जातों."

स्माईलसाहेबांना फार आनंद झाला. ते म्हणाले " विनायक, तूं असा उतावीळ होऊं नकोस. तुझें घर जवळ का आहे ? तूं जाण्याजोगा बरा हो, म्हणजे एक क्षणभर देखील मी तुला येथें ठेवणार नाहीं."

विनायकरावांच्या डोळ्यांत अश्रु आले; परंतु हे अश्रु दुःखाचे किंवा शोकाचे नसून त्यांच्या कृतज्ञबुद्धीचे दर्शक होते. ते म्हणाले " साहेब ! मला आपले उपकार कसे फेडतां येतील ?"

दिवसेंदिवस विनायकरावांच्या प्रकृतीला आराम पडूं लागला. दहाबारा दिवसांत ते साधारण हिंडूंफिरूंहि लागले. समुद्राचा प्रवास त्यांच्या प्रकृतीला हितकारक होईल, असेंच डॉक्टरांचेंहि मत पडल्यावरून त्या परोपकारी आणि दयाळू स्माईलसाहेबांनीं विनायकरावांची बोटींत चांगली व्यवस्था लावून देऊन आपला एक शिपाई बरोबर देऊन त्यांची रवानगी केली आणि ते निघाल्या-बद्दलची जगन्नाथरावांना पुनः तार केली.

---

प्रकरण एकतिसावें

## कोण हा भयंकर प्रसंग

सरस्वतीच्या सबल सौभाग्यानें विनायकराव अगदीं जीवावरच्या दुखण्यांतून उठून मोठ्या अधीरतेनें घरीं जाण्यास निघाले होते. आईला कितपत इजा झाली असेल, मुलाची काय अवस्था झाली असेल, अशा प्रसंगीं सरस्वतीची स्थिति काय झाली असेल, तिच्या कोण उपयोगीं पडलें असेल, आतां पुढें काय करावयाचें, इत्यादि विचारांनीं त्यांचें अंतःकरण व्यग्र झालें होतें. निरोप देतांना स्माईलसाहेबांनीं त्यांना अगदीं बजावून सांगितलें होतें कीं "माझे पत्र आल्याविना तूं पुनः इकडे मुळींच येता कामा नये." असें सांगण्यांत साहेबांचा हेतु काय, हेंहि विनायकरावांच्या ध्यानांत येईना. साहेबांना आपली आतां जरूर राहिली नाहीं कीं काय, हेंच त्यांना समजेना. सारांश, ते बसून निघाले होते ती आगबोट जशी त्या अफाट महासागरांत हेलकावे खात चालली होती, तद्वतच त्यांचें अंतःकरणहि अनंत विचारसागरांत सारखे हेलकावे खात होतें. त्याला स्वस्थता म्हणून मुळींच कशी ती नव्हती. असो.

आगबोटीचा पहिल्या दिवसाचा प्रवास बराच निर्विघ्नपणें झाला; परंतु दुसरा दिवस अर्धामुर्धा जातो न जातो तोंच एकाएकीं प्रबळ झंझावात सुटून दशदिशा धुंद झाल्या. पर्वताकार प्रचंड लाटांनीं त्या भयानक विस्तीर्ण सागराच्या पृष्ठभागीं राक्षसी नृत्य आरंभिलें. प्रबळ झंझावात आणि प्रचंड लाटा यांच्या भयंकर कचाटांत सांपडलेली ती आगबोट एखाद्या निराधार, निराश्रित मनुष्याप्रमाणें इतस्ततः भ्रमण करूं लागली; यंत्राच्या किंवा तीं यंत्रें चाल-

विणाऱ्या मनुष्याच्या ताब्यांत मुळींच राहिली नाहीं. निर्दिष्ट मार्ग सोडून ती झपाट्यानें वहात चालली होती. मनुष्याच्या चंचल दैवगतीप्रमाणेंच तिचीहि गति झाली होती. क्षणार्धात ती पर्वताकार प्रचंड लाटेच्या शिखरावर विराजमान झालेली दिसे, तर क्षणार्धांत त्या अत्युच्च पदावरून ढांसळून जाऊन अगदीं रसातळास गेल्याचा भास होई. दोहों बाजूला उठणाऱ्या दोन प्रचंड लाटांचा संगम होऊन आगबोटीला आणि तिच्याबरोबर आपणा सर्वांना आतां जलसमाधि मिळण्याला एका क्षणाचा देखील अवधि लागावयाचा नाहीं, या भयंकर विचारानें बोटींतील मनुष्यांचा जीव मुळींच थाऱ्यावर राहिला नव्हता. जणों, त्या क्षुब्ध महासागरांत एकामागून एक उसळणाऱ्या लाटांतून प्रत्यक्ष मृत्युच त्या बिचाऱ्यांकडे टवकारून पहात होता. एक क्षण गेला, आतां पुढच्या क्षणीं आपली अवस्था काय होते, या दुर्धर विचारानें सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें होतें. कित्येक भाविक लोक भक्तिभावानें परमेश्वराची करुणा भाकीत होते; कित्येक एकमेकांची शेवटची भेट घेत होते; कवडीकवडी करून जमविलेला पैसा आतां अशा रीतीनें एकदम समुद्रार्पण होणार, या दुःखदायक विचारानें द्रव्यलोभी मनुष्य हताश होऊन गेले होते; बिचाऱ्यांना यमाच्या दाढेखालीं सांपडले असतांहि पैशाशिवाय कांहींच सुचत नव्हतें! कित्येक दूरदर्शी आणि धोरणी लोक आपापला जामानिमा नीट सांवरून पुढें येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्यासाठीं सज्ज होऊन राहिले होते; भीषण मृत्यु यांच्यापुढें मूर्तिमंत उभा असतांहि त्या सर्वांचे विचार त्याच्या तडाक्यांतून अद्यापीहि कसें सुटतां येईल, याबद्दलचेच चालले होते नाशवंत आणि क्षणभंगुर अशा या मानवी जिण्याकडे या एकंदर लोकांची ही पराकाष्ठेची आसक्ति पाहून, त्या आगबोटीमध्यें कलकत्त्यास जाण्यासाठीं निघालेला एक साधु होता, तो गंभीर वाणीनें त्या सर्वांना सांगूं लागला "बाबांनों! अशा रीतीनें अगदीं कंठाशीं पाणी येऊन भिडलें असतां एकट्या मृत्यूच्याच कचाट्यांतून सुटण्याचा विचार करण्यांत व्यर्थ कालक्षेप करण्यापेक्षां वेळींच सावध होऊन जन्म आणि मृत्यु या दोहोंच्याहि कचाट्यांतून सुटण्याचा यत्न केल्यास या नरदेहाचें सार्थक नाहीं का होणार? अहो! हा मृत्यु म्हणजे काय? हा जन्म आणि पुढचा जन्म यांमधील ही पायरी आहे मग याला असें घाबरून काय होणार आहे? आज या महासागरांत नाहींतरी उद्यां सुखासनावर कां होईना—परंतु जन्मलेल्या प्रत्येक प्राण्याला मृत्यु हा येणारच. मनुष्यानें या मृत्यूला चुकविण्याचा

प्रयत्न करणें म्हणजे अगदींच हास्यास्पद आहे! कित्येक प्रसंग असे येतात, कीं, त्या वेळीं हा मृत्युच काय तो मनुष्याचा खराखरा मित्र होतो—"

साधुमहाराजांच्या या वेदान्ताकडे लक्ष्य देऊन अशा आणीबाणीच्या प्रसंगीं अशा उपदेशाच्या गोष्टी ऐकून स्वस्थ बसणारीं मनुष्यें फार विरळा. त्रिदोष होऊन शेवटची घरघर लागली असली तरी देखील वैद्य झाला—आतां डॉक्टर बोलवा; 'नेटिव्ह डॉक्टर झाला—आतां तो गोरा डॉक्टर बोलवा' अशी धावाधाव आणि पळापळ करणारी मंडळीच फार. त्या बोटींतील मनुष्यांकडेच पहाना! क्षणोक्षणीं प्रचंड लाटा आपलें अक्राळविक्राळ स्वरूप अधिकाधिक व्यक्त करीत होत्या; वादळाचा जोर उत्तरोत्तर वाढत चालला होता; सूर्य केव्हांच अस्तास जाऊन जिकडेतिकडे घनघोर अंधकार पडला होता; नावाडी लोकांचे सर्व प्रयत्न व्यर्थ जाऊन ते हताश झाले होते; कोठून मदत मिळेल ही आशा करण्यासहि जागा नव्हती. सारा दिवस लाटांशीं टक्कर देऊन देऊन शेवटीं आगबोटीच्या तळाला एक मोठें भोंक पडलें होतें आणि त्यांतून जोरानें पाणी आंत येत होतें. समुद्रानें असें कांहीं उग्र स्वरूप धारण केलें होतें कीं, होड्या वगैरे टाकून आगबोटीवरील मनुष्यें वांचविण्याचा यत्न करण्याचीहि मुळींच सोय नव्हती. सर्व उपाय खुंटले, आगबोट धरून राहणें म्हणजेहि आतां घातकच झालें होतें. कारण, ती कधीं बुडी घेईल याचा मुळींच नेम नव्हता. असें पाहून शेवटीं कप्तानसाहेबांनीं होड्या खालीं सोडण्याचा हुकूम केला. त्याबरोबर त्या आज्ञाधारक खलाशांनीं आटोकाट प्रयत्न करून एक होडी तर तत्काळ खालीं लोटली. क्षणोक्षणीं खालींखालीं जाणारी ती आगबोट सोडून त्या होडींत जाण्यासाठीं सर्व उतारूंची एकच गर्दी उडाली. सर्वजण त्या लहानशा होडींत धडपड करूं लागले. हें पाहून बोटीवरील अधिकारी समोर उभे राहून सर्वांचें निवारण करूं लागले; परंतु एकदोन उतारूंनीं त्याला न जुमानतां मोठ्या निकरानें होडींत उड्या घेतल्याच. पुढें आणखी कांहीं उतरणार तोंच एक अशी भयंकर जोराची लाट आली कीं, तिच्या धक्क्यासरशीं होडीची दोरी ताडकन् तुटून होडी आगबोटीपासून क्षणार्धांत वेगळी झाली आणि त्या लाटेबरोबरच प्रचंड वेगानें पार कोठच्या कोठें वहात गेली. रात्रीची वेळ, निबिड अंधकार पडलेला, अशा वेळीं त्या होडीची काय स्थिति झाली असेल हें समजण्याला मुळींच मार्ग नव्हता. दुर्दैवी म्हणा-परंतु त्या एक दोन उतारूंखेरीज त्या होडींत कोणी खलाशी देखील

नव्हता. त्या पर्वताकार आगबोटीचा जेथें टिकाव लागला नाहीं तेथें ती इतकीशी क्षुद्र होडी काय करणार होती आणि कोठें जाणार होती, हें मुळींच सांगतां येण्याजोगें नाहीं. तींत असलेलीं मनुष्यें हा भयंकर प्रसंग पाहून मृतवत् निचेष्ट पडलीं होतीं. त्या आगबोटीवरील लोकांनांहि त्या होडीची चौकशी करण्याला दुर्दैवानें मुळींच अवकाश ठेविला नाहीं. ज्या भीषण लाटेनें ती होडी त्या आगबोटीपासून सोडवून पार कोठच्या कोठें वहात नेली, त्याच लाटेच्या तडाक्यानें हा वेळपर्यंत कसाबसा टिकाव धरून असलेली ती आगबोटहि गडप करून टाकिली; तिचा कोठें मागमूसहि दिसेनासा झाला. कोण तो भयंकर प्रसंग !

---

प्रकरण बत्तिसावें

## स्माईलसाहेबांचें औदार्य

दैवाचे खेळ मोठे विचित्र असतात. विनायकराव जिवावरच्या दुखण्यांतून उठून मोठ्या अधीरतेनें घरीं येण्यास निघाले असतां वाटेंत त्यांच्या आगबोटीनें जलसमाधि घेतली, त्याची बातमी देखील कोणास लागली नाहीं. इकडे विनायकराव घरीं येण्यास निघाल्याबद्दल तार आल्यामुळें सरस्वतीला त्या दुःखांतहि किंचित् आनंद झाला होता; परंतु तिला आनंद किंवा सुख म्हणून मुळींच कसें तें फार वेळ लाभूं नये, असा आतांपर्यंततरी तिचा दैवयोग असावासें दिसलें खरें. जगन्नाथराव आणि यमुना यांच्या संगतींत तिचे एकदोन दिवस जातात तोंच विनायकराव अस्वस्थ असल्याबद्दल स्माईलसाहेबांनीं जी प्रथम व्हाईटसाहेबांना बातमी कळविली होती, तीच बातमी घेऊन व्हाइटसाहेबांचें पत्र जगन्नाथरावांना शोधीतशोधीत तेथें येऊन दाखल झालें. ती बातमी ऐकून जगन्नाथराव फारच अस्वस्थ झाले. ती बातमी केव्हांची असावी, वगैरे चौकशी करण्याचें देखील त्यांना सुचलें नाहीं. विनायकराव इकडे यावयास निघण्याच्या तयारींत असतां एकाएकीं त्यांची प्रकृति बिघडली असली पाहिजे, आणि ज्या अर्थीं परस्पर व्हाइटसाहेबांना तार आली त्या अर्थीं ते फारच आजारी असले पाहिजेत, असा जगन्नाथरावांनीं साहजिकच आपला समज करून घेतला. विनायकरावांसाठीं त्यांचें कोमल हृदय तळमळूं लागलें. कांहीं केल्या त्यांना चैन म्हणून पडेना. आपल्या पत्नीला एकटीलाच काय तो खरा प्रकार कळवून ते तत्काल मुंबईस निघून आले; आणि 'आतां

विनायकराव कसे आहेत' म्हणून स्माइलसाहेबांना तार करून त्यांनीं विचारिलें. ब्रह्मदेशांतून मुंबईस येण्यास निघालेली एक आगबोट भयंकर वादळांत सांपडून बुडाली हें वर्तमान मुंबईस असतांनाच त्यांनीं ऐकिलें होतें; परंतु विनायकराव आजारी असल्यामुळें आजवर ते मुळीं निघालेंच नसावे, असा त्यांचा समज झाला होता, म्हणून त्या बातमीचें त्यांना फारसें कांहीं वाटलें नाहीं. तार केल्याला दोन दिवस झाले, तरी स्माइलसाहेबाकडून कांहींच उत्तर येईना, हे पाहून तर विनायकराव निघाले नाहींत इतकेंच नव्हे—तर ते फारच आजारी असले पाहिजेत, अशाबद्दल जगन्नाथरावांचा संशय दृढ झाला, आणि मग दुसरातिसरा विचार न करतां ते एकदम मोलमेन येथे जाण्यास निघाले. कलकत्त्यापर्यंत आगगाडीतून जाऊन तेथे बोटींत बसून ते मोलमेन येथे जाऊन पोहोंचलेहि. स्माईलसाहेबांचा तपास लागण्याला मुळीच वेळ लागला नाहीं. साहेबांची भेट होतांच आपला परिचय देऊन प्रथम "विनायकराव आतां कसे आहेत?" म्हणून जगन्नाथरावांनी मोठ्या उत्कंठेनें प्रश्न केला.

तो प्रश्न ऐकतांच साहेबाची उदार मुद्रा एकदम खिन्न झाली. त्यांच्या कपाळावर घर्मबिंदु दिसूं लागले. इतकी तरतूद लावून विनायकरावांना आपण घरीं पाठविण्याच्या हेतूनें ज्या आगबोटींत बसविले, ती आगबोट येथून निघाल्यापासून जी नाहींशी झाली तिची खरोखर अवस्था काय झाली होती, हें साहेबांना समजून चुकलें होतें. अर्थात्, "विनायकराव आता कसे आहेत?' या प्रश्नांचा त्यांना अर्थ कळेना. एक मोठा उसासा सोडून ते स्तब्ध बसून राहिले.

साहेब बराच वेळ कांहीं बोलत नाहींत, हें पाहून जगन्नाथराव घाबरून गेले. त्यांचा काहींतरी गैरसमज झाला आहे, हें स्माईलसाहेबांच्या लक्ष्यात आलें. स्माईलसाहेबांनी जगन्नाथरावांना फार वेळ संशयात ठेविलें नाहीं. विनायकराव आजारी पडल्यापासून घडून आलेली एकंदर हकीगत त्यांना सांगितली. विनायकराव ज्या बोटींत बसून गेले होते ती बोट एकाएकीं नाहींशी कशी झाली, पुढें ती वादळात सापडून बुडाल्याची बातमी कशी आली, वगैरे वृत्तांत स्माईलसाहेबांनीं सांगितला, आणि ते म्हणाले "अत्यंत आश्चर्याची आणि दुःखाची गोष्ट म्हटली म्हणजे त्या बोटीवरील एवढ्या मनुष्यांपैकीं एकाहि मनुष्याचा हा वेळपर्यंत पत्ता लागत नाहीं. अफाट समुद्रांत बिचाऱ्यांचा काय निभाव लागणार? मी अद्यापिहि जागोजाग तपास चालविला आहे, परंतु आशा करण्याला फारशी जागा दिसत नाहीं. ईश्वराची मर्जी!" असें म्हणून

साहेबांनीं रुमालानें डोळे पुसले आणि एका नोकराला हांक मारून त्याला जगन्नाथरावांची व्यवस्था लावण्यास सांगितलें.

ध्यानीं नाहीं मनी नाहीं, असा हा विपरीत प्रकार ऐकून जगन्नाथरावांची कंबरच खचून गेली. विनायकासाठीं ते अत्यंत शोक करूं लागले. सरस्वतीची काय दशा होईल, या दुःखद विचारानें त्यांच्या कोमल अंतःकरणाला चरके बसूं लागले–त्यांना मर्मांतक यातना होऊं लागल्या.

जगन्नाथरावांचें विनायकरावांवरील अकृत्रिम प्रेम पाहून स्माईलसाहेबांना मोठें आश्चर्य वाटलें. जगन्नाथरावांचा शोक पाहून त्यांचेंहि अतःकरण सद्गदित झालें. जगन्नाथरावांचें मोठ्या कष्टानें समाधान करून साहेब म्हणाले "विनायकरावांवर माझा फार लोभ जडला होता. या इतक्याशा अल्प अवकाशांत त्यांनीं माझा पूर्ण विश्वास संपादन केला होता. त्यांच्यासारखा व्यवहारदक्ष, बुद्धिवान् आणि प्रामाणिक मनुष्य आजवर मला आढळला नव्हता; परंतु काय करणार ! ते मला फार दिवस लाभूं नये असाच ईश्वरी नेमानेम होता—"

"विनायकराव आजारी असताना आपण त्यांच्यासाठी अगदीं पराकाष्ठा केली, पाण्यासारखा पैसा खर्च केला, असें स्वतः डॉक्टर मला सागत होते—"

"त्यांच्या प्रकृतीला तेथील हवा मुळीच मानवणार नाहीं, असें डॉक्टरांचें मत पडल्या दिवसापासून मी त्याच्यासंबंधानें कांहीं निराळयाच विचारांत होतों. मुंबईस व्यापाराची एक स्वतंत्र शाखा चालू करावी, असा फार दिवसांपासून माझा मनोदय होता; दोनतीन महिन्यांत विनायकराव चांगले बरे झाले म्हणजे त्यांच्याच देखरेखीखालीं मी ही व्यवस्था करण्याचें योजिलें होतें. परंतु काय ? आपण मनांत आणावें एक आणि ईश्वराची योजना असते भलतीच !"

बोलतांबोलतां स्माईलसाहेबांच्या नेत्रांतून सारखा अश्रुपूर वाहूं लागला. त्यांची इतकी सहृदयता पाहून त्या दुःखांतहि जगन्नाथरावांना किंचित् समाधान वाटलें; कृतज्ञतेनें त्यांचें हृदय भरून आलें. स्माईलसाहेब म्हणाले "विनायकराव दुखण्यानें पडले असतां आपणच काय ते त्यांचे खरेखरे मित्र असल्याबद्दल ते मजजवळ बोलत होते. आपण त्यांचें येथें कांहीं आहे नाहीं तें घेऊन जा. विनायकरावांनीं पांच हजारांचा आपल्या आयुष्याचा विमा उतरला होता, त्याचे हे कागदहि आपण घ्या, आणि कंपनींतून पैसे मिळविण्याचा उद्योग करून त्यांच्या निराश्रित पत्नीची कांहींतरी चांगली व्यवस्था लावा—"

जगन्नाथरावांचें अतःकरण भडभडून आलें. साहेब पुढें म्हणाले " आतां उगाच दुःख करून काय होणार आहे ? बिचाऱ्या त्या अनाथ पत्नीची काय दशा होईल या विचारानें माझें मन अस्थिर होऊन गेलें होतें. परंतु आपल्याला पाहून ती चिंता दूर झाली. आपल्यासारखा पाठीराखा असल्यावर तिला मुळींच कष्ट होणार नाहींत. पण माझी विनंती आपण मान्य केली पाहिजे. विनायकरावांच्या निराश्रित स्त्रीला कांहीं अल्पस्वल्प द्रव्यसहाय्य—"

स्माईलसाहेबांना पुढें बोलूं न देतां जगन्नाथराव मध्येच म्हणाले " साहेब, आपलें अतःकरण फार उदार आहे. विनायकरावांच्या पत्नीला आतां आणखी मदतीची अपेक्षा नाहीं. हे पांच हजार रुपये येतील; शिवाय गरज लागलीच तर मला ईश्वरानें तेवढें सामर्थ्य दिलें आहे. मी आजवर तिला आपली सख्खी बहीण मानीत आलों आहें—"

" तें मला माहीत आहे. आपले वडील मोठ्या हुद्यावर होते, ईश्वरकृपेनें आपली स्थिति फार चांगली आहे, हें सर्व मला विनायकरावाकडून समजलें आहे; परंतु त्या विचारीला मजकडून अल्पस्वल्प तरी मदत झाल्याविना माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं—"

असें म्हणून स्माईलसाहेबांनीं ते विम्याचे कागद आणि एक हजार रुपयांची नोट जगन्नाथरावांच्या हातीं दिली. साहेबांना संतुष्ट करण्याकरितां जगन्नाथरावांनींहि मग विशेषसे आढेवेढे घेतले नाहींत. विनायकरावांचें सर्व सामानसुमान घेऊन स्माईलसाहेबांना शतशः धन्यवाद देत जगन्नाथराव तेथून मोठ्या दुःखानें विनायकरावांच्या गांवीं परत येण्यास निघाले.

इकडे जगन्नाथराव एकाएकीं ब्रह्मदेशांत निघून गेल्याचें यमुनेच्या तोंडून ऐकल्यापासून दुःखानें गांजलेल्या सरस्वतीचा जीव ठिकाणावर राहिला नाहीं. " तिकडे कांहींतरी बरंवाईट असल्याविना जगूदादा उगाच घाईघाईनं इतक्या लांब कशाला गेला असता ? शिवाय, बरेच दिवसांत तिकडचं पत्र नाहीं— तसंच कांहींतरी जिवावरचं दुखणं झालं असलं पाहिजे," इत्यादि विचार सरस्वतीच्या मनांत पुनः पुनः घोळूं लागले. पतीसंबंधीं नानाप्रकारच्या अनिष्ट शंका तिच्या मनांत येऊं लागल्या. कांहींतरी अनिष्ट घडून आलें आहे, याबद्दल तिला शंकाच राहिली नाहीं; परंतु आपल्यावर ईश्वर सर्वतोपरि कोपला आहे, आकाशाची कुऱ्हाड आपल्यावर कोसळली आहे, हें त्या बिचारीच्या स्वप्नीं देखील आलें नाहीं.

जगन्नाथराव ब्रह्मदेशांतून परत आले. परंतु विनायकराव त्यांच्याबरोबर आले नाहींत, हें पाहून मात्र तिचा जीव चरकला. " तिकडे जर कांहीं अनिष्ट घडून आलं नाहीं, सर्व सुखरूप आहेत, तर मग जगूदादा बोलत कां नाहीं आल्यापासून ! त्याचं तें नेहमीचं हंसतमुख आज असं खिन्न कां ? डोळे पाण्यानं भरल्यासारखे कां दिसतात ? त्याचं शरीर असं निस्तेज कां ? चेहरा काळवंडलेला कां झाला आहे ?" अशा कितीतरी शंका त्या दुर्दैवी सरस्वतीच्या मनांत एकामागून एक येऊं लागल्या. ती मट्दिशीं खालीं बसली. तिचें मस्तक फिरूं लागले. सगळें जग तिला शून्यवत् भासूं लागलें. भोंवतालच्या सर्व वस्तु गरगर फिरत आहेत असें तिला वाटूं लागलें व जगन्नाथरावांना कांहीं विचारण्याला देखील तिला धैर्य होईना. अनिष्ट शंकांच्या दुर्धर यातनानीं ती निखालस वेडी होऊन गेली. तोंड उघडून पतीचा कुशलसमाचार विचारण्यालाहि तिचें मन धजेना. तिचा जीव थरथर कापू लागला. इतक्यांत दुर्गा जवळ होती. तिने जगन्नाथरावाना विचारिलें. " आमचे दादा खुशाल आहेत ना ?"

विचाऱ्या जगन्नाथरावांनीं काय उत्तर द्यावें ! डोळ्यांवर हात धरून ते स्तब्ध बसले होते. हृदयांत खळवळत असलेला दुःखाचा वेग त्यांनीं मोठ्या पराकाष्ठेनें आवरून धरिला होता. ते कांहींच बोलत नाहींत हें पाहून सरस्वतीच्याने रहावेना. होतें नव्हतें तेवढें अवसान आणून तिनें भीतभीत विचारिलें " दादा ! तिकडे खुशाल असायचं ना ?"

जगन्नाथरावांना अनावर हुंदका आला. रडतरडत ते तेथून उठले आणि बाहेर ओटीवर जाऊन त्यांनीं धाड्दिशीं जमिनीवर अंग टाकिलें. जगन्नाथरावांच्या कांहींएक उत्तर न देण्यानेंच सरस्वतीला तिच्या प्रश्नानें उत्तर मिळालें. तिचें हृदय दुभंग झालें. मस्तकावर जणों प्रचंड शिळाच आदळली. आधींच अशक्त झालेली, पुत्राच्या आणि आणि सासूच्या चिरवियोग दुःखाग्नीनें होरपळून गेलेली दुर्दैवी सरस्वती, संज्ञाशून्य होऊन धाड्दिशीं जमिनीवर पडली. त्या घटकेपासून ती निखालस वेडी झाली.

---

## प्रकरण तेहविसावे

## हें काय

सरस्वती खरोखरच भ्रमिष्ठासारखें करूं लागली. चारपांच दिवसांत तिनें पळीभर पाण्याला देखील स्पर्श केला नाहीं. अंगावरील सर्व दागदागिने तिनें

काढून टाकिले, शरीराची हेळसांड मांडिली, आणि दुःखातिशयानें तिला आपल्या प्राणांची यत्किंचितहि पर्वा वाटेनाशी झाली. तिची ही हृदयद्रावक स्थिति पाहून स्वतः यमुनेच्या डोळ्यांचें पाणी खळेना, मग तिनें सरस्वतीचें सांत्वन कसें करावें? सरस्वतीची अंगकांति पालटली. तिचें पूर्वीचें सौंदर्य राहिलें नाहीं. तिच्या मोहक चेहऱ्यावर सदैव विलसणारें तें मृदु मधुर हास्य पार नाहींसें झालें. तिची प्रफुल्लता लोपून गेली. सरस्वतीच्या भाषणांत आतां तें पूर्वीचें माधुर्य राहिलें नाहीं आणि ती सरलताहि राहिली नाहीं. दुसऱ्याच्या शब्दाला मान देण्यांत दिसून येणारी तिची तत्परता आणि स्वार्थत्यागबुद्धिहि आतां अंतर्धान पावली. पूर्वीचा तिचा कोमल स्वभाव पालटून तिच्या अंगी आतां उग्रता आली.

जगन्नाथरावांनीं किंवा यमुनेनें आतां एखादी गोष्ट करण्यासाठीं तिची अगदीं पाठ पुरविली तरीदेखील सरस्वती त्यांचें मुळींच ऐकत नसे. "काय म्हणून हे मी करूं?—कुणासाठीं आतां मला इतकं अगत्य राहिलं आहे?" असेंच उलट ती कांहींतरी विचारीत सुटे, आणि फार झालें म्हणजे रडूं लागे. एखादे वेळीं कोठेतरी जाऊन एकटीच रडत बसे, तर एखादे वेळी खदखदा हंसू लागे. एखादे वेळीं आपल्याशीच असें कांहीं पुटपुटूं लागे कीं, दुसऱ्या कोणाला त्यांतील एक शब्दहि कळत नसे. तिची ही बडबड ऐकून एक दिवस यमुनेनें तिला विचारलें "गंगू, तूं इतकी पुटपुटत असतेस तरी काय बाई?"

सरस्वतीला या विचारण्याचा राग आला. ती यमुनेच्या खस्कन् अंगावर येऊन म्हणाली "मला वाटेल तें मी करीन! तूं कोण ग मला विचारणार?"

"तुला काय वेड तर नाहीं ना लागलं?"

"वाहवा. मग तर फारच चांगलं!" असें म्हणून सरस्वती एकसारखी हंसत सुटली.

"काय बाई हे मांडलं आहेस तूं? जरा डोकं ठिकाणावर आण!—"

"आतां तें एकदां कायमचंच बसेल ठिकाणावर!"

"हें पहा गंगू, तूं अशी ही भलती सलती बडबड करीत जाऊं नकोस."

"कां बरं, कुणाची मला भीति लागली आहे?"

युक्तियुक्तीनें सरस्वतीला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करून यमुना म्हणाली "बाई ग, इथं आणखी दुसरींहि माणसं रहात असतात. तूं जर असे वेडेवेडे चाळे करून त्यांना त्रास देशील तर कसं बरं होईल? जरा कांहीं विचार कर–"

"चुलींत का पडत ना मेलीं! मला काय करायचं आहे त्यांच्याशीं?" सरस्वती पुनः ओरडून म्हणाली.

हें पाहून यमुनाहि किंचित् रागावल्यासारखें करून म्हणाली "तूं पुनः त्याच त्या गोष्टी बोललीस आता, तर खबरदार!"

निखालस भ्रमिष्ठ झालेली सरस्वती पूर्वीपेक्षांहि उग्रस्वरानें म्हणाली "मला वाटेल तें मी करीन—वाटेल तें बोलेन, ज्याला जें करायचं असेल तें त्यानं खुशाल करून घ्यावं! माझे आतां कोण डोकं मारणार आहे? आहे कोण मुळीं आता माझं! मला ग आतां कुणाचं भय आलं आहे?" असें म्हणत ती एकसारखी रडूं लागली.

यमुना, अन्नपूर्णाबाई किंवा जगन्नाथराव यांना कोणालाहि तिची समजूत घालतां येईना.

दिवसेंदिवस सरस्वतीला संसाराचा अगदींच वीट येऊं लागला. कोणत्याहि गोष्टीविषयी तिला काळजी वाटेनाशी झाली. कोणत्याहि कामाची आवड किंवा आसक्ति अशी तिला मुळींच राहिली नाहीं, किंवा कोणत्याहि गोष्टींत तिचा आग्रह राहिला नाहीं. दिवसांमागून दिवस जाऊं लागले, परंतु सरस्वतीच्या अवस्थेंत काहीं फरक म्हणून पडेना. तिची बुद्धि कांहीं केल्या ताळ्यावर येईना. जळालेल्या घरासंबंधीं ह्या वेळपर्यंत कांहींच करतां आलें नाहीं. नवे घर बांधावे असा जगन्नाथरावांचा हेतु होता. परंतु सरस्वती कांहीं केल्या त्या गोष्टीला कबूल होईना. ती म्हणे "मला आतां घर हवं कशाला? कुणाला घेऊन मी त्या घरांत बसूं?"

जगन्नाथरावांनी फारच आग्रह धरिला. यमुना आणि अन्नपूर्णाबाईहि तिचे मन वळवूं लागल्या. तेव्हां वेड्यासारखी ती रडतरडत म्हणाली "हं, बांधा, खुशाल घर बांधा, पण मी म्हणून कांहीं त्यांत पाय टाकणार नाहीं! ज्या घरांत माझ्या सासूबाई जळून मेल्या, ज्या घरांत माझा केशव मला सोडून गेला, तें घर जरी सोन्यानं मढवून काढलं, तरीदिखील मी म्हणून आतां त्यांत पाय ठेवायची नाहीं!"

तिचें समाधान करून जगन्नाथराव म्हणाले "गंगू, माझें ऐक. मला तूं आपला सख्खा भाऊ समजतेस ना? माझ्या बोलण्याकडे लक्ष्य दे. हें घर तयार होऊं दे, मग तुला आवडत नसेल तर तूं त्यांत राहू नकोस. कुणीहि तुला आग्रह करणार नाहीं. इथं एक लहानशी बंगली बांधून त्यांत तूं रहा!"

सरस्वती रडतरडत म्हणाली " दादा ! मला आतां कशाला एवढं मोठं घर पाहिजे ? आणि माझ्यासाठी तूं एवढी काळजी तरी कां करतोस ! आणखी निराळी बंगली बांधण्यांत कशाला पैसा खर्च करतोस ?";

" पण मी आपल्या पदरचे कुठें पैसे खर्च करतों आहे ? विनायकरावांच्या विम्याचे पांच हजार रुपये येतील, त्यांतून हा सगळा खर्च होईल. या शिवाय त्याच्या साहेबानें तुला हजार रुपये दिले आहेत."

सरस्वती आणि यमुना दोघीहि हें ऐकून रडूं लागल्या. सरस्वती नको नको म्हणत असतांहि घराचें काम सुरू झालें. निराळी बंगली मात्र सरस्वतीनें कांहीं केल्या बांधूं दिली नाहीं. कांहीं दिवसांनीं जगन्नाथराव घरीं जाण्यास निघाले. जातांना ते यमुनेला म्हणाले " मला आतां एकवार घरीं गेलेंच पाहिजे. तूं आणखी कांहीं दिवस इथें रहा; मग पुढें काय करायचें तें मी कळवीन."

" हें मात्र चांगलं ! मी काय करूं इथं एकटी राहून ?"

यमुना प्रथम असें म्हणाली खरी, परंतु जगन्नाथरावांचा विशेष आग्रह पाहून ती त्या गोष्टीला शेवटीं कबूल झाली. त्याच दिवशीं जगन्नाथराव सरस्वतीचें नाना प्रकारें सांत्वन करून तिला सर्वांसमक्ष म्हणाले "हें पहा गंगू, उगाच असा शोक करून आपल्या जिवाला कष्ट करून घेऊं नकोस. हे सगळे दैवाचे खेळ आहेत. होणेंजाणें कांहीं कुणाच्या हातीं नाहीं. तूं गरोदर आहेस, अशी खाल्ल्याजेवल्याविना शरीराला आळवून अष्टौप्रहर शोक करीत बसलीस, तर तुझ्या गर्भाला अनिष्ट होईल. मला उद्यां घरीं गेलेंच पाहिजे; फार जरूरीचें काम आहे. आणखी तुला एक सांगायचें आहे, कीं, तुझ्या नवऱ्यानें पांच हजाराला आपल्या आयुष्याचा विमा उतरला होता त्याबद्दलचे हे कागद आहेत; हे तूं आपल्याजवळ ठेव. मीं परत आलों म्हणजे मग त्याची काय ती व्यवस्था करीन. शिवाय साहेबानें तुला हजार रुपये दिले आहेत, ते निराळे आहेत."

असें म्हणून जगन्नाथरावांनीं ते कागद सरस्वतीच्या पुढें ठेविले. सरस्वतीचे डोळे अश्रूंनीं भरून आले. ती सद्गदित कंठानें म्हणाली " हे कागद घेऊन मीं काय करूं ? रहातना का ते तुझ्याजवळ ?"

" छे ! असें वेड्यासारखें करूं नको. हे तुझ्याजवळ असलेले बरे. ते तूं घेत नाहींस मग कोण घेणार ?"

"माझे आहेत ना? घेतें तर मग मी. पण दादा, मी याचं काय पाहिजे तें करीन बरं!"

"अगदीं तुझ्या मनांत येईल तें कर, मग तर झाले ना?"

"वा, मग काय!" असें म्हणून सरस्वतीनें ते विम्याचे कागद आपल्या हातांत घेतले आणि क्षणार्धांत फाडूनफाडून त्यांचे तुकडे केले!

"हें काय?" असे म्हणून जगन्नाथराव तिचें निवारण करितात तोच उठून ती चुलीशीं गेली आणि ते तुकडे तिनें चोळामेळा करून विस्तवांत टाकून दिले.

---

## प्रकरण चौतिसावें

## वाळ कुठं गेलं

यमुना आणि अन्नपूर्णाबाई या दोघींवर सरस्वतीला जपण्यासवरण्याचे सोंपवून जगन्नाथराव आपल्या गांवीं निघून गेले. सरस्वतीचा भ्रमिष्टपणा दिवसेदिवस अधिकाधिक वाढत होता.

दोन प्रहर रात्र होऊन गेली होती. जिकडे तिकडे सामसूम झाले होतें. परंतु या अशा वेळीं देखील हतभागिनी सरस्वतीच्या डोळ्यांना झोंप म्हणून कशी ती माहीत नव्हती. फार दिवसांनीं आज किंचित् गुंगी आल्यासारखे तिला वाटूं लागलें आणि त्याच अवस्थेत तिला एक स्वप्न पडलें. तिला वाटलें "विनायकराव केशवाला घेऊन उभे आहेत; सासूबाई जवळ बसून माळेचे मणी ओढीत आहेत; विनायकरावांच्या कडेवरून आजीकडे जाण्यासाठीं केशव हंसतहंसत उड्या घेत आहे, परंतु विनायकराव त्याला कांहीं केल्या खालीं उतरूं देईनात—"

हें स्वप्न पाहून सरस्वती बिछान्यावर उठून बसली आणि डोळे चोळून समोर पाहूं लागली. अर्थात्, तिला येथें कांहीएक दिसलें नाहीं. त्याबरोबर "गेले–मला टाकून गेले–!" अशी एकदम किंकाळी फोडून तिनें बिछान्यावर लोळण घेतली. आज सरस्वतीच्या शोकसागराला पुनः अनावर भरतें आलें. बांध फुटून गेला असतां पाण्याचा प्रवाह जसा प्रबल वेगानें बाहेर पडतो, तद्वत् आज तिचा शोकप्रवाह उसळूं लागला. त्या घोर रात्रीच्या वेळीं तिचा हृदयविदारक आक्रोश ऐकून सर्व मंडळी जागी झाली. आपल्या आक्रोशानें या सर्वांची झोंपमोड झाली हें पाहून त्या तशाच शोचनीय स्थितींतहि सरस्वती ओशाळी झाली आणि आपला शोक आवरून निजल्याचें सोंग

घेऊन ती पडून राहिली. त्याबरोबर सर्वांना वाटलें कीं, ही आतां थकून स्वस्थ पडली आहे. परंतु त्यावेळीं जर कोणाला तिच्या अंतःकरणांत प्रवेश करतां आला असता, तर दुःसह शोकाग्नीनें तिचें हृदय आंतल्याआंत कसें दग्ध होऊन जात होतें तें त्याला स्पष्टपणें दिसून आलें असतें. यमुना आणि अन्नपूर्णाबाई यांनीं अशा अपरात्रीं पुनः पुनः शोक करीत उठण्याचें कारण काय, म्हणून तिला परोपरीनें विचारलें; परंतु सरस्वतीनें मुळींच उत्तर दिलें नाहीं. सरस्वतीच्या मनांत आज नानातऱ्हेचे विचारतरंग येत होते, आणि तिला आपल्या जिवाचें कांहींतरी करावे, असें राहूनराहून वाटत होतें. दुसरे दिवशीं अगदीं सकाळच्या प्रहरीं उठून ती अन्नपूर्णाबाईजवळ गेली. अन्नपूर्णाबाई नुकत्याच उठून बाहेर येत होत्या; गोविंदराव आणि दोघीहि मुली अद्यापि निजलेल्याच होत्या. आपल्या जाऊचा हात सरस्वतीनें घट्ट धरिला आणि म्हणाली " जाऊबाई, आज माझी एक गोष्ट तुम्हाला ऐकिलीच पाहिजे—"

सरस्वतीच्या दुःखानें अन्नपूर्णाबाईचें हृदय आतां कळवळून येत असे. तिचें दुःख अंशतः तरी दूर करून आपल्या पूर्वकृत्यांबद्दल प्रायश्चित्त घेण्यासाठीं अन्नपूर्णाबाई आतां अगदी उत्सुक असत. तेव्हां त्या मनोभावानें म्हणाल्या " कसली गोष्ट बाई ?"

" तें मग, पहिल्यानं ऐकाल असं कबूल करा."

" सरस्वती ! तुला वाटतं का, मी तुझं ऐकणार नाहीं असं ?"

" तर मग जरा उभ्या रहा हो—"

असें म्हणून ती घरांत जाऊन एक ल्हानशी जस्ताची पेटी घेऊन आली आणि म्हणाली "हे माझे दागिने तुम्ही घ्या, नाहीं म्हणूं नका. तुमच्या मुली मोठ्या झाल्या कीं नाहीं, म्हणजे त्यांना हे द्या बरं ! हं घ्याच, माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला !"

" हें काय वेड्यासारखं करतेस बाई तूं !" असें म्हणून अन्नपूर्णाबाई बाजूला झाल्या. ज्या अन्नपूर्णाबाईंनीं एके वेळीं आपल्या अज्ञान मुलीकडून सरस्वतीची नथीची डबी विहिरींत फेकून देवविली होती, ज्या अन्नपूर्णाबाईंनीं पूर्वी सरस्वतीला देववेल तितका त्रास देण्याला मुळींच कमी केलें नव्हतें त्याच अन्नपूर्णाबाईचें अंतःकरण आज पालटून गेलें होतें. आज त्यांच्या अंतःकरणांत सुविचाराचा उदय झाला होता आणि म्हणूनच फक्त एक नथच नव्हे तर आपले एकंदर बहुमोल दागिने सरस्वती आपण होऊन देण्यास सिद्ध झाली

असतांहि त्यांनीं ते घेतले नाहींत. त्या म्हणाल्या "छे! सरस्वती, नको बाई तूं असं वेड्यासारखं करूं! अग, देवानंच तुझ्या दुःखाचा कडेलोट केला आहे, तोच तुला यांतून मुक्त करील. आई जगदंबेच्या आशीर्वादानं तुला मुलगा होऊन तूं हातींपायीं सुखरूप सुटलीस म्हणजे हें दुःख कांहीं कमी होईल, आणि शिवाय विनू भावजी त्या आगबोटीतून कदाचित् वांचले नसतील म्हणून तरी कुणीं सांगावं!"

सरस्वती रागावल्यासारखें करून मोठ्यानें ओरडून म्हणाली "हो हो! आतां लवकरच माझं दुःख समूळ नाहींसं होईल. पण तें या जन्मीं मात्र नव्हे हो!"

इतकं बोलून ती स्तब्ध राहिली. तिच्या दुःखमग्न अंतःकरणांत नाना तऱ्हेच्या दुर्धर विचारांनीं काहूर उठविलें.

"आई जगदंबेला खरोखरच तुझी करुणा येईल वरं. अग आजच कांहीं धर्म या पृथ्वींतून गेला नाहीं!"

"अगदींच खोटं! आतां धर्म राहिला नाहीं आणि देवहि पण राहिला नाहीं. देव असता, धर्म असता, तर जाऊबाई, असं अगदीच माझं कपाळ कसं हो फुटतं—"

सरस्वती ढळढळ रडूं लागली. अन्नपूर्णाबाईचें अंतःकरणहि सद्गदित झालें. सरस्वतीचें अश्रु आपल्या पदरानें पुसून काढून तिला पोटाशीं धरून त्या म्हणाल्या "सरस्वती, मी तुझी बहीण नव्हे का? तर मग माझं ऐक. जरा स्थिर हो—"

"अगोदर तुम्ही माझं ऐका, मग तुम्ही काय सांगाल तें मी ऐकेन—"

"बरं आहे बाई! ऐकत्यें मी तुझं, मग तर झालं ना? सांग पाहूं काय सांगत्येस तें?

"दुसरं कांहीं नाहीं; हे दागिने घ्या आणि वारू अन् गंगू मोठ्या झाल्या म्हणजे त्याना हे द्या. आणखी एक काम—"

ती दागिन्यांची पेटी हातांत घेऊन अन्नपूर्णाबाईनीं सद्गदित स्वरानें विचारलें "आणखी काय राहिलं आहे बाई?"

"आणखी एक माझं काम करा. आज कसं तरी करून रामूला मजजवळ आणून द्या. पण त्याच्या आईला कळूं देऊं नका हो! नाहीं तर त्या पोराला मारून त्याचा खून करायलाहि चुकायच्या नाहींत त्या!"

सरस्वती डोळ्यांवर पदर धरून रडूं लागली. अन्नपूर्णाबाईनीं पुनः तिचे अश्रु पुसून काढिले आणि तिचें समाधान केलें. त्याच दिवशीं दोन प्रहरीं

त्यांनीं रामूला आणून सरस्वतीच्या स्वाधीन केला. त्याला मांडीवर घेऊन सरस्वती डोळ्यांवर पदर धरून रडूं लागली. किती दिवसांनीं तरी रामूला आज धाकट्या काकीच्या मांडीवर बसायला मिळालें होतें; परंतु काकी रडते आहे असें पाहून त्या अज्ञान बालकानें आपल्या मिष्टस्वरानें विचारलें " तूं रडतेस कां काकी?"

आपले अश्रु पुसून काढून सरस्वती म्हणाली " कोण! मी? मी नाहीं रडत."

" तूं रडलीस कीं नाहीं, तर मी नाहीं बसणार तुझ्या मांडीवर जा!"

" नाहीं, मी रडत नाहीं," असें म्हणून सरस्वती चूप राहिली. घरांतून साखरेचा एक खडा आणून तिनें त्याच्या तोंडांत घातला. डोळ्यांतून अश्रु निघून ते तिच्या गालावरून वहात होते. अंतःकरणांत एकामागून एक विचार-तरंग येत होते. रामूच्या तोंडाकडे पहातांपहातां केशवाचें मनमोहक मुखकमल तिच्या दृष्टीपुढें उभें राहिलें आणि त्याबरोबर तिला दुःखाचा अनावर हुंदका आला. मृत्यूशिवाय या अपार दुःखांतून आपली सुटका व्हावयाची नाहीं, असा तिच्या मनाचा पक्का निर्धार झाला. बऱ्याच वेळानें ती सद्गदित स्वरानें म्हणाली " रामू!"

रामू तोंड फिरवून आपल्या काकीच्या तोंडाकडे पाहूं लागला. सरस्वती रडतरडत म्हणाली " रामू बाळ—"

इतके बोलून ती पुनः थांबली. हें पाहून रामूनें विचारिलें " काय काकी?"

" तूं चांगला विद्याभ्यास कर बरं! कुणाचं वाईट करूं नकोस, दुष्टपणा सोडून दे—"

बोलताबोलतां ती पुनः मोठमोठ्यानें रडूं लागली. हें पाहून रामू म्हणाला " तूं रडतेस कां काकी, तुझ्या पोटांत का दुखत आहे?"

तो अज्ञान मुलगा नाना तऱ्हेचे प्रश्न करू लागला; परंतु सरस्वती कांहीं-एक बोलली नाहीं. शेवटीं रामूनें अगदींच अधीर होऊन विचारिलें " काय ग काकी! तुझं बाळ कुठं गेलं?

दुर्दैवी सरस्वतीनें मस्तकावर हात ठेविला आणि " कुठं बरं माझं बाळ गेलं!" असें म्हणून ती विचार करीत बसली.

---

## प्रकरण पस्तिसावें
## आत्महत्या कीं वंशच्छेद

शोकानें, दुःखानें आणि गतगोष्टींच्या मर्मांतक स्मृतीनें अधीर होऊन दुर्दैवी सरस्वतीनें कांहींतरी करून प्राणत्याग करण्याचा निर्धार केला. मृत्यूचा भयंकर विचार करीतकरीत ती अन्नपूर्णाबाईपाशीं गेली. तिची ती भयानक मुद्रा पाहून अन्नपूर्णाबाई घाबरून विचारूं लागल्या "सरस्वती, आज तूं अशी का दिसतेस ?"

भ्रमिष्ठ झालेल्या सरस्वतीनें यावर उत्तर न देतां घाईघाईनें विचारिलें "जाऊबाई ! तुमचं माझं आज शेवटचं बोलणं—"

"शेवटचं बोलणं ! छे, छे, असे अमंगळ शब्द तोंडावाटे उच्चारूं देखील नकोस !"

"बरं तर, मग नाहीं बोलत मी तुमच्याजवळ." असें म्हणून सरस्वती तेथून जाऊं लागली. तिची ती निश्चयी मुद्रा पाहून अन्नपूर्णाबाई भयभीत झाल्या, आणि मागून जाऊन त्यांनीं तिचा पदर धरून तिला थांबविलें. त्य सद्गदित स्वरानें हळुहळू म्हणाल्या "सरस्वती, तूं अशी भ्रमिष्टासारखं करूं नकोस—माझं ऐक तुझे दागिने घेतले म्हणजे तूं माझं ऐकशील, असं काल नाहीं का कबूल केलंस ? मीं तुझं ऐकलं, तूं माझं ऐकलं पाहिजे. तूं आजवर कधींहि खोटं बोलली नाहींस. मग ऐकणार कीं नाही माझं ?"

"काय—?" सरस्वतीनें घाईघाईनें विचारिलें.

अन्नपूर्णाबाईनीं सरस्वतीचा हात धरिला आणि म्हटलें "पण तू ऐकशील ना ?"

"हो, ऐकेन."

"तर मग तुझ्या मनांत काय आहे तें मला उघड करून सांग पाहूं ?"

"माझ्या मनांत ! माझ्या मनांत हो काय असायचं ?"

"मग तूं असं काय मांडलं आहेस? खात नाहीस, पीत नाहींस, रात्रंदिवस चौवीस तास उपास करतेस, कधी शिकस्तीनं जेवायला बसलीस तर कसेतरी चारदोन घांस खाल्ले न खाल्लेसे करतेस आणि अष्टौप्रहर आपली कांहींतरी चिंता करीत बसतेस ! या तुझ्या शरीराकडे पहा, कोण दुर्दशा झाली आहे ती! ते पांच हजारांचे कागद फाडूनतोडून चुलींत टाकलेस आणि त्या बिचाऱ्या साहेबानं दिलेल्या पैशांची तशी वाट लावून टाकलीस–हें तूं मांडलं आहेस तरी काय बाई ? कांहीं विचार कर."

येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे कीं, रमाईलसाहेबांनीं दिलेले हजार रुपये सरस्वतीनें जगन्नाथरावांच्या हवालीं करून त्यांना ते आंधळेपांगळे, अनाथअपंग आणि त्याचप्रमाणें मातृपितृहीन मुलें यांना वांटून देण्यास सांगितलें होतें.

अन्नपूर्णाबाईचें हें बोलणें ऐकून सरस्वती गरगर डोळे फिरवून कर्कश स्वरानें म्हणाली " जावो-चुलींत पडो-मला आतां या शरीराशीं आणि त्या पैशाशीं करायचं आहे काय ! माझं आतां सगळं आटोपलं—"

अन्नपूर्णाबाई कातरस्वरानें म्हणाल्या " सरस्वती, असं करूं नकोस. काय तुझ्या मनांत असेल तें मला स्पष्ट सांग. असा त्रागा करणं चांगलं नाहीं !"

सरस्वतीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिच्या डोळयांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. अन्नपूर्णाबाईनीं तिला पोटाशीं धरिली आणि तिचे अश्रु पुसून करुणाव्यंजक स्वरानें त्या म्हणाल्या " मजजवळ कांहीं सांगायला तुझा मजवर मुळीं विश्वासच नाहीं, असं दिसतं. कसा बाई विश्वास असावा? मीं कितीतरी तुझं अनिष्ट केलं आहे, कितीतरी तुझा छळ केला आहे; दुष्ट लोकांच्या नादाला लागून मीं तुला किती वेळा नाहींनाहीं त्या शिव्याहि दिल्या आहेत. आमच्यामुळ तर तुझा हा सर्वस्वी नाश झाला–आम्ही जर चांगल्या मार्गानें चाललो असतों तर विनू भावोजी कशाला बरं घर सोडून गेले असते? अन् मग हा दुष्ट प्रसंग तरी तुजवर कशाला ओढवला असता? काय काय या पातकाचीं फळं आम्हांला भोगावीं लागतील, तीं त्या नारायणालाच माहीत—"

अन्नपूर्णाबाई ढळढळ रडूं लागल्या. गतगोष्टी मनांत येऊन अनुतापानें त्यांचें हृदय जळूं लागलें. सरस्वतीहि रडत होती. ती म्हणाली " भलतंच कांहींतरी ! तुमचा काय त्यात अपराध जाऊबाई? अदृष्टांत असेल तसंच व्हायचं, त्याच्यापुढं का कुणाला जाता यायचं आहे? काय म्हणतां तुमच्या-वर माझा विश्वास नाहीं? तुम्ही या विपत्तीत जें माझं साहाय्य केलंत तें मी इतक्यांतच का विसरलें? ज्या दिवशी घरदार जळून राखरांगोळी झाली, त्या दिवशीं तुम्हीच आम्हांला वांचवलंत, तुमच्याच घरांत आम्हांला डोक टेकायला आधार मिळाला. माझा सोन्यासारखा केशव-सासूबाई तुमच्या घरांत—"

सरस्वतीचा गळा दाटून आला. दोघीहि रडूं लागल्या. सांत्वन करायला जवळ कोणीच नव्हतें, दोघीहि बराच वेळ रुदन करीत होत्या. नंतर सरस्वती वेड्यासारखी कर्कश स्वरानें म्हणाली " तुमचा मला विश्वास येणार नाहीं,

मग येईल तरी कुणाचा ? मला सख्खी बहीण नव्हती, ती घर जळलं त्या दिवशीं मिळाली, मग तुमच्यावर माझा कां बरं विश्वास नसेल ?"

अन्नपूर्णाबाईचें हृदय आज शोकानें आणि अनुतापानें भरून गेलें होतें. सरस्वतीचें हें भाषण ऐकून तर तें अधिकच भडभडून आलें पूर्वीपेक्षांहि अधिक दुःखानें त्या रडूं लागल्या. सरस्वती आपले डोळे पुसून किंचित् मृदु स्वरानें म्हणाली "माझ्या मनांत काय आहे तें तुम्हाला ऐकायचं आहे ना ? ऐका तर मग. पण कुणाजवळ बोलतां कामा नये बरं ! यमूजवळसुद्धां बोलतां नये—"

अन्नपूर्णाबाई अश्रुपूर्ण नेत्रांनीं सरस्वतीकडे पाहूं लागल्या. सरस्वती सद्गदित स्वरानें म्हणाली " जाऊबाई ! माझ्या मनांत काय आहे, तुम्हांला सांगूं का ? काय बरं असणार आतां माझ्या मनांत ? माझं कपाळ नि दुसरं काय ! आतांपर्यंत मीं पुष्कळ धीर धरला; पण आतां कांहीं माझ्यानं या यातना सहन करवत नाहींत. म्हणून मीं असा बेत केला आहे–जाऊबाई, मी आतां कुणाचं ऐकायची नाहीं आणि कुणाला जुमानायचीहि नाहीं–आजच्या दिवसांत मी आपल्या जिवाचं कांहींतरी करणार. मनुष्य मेलं सोशीलसोशील तरी कुठवर—"

सरस्वती स्तब्ध राहिली. तिचें हें बोलणें ऐकून अन्नपूर्णाबाई कपाळावर हात भरून खालीं बसल्या. त्यांचे डोकें फिरूं लागलें. रडतरडत सरस्वतीचे दोन्ही हात आपल्या हातांत धरून त्या म्हणाल्या " नको ग बाई असे अभद्र शब्द तोंडानं उच्चारूं ! ज्यानं तुम्हाला या अपार दुःखांत लोटलं आहे, तोच देव तुम्हाला यांतूनहि चांगले दिवस दाखवील. आणि इतकंहि करून तूं माझं ऐकलं नाहींस तर मीदिखील तुझ्या मागोमाग विहिरींत उडी घेतल्याविना रहायची नाहीं, हें मी तुझ्या गळ्यावर हात ठेवून सांगत्यें !"

" म्हणजे ! पण जाऊबाई, तुम्हाला असं कोणतं दुःख झालं आहे !" सरस्वती चपापली.

" तूं आमची माया तोडून जाणार मग मला तरी करायचं आहे काय जगून ? माझीं मुलं तुझीं मुलं नव्हत का ? बाळूला अन् गंगूला दोघांनाहि मीं तुला दिल्या—तूं आजपासून त्यांची आई, जाणार का त्यांना तूं टाकून ? त्यांच्याबद्दल तुला कांहींच का मायाममता वाटत नाहीं ?"

" त्यांना पहातांच तर मी वेडी होत्यें अन् मला जीवदिखील अगदीं नकोसा होतो. तरी पण जाऊबाई, तुम्ही त्यांना आपल्या हातानं एकवार माझ्याजवळ द्या."

इतक्यांत गंगू धांवतधांवत आईजवळ आली आणि आई रडत आहे असें पाहून तिच्या गळ्यांत मिठी मारून आपणहि रडूं लागली. अन्नपूर्णाबाईनीं तिला उचलून सरस्वतीच्या मांडीवर बसविली आणि त्या रडक्या स्वरानें म्हणाल्या "ही माझी गंगू तुला दिली आहे, आतां तुला काय वाटेल तें कर."

गंगूच्या अश्रुपूर्ण मुखकमलाचें सरस्वतीनें रडतरडत चुंबन घेतलें. स्नेह-रसानें तिचे हृदय भरून गेलें. आत्महत्त्या करण्याचा तिचा निश्चय डळमळूं लागला. इतक्यांत अन्नपूर्णाबाई कांहीं विचार करून संथपणें म्हणाल्या "आणि सरस्वती ! तूं गरोदर आहेस ही गोष्ट तूं अगदींच विसरलीस वाटतं ? तूं आत्महत्त्या केलीस तर आत्महत्त्येचं आणि त्याबरोबर बालहत्त्येचं घोर पातकहि तुझ्या मस्तकावर बसेल. तुझ्या पतीचा तूं अशा रीतीनं वंशच्छेद का करणार ?"

"पतीचा वंशच्छेद ! मला यातना होतात म्हणून मी पतीचा वंशच्छेद करायला प्रवृत्त होऊं ? छे छे ! खरोखर मी वेडी झाल्यें आहें ! अं हं ! एव्हांशीं माझ्या जिवाचं काहीं करायला मला अधिकार नाहीं—"

पतीचा वंशच्छेद करण्याचें पातक करण्यास सरस्वतीचें मन घेईना. आत्म-हत्त्या करण्याचा संकल्प मग तिनें सोडून दिला.

---

प्रकरण छत्तिसावें

## पापाचा घडा भरला

सरस्वतीवर एकामागून एक कोसळलेलीं दुःखें आणि संकटें पाहून विठ्ठल-रावांच्या पाषाणहृदयांत देखील दयेचा किंचित् संचार होऊं लागला होता; परंतु इतक्यांत त्यांना समजलें कीं, सरस्वतीसाठीं विनायकानें पांच हजार रुपये ठेविले आहेत, त्याबरोबर त्यांनीं पुनः पूर्वस्वरूप धारण केलें. आपल्याला सर्व स्थावर मिळकत मिळावी अशा अर्थाचें एक खोटें मृत्युपत्र विठ्ठलरावांनीं तयार करून ठेविल्याचें वाचकांच्या स्मरणांत असेलच. तें मृत्युपत्र आतां पुढें आणण्याला ते अधीर झाले विनायकराव मरून गेले. त्यांना एक मुलगा झाला होता. तोहि त्यांच्या अगोदरच आटोपला, सरस्वतीला तर वेड लागलें होतें. गोविंदराव जरी हल्लीं विठ्ठलरावांच्या तंत्रानें चालत नव्हते, तथापि ते त्यांच्या विरुद्धहि नव्हते, त्याचें तोंड बंद करणें फारसें अवघड नव्हतें. तेव्हां तें मृत्युपत्र बाहेर काढण्याला हीच संधि होती. पुनः असा सुयोग यावयाचा नाहीं, कारण सरस्वती गरोदर होती हें त्यांना माहीत होतें. कर्मधर्मसंयोगानें

तिला मुलगाच झाला, तर पुनः एक नसतें लचांड उपस्थित व्हावयाचें. गांवातील उपद्व्यापी मंडळी त्या मुलाचा पक्ष घेऊन उठावयाची. तेव्हां तावडतोब काय तो त्या मृत्युपत्राचा निकाल लावून घ्यावा, असा विठ्ठलरावांनीं संकल्प केला. वकिलांचा सल्ला घेऊन त्यांनीं हें मृत्युपत्र बाहेर आणण्याला निराळीच युक्ति लढविली. जमिनीच्या मक्त्याच्या बाकीसाठीं त्यांनीं एका कुळावर दिवाणींत फिर्याद मांडिली. कूळ बाकी देण्यास कबूल होतें; परंतु एकट्या विठ्ठलरावांनाच ती देण्याचें त्यानें साफ नाकारिलें. त्याचें म्हणणें असें पडलें कीं, विठ्ठलरावांना एकट्यालाच या बाबतींत फिर्याद करण्याचा अधिकार नाहीं. गोविंदराव आणि विनायकरावांची स्त्री यांचाहि यात भाग आहे. त्याबरोबर विठ्ठलरावांनीं आपला हक्क स्थापन करण्याकरितां तें मृत्युपत्र कोर्टात दाखल केलें. या मृत्युपत्राची बातमी अर्थातच तत्काळ चोहोंकडे पसरली. आस्तेआस्ते ती जगन्नाथरावांच्याहि कानांवर गेली. जगन्नाथराव या वेळीं कांहीं अत्यंत जरूरीच्या कामांत गुंतले होते; परंतु सरस्वतीचें निष्कारण नुकसान होऊं देऊं नये आणि दुष्टबुद्धि विठ्ठलरावांना चांगली शिक्षा लावावी, अशा विचारानें ते क्षणाचाहि विलंब न करतां निघून आले आणि तें मृत्युपत्र खोटें असल्याचें सिद्ध करण्यासाठीं पुरावा गोळा करूं लागले. हें पाहून विठ्ठलरावांचा थरकांप झाला.

इकडे विठ्ठलरावांच्या दुर्वर्तनामुळें गांवांत कोणीहि त्यांच्या वऱ्यावर नव्हतें. कोणीहि त्यांना मदत करण्यास पुढें येण्याजोगें नव्हतें. यांच्यामुळें विनायकराव आपला देश सोडून परदेशीं गेले आणि बिचारे प्राणास मुकले. विनायकरावांच्या घराला आग लावून त्यांचा लहान मुलगा आणि सगुणाबाई यांचा अंत व्हावयाला कारणहि हाच मांग, या गोष्टी आतां सर्वतोमुखीं झाल्या होत्या. इतक्यांत आणखी हें खोटे मृत्युपत्र तयार करून गोविंदराव आणि ती बिचारी दुर्दैवी सरस्वती या दोघांनाहि अजिबात ठकविण्याची विठ्ठलरावांनीं मसलत चालविली आहे, ही बातमी गांवांत पसरली, त्याबरोबर सर्व लोक त्यांच्या विरुद्ध उठले. घरीदारी, रस्त्यांतबाजारांत, देवळांतरावळांत हाच विषय निघूं लागला. सर्वजण विठ्ठलरावांना लबाड, आपमतलबी, निर्दय, राक्षस म्हणून शिव्या देऊं लागले. "प्रत्यक्ष आपल्या भावाच्या आणि आईच्या जिवावर जो उठला, तो आणखी काय करणार नाहीं!" असें जो तो उघडउघड म्हणूं लागला. "जगन्नाथरावांनीं जेव्हां मनावर घेतलें आहे तेव्हां आतां स्वारीचे

बारा वाजल्याशिवाय रहात नाहींत. आतां खात्रीनें कडीतोडे हातापायांत पडणार!" असें देखील कित्येक उघडउघड बोलूं लागले.

विठ्ठलरावांच्या तर्फे साक्ष देण्यास कोणीच प्रतिष्ठित साक्षीदार पुढें आला नाहीं. उलट, जगन्नाथरावांनीं अगदीं भरपूर पुरावा देऊन असें सिद्ध केलें कीं, "ज्या दिवशीं, मृत्युपत्रावर जनार्दनपंतांची सही झाल्याबद्दलचें विठ्ठलराव म्हणतात त्या दिवशीं, त्याच्या आधल्या दिवशीं किंवा त्याच्या दुसरे दिवशींहि जनार्दनपंत येथे मुळींच नव्हते. त्या तारखेला रत्नागिरी कोर्टांत त्यांची साक्ष झालेली आहे. येथून रत्नागिरीस जाण्याला निदान दोन दिवसतरी लागतात. अर्थात् जनार्दनपंत, त्या दिवशीं येथे नव्हते आणि या मृत्युपत्रावर त्यांनीं सहीहि केलेली नाहीं. शिवाय, असें मृत्युपत्र त्यांच्याकडून होण्याचा मुळींच संभव नाहीं. विठ्ठलरावाविषयीं जनार्दनपंतांना यत्किंचितहि आदर नव्हता. विठ्ठलरावांच्या निंद्य वर्तनामुळें जनार्दनपंतांनीं त्यांना घरांतून काढून लाविलें होतें—"

कोर्टाला विठ्ठलरावांचा फार राग आला. त्यांना एकट्याला अशी फिर्याद करण्याचा हक्क नाहीं असें ठरवून त्यांचा दावा काढून टाकण्यांत आला आणि खोटें मृत्युपत्र तयार केल्याबद्दल त्यांच्यावर फौजदारींत खटला करण्याविषयीं रुकार देण्यांत आला.

---

प्रकरण सदतिसावें

## खोट्याच्या कपाळीं गोटा

विठ्ठलरावांवर फौजदारींत खटला होणार, हें ऐकून सर्वांना मोठा संतोष झाला. त्यांनीं आजवर पुष्कळांना सर्वस्वी बुडविलें होतें, पुष्कळांना छळलें होतें. अडचणीच्या प्रसंगी दिलेल्या पांच रुपये कर्जाबद्दल पन्नास रुपये व्याज खाऊनहि मुद्दल रकमेसाठीं त्यांनीं आजवर कितीतरी गरीबगुरिबांच्या घरादारांचें लिलांव करून टाकिलें होतें. कित्येकांना तर खोटेच निवाडे मिळवून त्यांनीं नागविलें होतें. तेव्हां ते स्वतः आज कचाटांत सांपडलेले पाहून सर्वांना अर्थातच संतोष झाला. विठ्ठलराव संकटांत पडलेले पाहून त्या गांवांतील किंवा आसपासच्या गांवांतील देखील कोणीहि त्यांच्याविषयीं आपली सहानुभूति दाखविली नाहीं. उलट जो तो त्यांच्या नांवानें बोटें मोडूं लागला.

कोणी म्हणाले “ अहो, पाप झांकूनझांकून रहाणार तरी किती दिवस ? देवाच्या घरीं कांहीं न्याय आहे कीं नाहीं ?” कोणी म्हणाले “ खोट्याच्या कपाळीं शेवटीं गोटा यावयाचाच ? स्वारीनें केवढी चलाखी केली होती ! मृत्युपत्र तयार करून त्यावर वडिलांची खोटी सही घालून साक्षीपुरावे जेथल्या तेथें बरोबर करून ठेविले होते. पण मौज काय झाली पहा ! एका तारखेवर सगळें फसलें. ईश्वराची लीला अगाध आहे म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं !” कोणी म्हणाले “ अहो, जगांतून धर्म कांहीं आजच बुडाला नाहीं ! या हातानें करावें आणि या हातानें भरावे ! ते दिवशी मी जज्जकोर्टांत साक्षीला गेलो होतों, तेव्हां तेथल्या एका मोठ्या वकिलानें मला सांगितलें कीं, या कामांत विठ्ठलरावांना जन्मठेपेची शिक्षा होईल; जसें करावे तसें भरावे ! दुष्ट, चांडाळ, राक्षस ! प्रत्यक्ष जन्मदात्या आईला ज्यानें जाळून मारली, त्या राक्षसाला कितीहि जबर शिक्षा झाली तरी ती थोडीच ! म्हातारीचा तळतळाट भोंवतो आहे बरें हा !” असें जो तो मनास येईल त्याप्रकारें बोलून विठ्ठलरावांना शिव्याशाप देऊं लागला.

सरस्वतीला जेव्हां समजलें कीं, विठ्ठलराव आतां खात्रीनें तुरुंगांत जातात, तेव्हां त्या बिचारीला फार वाईट वाटलें. विठ्ठलरावांबद्दल तिच्या मनांत मुळींच भक्ति नव्हती; तथापि त्यांचीं लहान मुलें आणि भागीरथीबाई यांचें दुःख पाहून ती दुःखित झाली. दुःखाचा तिनें पुरा अनुभव घेतला होता. त्यामुळें प्रत्यक्ष शत्रूचें दुःख पाहूनहि तिचें कोमल हृदय कळकळत असे. विठ्ठलरावाना यांतून वांचविण्याची खटपट करण्याविषयीं जगन्नाथरावांना तिनें पराकाष्ठेचा आग्रह केला; जगन्नाथरावांनी तें कबूल केलें नाहीं. ते म्हणाले “ अशा अधमाधम नरपिशाचांना यथायोग्य शासन झालें नाहीं, तर चांगल्या लोकांना या जगांत रहायला मिळायचें नाहीं. या खेपेला त्यांना चांगलें प्रायश्चित्त भोगायला लावल्याशिवाय मी कधींहि स्वस्थ बसणार नाहीं. तुला यांत कांहीं कळत नाहीं आणि तूं या बाबतींत मला कांहीं सांगूंहि नकोस !”

परंतु सरस्वतीनें आपला आग्रह सोडिला नाहीं. ती म्हणाली “ दादा, माझ्यासाठीं ही गोष्ट तुला केलीच पाहिजे ! ते तुरुंगांत पडल्यावर त्या पोरांची काय दशा होईल ? एका अपराध्याबरोबर तीं तीनचार निरपराधी मनुष्यें उघडीं पडतील—”

नाइलाजास्तव विठ्ठलरावांना वांचविण्यासाठीं जगन्नाथराव कांहीं तजवीज पाहूं लागले; परंतु ती कांहीं जुळली नाहीं. येथूनतेथून सर्वच विठ्ठलरावांच्या विरुद्ध ! जो तो त्यांच्यावर दांतओठ खात होता. अशा स्थितींत त्यांना वांचविण्याची खटपट जुळावी कशी ? हें ऐकून सरस्वतीला पराकाष्ठेचें दुःख झालें.

विठ्ठलरावांचें आजपर्यंतचें आयुष्य दुसऱ्यांना दुःख देण्यांत गेलें होतें; स्वतः दुःख भोगण्याचा प्रसंग आजपर्यंत त्यांच्यावर आला नव्हता. त्यामुळें अशा प्रसंगी मनुष्यांची अवस्था काय होते, याची त्यांना आजवर कल्पनाहि नव्हती; परंतु त्याचा प्रत्यक्ष अनुभव हा फौजदारी खटला सुरू झाल्यापासून त्यांना येऊं लागला. कोणी त्यांच्या तर्फेचा एक शब्द देखील बोलेना कीं, कोणी त्यांना साहाय्य करण्यास पुढें येइना. विठ्ठलरावांचे डोळे आतां उघडूं लागले. काय करावें, हेंच त्यांना सुचेना ! त्यांचा अकल गुंग झाली. चोहोंकडे त्यांना अंधार दिसूं लागला. तुरुंगाची कल्पना मनात येऊन त्यांची पाचावर धारण बसली. भागीरथीबाईचें तोंडदेखील सुकून गेलें. अभिमान बराच उतरला, बोलण्यांतील प्रखरताहि कमी होऊं लागली. रडतरडत त्या एक दिवस विठ्ठलरावांना म्हणाल्या "किती लागेल तेवढा पैसा खर्च करा, पण यांतून पार पडतां येईल असं करा."

विठ्ठलराव खरोखरच पाण्यासारखा पैसा खर्च करीत होते. त्यांच्या हातांत फारशी रोकड राहिली नव्हती. चोरी करून, कोणाला फसवून, तर कोणाचे गळे कापून त्यांनीं जे पैसे गोळा केले होते, ते व्याजाच्या आशेनें लोकांना कर्जाऊ दिले होते. स्वतःला आतां जरूर लागली तेव्हां त्यांनीं किती हातपाय आपटले, तरी पैसे कांहीं हातीं येईनात; आणि पैशावांचून तर विठ्ठलरावांचें अगदीं अडून राहिलें होतें कोणाजवळ मागावयास जावें तर त्यांना किती वर्षे तुरुंगांत काढावीं लागतील आणि किती नाहीं, या धास्तीनें कोणीं जवळ उभे देखील करीना. इकडे विठ्ठलरावाजवळ बरीच ऊब असल्याबद्दल जिकडेतिकडे गवगवा असल्यामुळें वकीललोकहि त्यांना यथास्थित पिळून काढूं लागले. ज्या त्या गोष्टींत अडवून धरूं लागले. पैसा तर पाहिजे, आणि दुसरा मार्ग तर राहिला नाहीं. हें पाहून भागीरथीबाईनीं आपले एकंदर लहानमोठे दागिने काढून रडतरडत विठ्ठलरावांच्या हवालीं केले. ते विकून त्यांतून थोडाबहुत खर्च त्यांनीं भागविला. शेवटीं घरदार, जमीनजुमला जें कांहीं होतें नव्हतें गहाण टाकून आणखी तीन हजार रुपये त्यांनीं उभे केले.

नेमलेल्या तारखेला खटला सुरू झाला. विठ्ठलरावांनीं आपल्यातर्फे तीन वकील देऊन शिवाय मुंबईहून एक बॅरिस्टर आणविला होता. विरुद्ध बाजूला सरकारी वकील होता. विठ्ठलरावांच्या बॅरिस्टरनें आपल्याकडून खूब शिकस्त केली, परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. सरकारी वकिलानें असा कांहीं सप्रमाण पुरावा पुढें आणला कीं, विठ्ठलरावांच्या अपराधीपणाबद्दल जज्ज-साहेबांची पूर्ण खातरी झाली. ज्यूरीनें एकमतानें त्यांना अपराधी ठरविलें जज्जसाहेबांनीं त्यांना सात वर्षे सक्तमजुरीची शिक्षा दिली. त्याबरोबर पोलिसच्या लोकांनीं त्यांना बिड्या ठोकिल्या आणि तुरुंगाकडे चालविलें. मृत्युपत्र करण्याच्या कामांत त्यांना मदत करणारे त्यांचें मेहुणे माधवराव यांनाहि बक्षिसादाखल एक वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा मिळाली !

---

### प्रकरण अडतिसावें

## पापाचें प्रायश्चित्त

जवळ होतें नव्हतें तें सर्व जाऊन अखेरीस विठ्ठलराव कचाटांतून सुटले नाहींत ते नाहींच ! जवळ रोकड होती ती गेली, भागीरथीबाईच्या अंगावरचे दागदागिने गेले, आणि शिवाय वरती तीनचार हजार रुपये कर्ज डोक्यावर चढलें ! विठ्ठलरावांनीं पक्का निश्चय केला होता कीं, एकदा या खटल्यांतून निभावलों, म्हणजे आपल्या एकूणएक देणेंदारांवर भराभर फिर्यादी करून कर्जा लावलेले पैसे वसूल करावयाचे, आणि अगोदर लोकांच्या या कर्जांतून नोकळें व्हावयाचें. परंतु हा त्यांचा निश्चय मनांतल्या मनांतच राहिला. जज्ज-साहेबांनी त्यांना अपराधी ठरवून सात वर्षे सक्तमजुरीची शिक्षा दिली. पोलिसचे लोक त्यांच्या हातापायांत लोखंडाच्या बिड्या घालूं लागले, त्याबरोबर विठ्ठलराव देहभान विसरले. त्यांना चोहोंकडे अंधकार दिसूं लागला. पोलिसचे लोक आपल्याला धक्के देत तुरुंगाकडे नेत आहेत, हें देखील बराच वेळपर्यंत त्यांच्या ध्यानांत आलें नाहीं. पुढें जेव्हां त्यांचें मन ठिकाणावर आलें, तेव्हां मात्र त्यांना अत्यंत लाज वाटूं लागली. रस्त्यांतून जाणारेयेणारे सर्व लोक आपल्याला ओळखून आपल्याकडे बोटें दाखवीत आहेत, आणि तिरस्कारबुद्धीनें हंसत आहेत, असें त्यांना दिसूं लागलें. पहातांपहातां विठ्ठलराव तुरुंगाच्या दरवाज्याजवळ येऊन पोहोंचले. तेथें खांद्यावर बंदुक घेऊन एक भला धिप्पाड

शिपाई खडा पहारा करीत होता. तो भयप्रद देखावा पाहून विठ्ठलरावांना ती प्रत्यक्ष यमपुरीच असावी, असा भास झाला. भयानें त्यांचें हृदय थरथर कांपूं लागलें. हें त्यांचें भय अधिक वाढविण्याकरितांच कीं काय, तेथील ते यम-किंकरांसारखे पहारेकरी पदोपदीं त्यांना मर्मभेदक शब्दांनीं ताडन करूं लागले. विठ्ठलरावांचा पोषाख तत्काळ बदलण्यांत आला. डौलदार घेराचा अंगरखा, ऐटबाज गुलाबी पागोटें, मलमलचें शुभ्र तलम धोतर, पुणेरी लालभडक जोडा, नागपुरी उपरणें, सर्व कांहीं जाऊन खादीचा जाडाभरडा मांडचोळणा, तशीच एक बंडी, एक टोपी आणि एक घोंगडीचें रकटें त्यांना मिळालें. या नूतन पोषाखानें प्रत्येक पावलाबरोबर लोखंडाच्या कडीतोड्याचा खणखण आवाज करीतकरीत विठ्ठलरावांची स्वारी शून्यहृदयानें कारागृहांत शिरली. त्या घटके-पासून त्यांच्या प्रायश्चित्ताला प्रारंभ झाला.

साऱ्या रात्रींत त्यांचा डोळ्याशीं डोळा देखील लागला नाहीं. त्या भयाण रात्रीं जिकडेतिकडे निद्रेचा अमल जारीनें सुरू झाला असतां विठ्ठलराव अंधार-कोठडींत बिछान्याऐवजीं पसरलेल्या त्या रकट्यावर उठून उभे राहिले. त्यांना बाहेर जाण्याची जरूर लागली. परंतु या बिनभाड्याच्या सरकारी बंगल्यांत पाऊल टाकतांना आपल्या स्वतंत्रतेला प्रथम अजिबात रजा द्यावी लागते, याचा त्यांना अद्यापि अनुभव नव्हता. ते मोठ्या कष्टानें चांचपडत चांचपडत त्या अंधारकोठडीच्या दरवाज्यापाशीं गेले; परंतु पहातात तों तो बाहेरून घट्ट लावून घेतलेला. अर्थात् बाहेर जाण्याचा विचार त्यांना तेथेंच सोडून द्यावा लागला. ते त्या गाढ अंधकारांत मस्तकावर हात देऊन बसले. त्यांचें अंतःकरण दुर्धर चितासागरांत मग्न होऊन गेलें. घराकडील विचारांनीं त्यांच्या अंतःकर-णांत काहूर माजविलें आणि ते दुःखातिशयानें रडूं लागले.

"बायकोमुलें यांची दशा काय होईल? त्यांचा समाचार कोण घेईल? त्यांचा उदरनिर्वाह कसा चालेल? हीं सात वर्षें कशीं जातील? एक दिवस दोन दिवस नाहींत! वर्ष—दोन वर्षांचीदेखील गोष्ट नाहीं!—सात-सात वर्षें!! हीं जाणार कशीं—"

भागीरथीबाईच्या हातीं एक पैसाहि नव्हता, ही गोष्ट विठ्ठलरावांना माहीत होती. लोकांकडे येणें असलेल्या पैशापैकींहि कोणी कांहीं देईल, ही आशाच करावयाला नको. या सात वर्षांत ते सगळे पैसे बुडून जाणार हेंहि ते समजून होते. शिवाय, आणखी एका गोष्टीनें तर विठ्ठलरावांची स्थिति वेड्यासारखीच

होऊन गेली होती. या मृत्युपत्राच्या कचाटांतून सुटण्यासाठीं त्यांनीं घरदार, शेतभात, जमीनजुमला जे कांहीं होतें नव्हतें तें सगळें गहाण टाकून तीनचार हजार रुपये कर्ज काढिलें होतें. हें कर्ज आतां फिटणार कसें? मुदतींत कर्जाचा निकाल झाला नाहीं तर सावकार फिर्याद करून बायको आणि मुलें यांना हाकून देऊन सगळें खाऊन बसावयास चुकावयाचे नाहींत, हें अगदी स्वानुभवावरून ते जाणत होते. या दुर्धर चिंतेनें विठ्ठलरावाचें अंतःकरण अगदींच अस्थिर झालें. ते स्वतःशींच मोठ्यानें म्हणाले "हाय हाय! माझी बायको, माझीं सोन्यासारखी मुलें, यांच्यावर घरातून बाहेर निघण्याचा प्रसंग येऊन तीं देशोधडीस लागतील, रस्त्यावरील भणंगभिकाऱ्यांप्रमाणें त्यांची अन्नान्न दशा होईल—"

बायकोमुलें देशोधडीस लागतील, हा हृदयभेदक विचार मनांत येतांच त्यांना विनायकरावाची आठवण झाली. त्याच्या अंगावर शहारे आले. अंधारकोठडीत पडलेल्या त्या गाढ अंधकारांतहि त्यांच्या डोळ्यासमोर एक मूर्ति उभी राहिल्याचा त्यांना भास झाला. त्याच्या आईची—वृद्ध सगुणाबाईची ती अर्धदग्ध मूर्ति होती. ती मनःकल्पित मूर्ति पाहून विठ्ठलराव भीतीनें गागरून गेले. तेथून ते धडपडत उठले आणि दुसरीकडे जाऊं लागले. परंतु ती भयप्रद मूर्ति त्यांच्या अधिकाधिकच जवळ येऊं लागल्याचा त्यांना भास होऊं लागला. ते हतज्ञान होऊन अंधारकोठडीच्या भितीवर जोरानें आपटले. असलेला एक खिळा त्यांच्या मस्तकांत खुपून डोक्याला एक भली मोठी खोंक पडली आणि तींतून रक्त वाहूं लागलें. त्यांची बंडी आणि चोळणा हीं देखील त्या रक्तानें माखून गेलीं. विठ्ठलरावांना हें मुळींच समजलें नाहीं. बऱ्याच वेळानें ते शुद्धीवर येऊन पुनः उठून बसले आणि पुनः आपल्या दैवाला दोष देऊं लागले. आपली आपणच ते निर्भत्सना करूं लागले.

"या घातकी पैशाची हांव धरून कशाला मी आपल्या हातानें आपल्या गळयावर सुरी ठेविली? मी न्यायानें चाललों असतों तर आज माझी अशी दशा खात्रीनें झाली नसती. या पैशाच्या घातकी लोभांत गुंतून मीं काय काय म्हणून केलें नाहीं? वृद्धापकाळांत बाबांच्या मनाला अपरिमित कष्ट दिले—सख्ख्या भावाला देशोधडीस लाविला—त्या दूर देशांत माझ्यामुळेंच बिचारा प्राणास मुकला—म्हाताऱ्या आईच्या अंगावर हात टाकण्यास देखील मला लाज वाटली नाहीं—अखेरीस घराला आग लावून त्या प्रत्यक्ष जन्मदात्या

आईला म्यां अधमानें त्यांत जाळून मारिली—मी आतां कोणत्या भयंकर नरकांत जाणार आहें? भगवंता! मला क्षमा कर! मीं मातृवध केला आहे—भ्रातृवध केला आहे—भावाच्या त्या निरपराध मुलाची देखील हत्त्या माझ्याच मस्तकावर आहे—माझ्या या घोर पातकांना कांहीं प्रायश्चित्त तरी असेल काय? अरेरे! ज्या पैशाच्या लोभानें मी हीं राक्षसी कृत्यें करण्यास प्रवृत्त झालों, तो पैसा तरी आतां कोठें आहे? उलट लोकाचें कर्ज माझ्या डोक्यावर चढलें आहे! आणि या कर्जासाठींच माझ्या बायकोला आणि मुलांना घरांतून हाकून देतील—विचारीं अन्नान्न करुन दारोदार भिक्षा मागत फिरतील! आज माझा विनायक असता तर खरोखर इतकें दुःख मला भोगावें लागलें नसतें. परंतु मीच दुष्टाने त्याला नाहक देशोधडीस लाविला—मीच त्याच्या मृत्यूला कारण झालों—माझ्या या लोभाने माझा सर्वस्वी घात घेतला—”

भितीवर डोके टेकून विठ्ठलराव ढळढळा रडूं लागले. त्याच अवस्थेत त्यांचा किंचित् डोळा लागला. त्याना भयंकर स्वप्न पडलें अग्नीच्या प्रचंड ज्वाळांत त्यांच्या आईची अर्धदग्ध मूर्ति उभी आहे, असें त्यांना दिसलें. तिच्या उजव्या बाजूला तांबडे, निळे, पांढरे, काळे असे नाना तऱ्हेच्या चित्रविचित्र रंगाचे हजारों विषारी सर्प असून ते आपल्या भयंकर फणा उभारून विठ्ठलरावांकडे टवकारून पहात होते आणि क्रोधाने चवताळून जाऊन फों–फों करीत होते. आईच्या डाव्या बाजूला मस्तकशून्य, कृष्णवर्ण आणि स्थूलकाय अशीं कित्येक मनुष्यें हातांत पेटलेल्या चुडी घेऊन विठ्ठलरावांना जाळण्यासाठीं टपून बसलीं होतीं. त्यांच्या आईच्या त्या अर्धदग्ध मूर्तीने त्या ज्वाळांमधून विठ्ठलरावांकडे बोट दाखवितांच ते हजारों भयंकर सर्प चवताळून त्यांच्या अंगावर धावले आणि चटाचट त्याना दंश करूं लागले. तीं मस्तकविहीन मनुष्यें देखील आपल्या हातांतील पेटलेल्या चुडींनीं त्याना प्रहार करू लागलीं! विठ्ठलराव भयभीत होऊन मोठमोठ्याने किंकाळया फोडूं लागले. त्यांच्या त्या किंकाळया ऐकून पहारेकरी कंदील घेऊन धांवत आले आणि दरवाजा उघडून विठ्ठलरावांना किंकाळया फोडण्याचें कारण विचारूं लागले. विठ्ठलरावांची छाती धडधड उडत होती, अंगाला दरदरून घाम आला होता, त्याच्या तोंडांतून मुळींच शब्द निघेना. कंदिलाच्या उजेडाने पहारेकरी ती सगळी कोठडी धुंडाळूं लागले. शेवटीं विठ्ठलरावांच्या पैरणीची आणि चोळण्याची मागची बाजू रक्ताने भरलेली त्यांच्या दृष्टीस पडली. अद्यापीहि विठ्ठलरावांच्या डोक्यांतून रक्त वहातच होतें.

" कसें रक्त निघालें हें ?" विठ्ठलरावांना पहारेकरी विचारूं लागले. आपली पाठ रक्तानें भरली आहे, हें पाहून विठ्ठलराव गोंधळांत पडले. भिंतीवर डोकें आपटल्याची त्यांना शुद्धिच नव्हती. " कुठून हें रक्त आलें ? खरोखरच मल ते सर्प चावले कीं काय ?" विठ्ठलराव याच विचारांत पडले.

विठ्ठलराव कांहींच उत्तर देत नाहींत हें पाहून पहारेकरी संतापले आणि त्यांना शिव्यागाळी देऊं लागले, धक्काबुक्की करूं लागले. हे लोक असें क करितात, हेंच विठ्ठलरावांना कळेना. दुसरे दिवशीं सकाळीं विठ्ठलरावांन तुरुंगावरील अधिकाऱ्यापुढें उभें करण्यांत आलें. त्यांच्या डोक्याला पडलेलं खोंक आणि रक्तानें भरलेले त्यांचे कपडे दाखवून त्या पहारेकऱ्यांनीं हिंदुस्तानी भाषेंत जेलरसाहेबांना कांहीं सांगितलें, तें ऐकून जेलरसाहेब कुत्र्याप्रमाणें विठ्ठलरावांच्या अंगावर येऊन रागानें म्हणाले " भिंतीवर डोकें आपटून जीव देण्याचा उद्योग करीत होतास काय ? हरामखोरा ! दम धर, तुझी चांगलीच खोड मोडतो."

भिंतीवर डोके आपटून आत्महत्त्या करण्याचा प्रयत्न केल्याबद्दलचा विठ्ठलरावांवर आरोप ठेवून त्यांना पुनः मॅजिस्ट्रेटसाहेबांपुढें उभें करण्यांत आलें मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं विठ्ठलरावांस विचारलें " आत्महत्त्या करण्याचा तूं प्रयत्न करीत होतास काय ?"

" नाहीं !"

" मग ही तुझ्या डोक्याला खोंक कशी पडली ?"

" मला तें मुळींच माहीत नाहीं."

विठ्ठलरावांच्या या खऱ्या बोलण्यावरहि आज कोणींच विश्वास ठेविल नाहीं. काळाचा असा विलक्षण प्रभाव आहे ! त्यांना अपराधी ठरविण्यांत येऊन मॅजिस्ट्रेट साहेबांनीं एक वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली ! पूर्वीची सात वर्षे होती, आतां तीं आठ झालीं. यापूर्वी अनेक घोर अपराध करूनहि विठ्ठलराव मोकळे सुटले होते; परंतु आज त्यांचा कांहींएक अपराध नसतांहि त्यांन शिक्षा झाली ! तुरुंगांत त्यांच्यावर विशेष कडक पहारा ठेवण्यांत आला पहारेकरी त्यांच्यावर तीव्र दृष्टि ठेवूं लागले. मोठ्या श्रमांचीं कामें त्यांच्य वांट्यास येऊं लागलीं. तिरस्कार आणि वेत्राघात यांचा त्यांना नित्य अनुभव येऊं लागला. निजण्याच्या निमित्तानें अंधारकोठडींत जाऊन ते संपूर्ण रा: रडून काढूं लागले. बायको आणि मुलें यांच्याविषयीं चिंता करतांकरतां आई

विनायक, केशव, सरस्वती यांच्याविषयींचे विचारहि त्यांच्या मनांत आल्या-विना रहात नसत. पूर्वी केलेल्या अघोर पातकांच्या स्मरणानें ते दिवसेंदिवस भ्रमिष्ठ होत चालले.

विठ्ठलरावांची कारागृहांतील अवस्था विस्तृतपणें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. फक्त एवढेंच सांगितलें म्हणजे पुरे होईल, कीं त्यांनीं आजवर केलेलीं पापकर्में जशीं अघोर होतीं, तसेंच घोर प्रायश्चित्त आतां त्यांना भोगावे लागत होतें.

---

प्रकरण एकुणचाळिसावें

## एवढ्यानेंच संपलें नाहीं

वाईट बातमी वाऱ्याच्याहि पुढें धांवत असते म्हणून म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. विठ्ठलरावांना सात वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा झाली, ही बातमी हां हां म्हणतां चोहोंकडे पसरली. भागीरथीबाईंच्याहि ती कानावर येण्यास फारसा विलंब लागला नाहीं. जमिनीवर अंग टाकून भागीरथीबाई आक्रोश करूं लागल्या यापूर्वी अनेक वेळां त्यांनीं रडण्याचें ढोंग केलें होतें, अनेक वेळां पतीच्या बिछान्याशीं बसून लटकेंच रडूनरुसून त्यांनीं कुटुंबात कलहाग्नि चेतविण्याचा उपद्व्याप केला होता; परंतु आजच्यासारख्या दुःखानें कळवळून जाऊन त्या खऱ्याखुऱ्या कधींहि रडल्या नव्हत्या. असह्य यातनांनीं दुःखित होऊन त्या आज आर्त स्वरानें शोक करूं लागल्या. पति तुरुंगांत पडला याचें त्यांना इतकें दुःख झालें नाहीं, परंतु आता पुढें आपलें काय होईल या चिंतेनें त्यांना अगदीं व्याकुळ करून सोडिलें. "मी आतां जाऊं कुठं ?–माझी आतां काय दशा होईल ?" ही दुर्धर चिंताच त्यांच्या दुःखाचें खरें कारण होती. पैसा हेंच काय तें परब्रह्म आहे, असा आजवर भागीरथीबाईंचा समज होता. पैशा-पुढें त्यांना दुसऱ्या कशाचीच पर्वा वाटत नसे; पैशाच्या धुंदीनें मत्त होऊन त्यांनीं आजवर हें जगत् तुच्छ मानिलें होतें; शेजाऱ्यापाजाऱ्याशीं किंवा इतर कोणाशींहि त्या कधीं चांगल्या रीतीनें वागल्या नव्हत्या; सर्वांचा त्या तिरस्कार करीत आल्या होत्या; चुकूनदेखील जन्मांत कधीं कोणाला गोड शब्द बोलल्याची त्यांना आठवण नव्हती; दुसऱ्याच्या सुखदुःखाकडे किंवा बऱ्यावाईटाकडे त्यांनीं आजवर कधींहि लक्ष्य दिलें नव्हतें; नवऱ्याप्रमाणेंच त्याहि सर्वांशीं तुसडेपणानें वागत असत; सर्वांचा उघडउघड तिरस्कार करीत असत; परंतु आज घडून

आलेल्या एका गोष्टीनें त्यांची ती वृत्ति एकदम पालटून गेली. ही सगळी पृथ्वी म्हणजे आपल्या पतीच्या पुढें कःपदार्थ आहे, असा भागीरथीबाईचा दृढ समज होता; त्यामुळें त्या आपल्या प्रत्यक्ष पतीची या पृथ्वींत अशी दुर्दशा होईल, असें त्यांना कधीं स्वप्नांत देखील वाटलें नव्हतें. आपल्या पतीला शिक्षा झाली, ही बातमी प्रथम त्यांना खरीच वाटेना. आपला द्वेष करणाऱ्या मंडळीनें आपल्याला दुःख देण्याच्या हेतूनें ही खोटीच कंडी पिकविली आहे असें त्यांना वाटलें; परंतु पुढें विठ्ठलरावाखेरीज बाकीची सर्व मंडळी परत आली, तेव्हा त्यांचें मन कचरलें. लवकरच त्यांचा संशय दूर झाला आणि भागीरथीबाई आपल्या आयुष्यांत अगदीं प्रथम खऱ्याखुऱ्या दुःखवेदना भोगूं लागल्या. त्यांना आज ही पृथ्वी शून्य भासूं लागली. रडूनरडून त्यांनीं आक्रांत केला. पुढें किंचित् स्वस्थ होऊन त्यांनी असा विचार केला कीं, "कांहीं हरकत नाहीं; कांहीं वर्षे आपण माहेरीं जाऊन राहूं." त्यांचे वडील बंधु माधवराव हे जिल्ह्याचे गांवीं मुखत्यारी करीत होते, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. माधवरावांच्या भरंवशानें भागीरथीबाईना बराच धीर आला. तोंच खोटी साक्ष दिल्याबद्दल विठ्ठलरावाबरोबर माधवरावहि तुरुंगांत पडल्याची दुष्ट बातमी त्यांना समजली. भागीरथीबाई कपाळ फोडून घेऊं लागल्या. वेड्यासारख्या जमिनीवर गडबडां लोळूं लागल्या. बिचाऱ्या जज्जाला नाहींनाहीं त्या शिव्या देत सुटल्या. जगन्नाथरावांच्या अंगावरहि मधुनमधून शिंतोडे उडविण्यास त्या विसरल्या नाहींत; परंतु आज रडून, शिव्याशाप देऊन, किंवा बोटें मोडूनहि भागीरथीबाईचें समाधान होईना. रडूनरडून त्यांनीं डोळे रक्तासारखे केले, जमिनीवर गडबडां लोळूनलोळून लुगड्याची धुळधाण केली, शिव्याशाप देऊन घसा फोडून घेतला, परंतु पुढें काय करावें, हें कांहीं केल्या भागीरथीबाईना सुचेना. चोहोंकडे त्यांना अंधकार दिसूं लागला. त्यांना रडतांना पाहून हरि आणि कृष्णी हीं देखील "बाबा! बाबा!" म्हणून आक्रोश करूं लागलीं. भागीरथीबाईचें सांत्वन करण्याच्या भानगडींत जरी कोणीच पडलें नाहीं, तरी त्यांच्यावर आलेला हा प्रसंग पाहून सर्वांना थोडेंबहुत वाईट वाटलें. आमची सरस्वती मात्र त्यांचें दुःख पाहून फारच दुःखित झाली. या अल्पवयांतच सरस्वतीनें अनेक यातना सोशिल्या होत्या, असह्य दुःखभार ती सहन करीत होती, नानातऱ्हेचा छळवाद तिनें सोशिला होता, संकटकाळीं मर्मांतक वेदना सहन करून तिनें अनेक प्रकारचा बोध संपादन केला होता; त्यामुळें दुसऱ्याचें

दुःख पाहून तिचें कोमल अंतःकरण तत्काळ कळवळत असे, तिचे डोळे अश्रुपूर्ण होत असत. भागीरथीबाईवर हा प्रसंग येतांच सरस्वती त्यांचें मागील चरित्र साफ विसरून गेली व रामूला मांडीवर घेऊन ती भागीरथीबाईजवळ बसून त्यांचें समाधान करूं लागली. सरस्वती म्हणाली. "जाऊबाई, य सगळ्या नशिबाच्या गोष्टी! रडून कां कांहीं होणार आहे? तुम्ही काळजी कशाला करतां? देवानं जसं आजवर आमचं चालवलं आहे तसंच तो तुमचंहि चालवील. तुम्ही कुणी परकी तर नाहींत ना? जो काय मीठभात मिळेल तो आपण सर्वजण एका ठिकाणीं खाऊं."

सरस्वतीनें आज मोठ्या प्रेमानें रामूला मांडीवर घेतले. भागीरथीबाईन देखील त्याबद्दल राग आला नाहीं. उलट त्याना किंचित् समाधानच वाटले.

खरोखर दैवगतीचें माहात्म्य मोठें विलक्षण आहे. दैव अनुकूल असतें तोंपर्यंत मनुष्य हात घालील त्या कामीं त्याला यश येत असतें. दुःसाध्य गोष्टी देखील सुसाध्य होत असतात; कोणीं कांहीं केलें तरी त्याचें यत्किंचितहि वांकडें होत नाहीं, परंतु तेंच का एकदा दैव फिरलें, म्हणजे तोच मनुष्य मातीमोल होऊन जातो! चांगल्या हेतूनें केलेलें कृत्य देखील त्याला भोंवतें; नाना प्रकारच्या विपत्ति त्याचा पाठलाग करूं लागतात; संकटामागून संकटें येऊन तो त्रस्त होऊन जातो. विठ्ठलराव आणि भागीरथीबाई याच्या सहीचा जोर आतां फिरला होता; दुर्दैव त्यांच्या हात धुऊन पाठीशीं लागलें होतें. सात वर्षांची शिक्षा होऊन विठ्ठलराव तुरुगांत गेल्याला दोन दिवस झाले नाहींत तोंच तीन आणखी एक वर्षाची भर पडली! त्याच्या बरोबरच त्याचे मेहुणे माधवरावहि तुरुंगांत पडले; परंतु एवढ्यानेंच संपलें नाहीं!

या गोष्टीला चारदोन दिवस लोटतात न लोटतात तोंच एके दिवशीं सकाळच्याच प्रहरीं पोलिसचे तीनचार शिपाई बरोबर घेऊन फौजदार एकदम विठ्ठलरावाच्या घरांत शिरले. मौज पहाण्याकरितां बाहेर लोकांचीहि बरीच गर्दी जमली. हरीच्या वर्गातील एका मुलाची कंठी शाळेंतून चोरीस गेली होती शाळेंत पुष्कळ तपास करून शेवटीं त्या मुलाच्या बापानें पोलिसांत या गोष्टीची वर्दी दिली होती. पोलिसानें प्रत्येक मुलाच्या वर्तणुकीसंबंधीं अगदीं बारकाईनें चौकशी करून शेवटीं हें काम हरीचेंच असलें पाहिजे असें ठरविलें होतें, आणि म्हणूनच ते विठ्ठलरावांच्या घराचा झाडा घेण्यासाठीं अचानक आले होते.

आईच्या शिक्षणानें तरबेज झालेल्या हरीची शाळेंत बरीच ख्याति झाल होती. कोणाचें कागद, कोणाच्या लेखण्या, कोणाच्या पेन्सिली तर कोणाचे पै चोरून आणून ते हरि रोज आईजवळ देत असे. क्रमाक्रमानें तो या कामां तरबेज होऊं लागला; त्याचा धीर चेपत चालला. कित्येक दिवस त्याची त हातचलाखी कोणाच्याहि लक्ष्यांत आली नाहीं. वर्गात धडाधड चोऱ्या हो असूनहि त्या कोण करतें, हें कोणाला समजेना. हरि श्रीमंताचा मुलगा म्हणू त्याचा संशय घेण्यास कोणीच धजेना; परंतु क्रमाक्रमानें हाच चोर असाव अशी सर्वांची खात्री होऊन गेली व त्याच्याजवळ कोणीच बसेनासें झालें. स मुलें त्याला "हरि रामोशी! हरि रामोशी" म्हणून चिडवूं लागलीं. मास्त रांनीं हरीला एकदोन दिवस रागे भरून पाहिलें, शिक्षाहि करून पाहिली परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. उलट हरीची शिताफी दिवसेंदिव अधिकच वाढूं लागली. विठ्ठलराव आणि भागीरथीबाई यांच्या कानांवर ह गोष्ट आली. आपल्या मुलाला विठ्ठलराव पक्के ओळखीत होते. तरीहि लौकिका साठीं शाळेंत जाऊन त्यानीं बिचाऱ्या त्या मास्तराला सणसणीत दम भरला "थोरांमोठ्यांच्या मुलाला निष्कारण चोर म्हणणें सामान्य गुन्हा नाहीं, ध्यानांत धरा. मी आपला उगाच तुम्हाला इशारा दिला आहे—"

बिचारे मास्तर या इशाऱ्यानें घाबरून गेले. त्यांनीं मुलांना हरीच्या वाटेल न जाण्याबद्दल सक्त ताकीद दिली. मग काय विचारतां! हरीला कसलेंच भ राहिलें नाहीं, आणि आज जे पोलिसचे शिपाई विठ्ठलरावांच्या घराचा झाड घेण्यास आले होते, तो हरीच्या या निर्भयतेचाच परिणाम होता.

कोणी सुखांत असो अथवा दुःखांत असो, पोलिसच्या लोकांना त्याच मुळींच पर्वा नसते, भागीरथीबाईवर म्हणजे दुःखाचा केवढा गहजब गुदरल होता! तरी देखील पोलिसांचा आडदांडपणा आणि उग्र स्वभाव यांत तिळ मात्र कमतरता झाली नाहीं! मोडतोड, आदळआपट करून त्यांनीं सगळें घ दणाणून सोडिलें. भागीरथीबाईला या वेळीं खरोखरच या गोष्टीची कांह माहिती नव्हती. त्यामुळें या दुःखांत हे लोक विनाकारण आपला अपमा करीत आहेत, असें वाटून त्या सरस्वतीजवळ जाऊन एकसारख्या रडत बसल्य पोलिसच्या लोकांनी जिकडेतिकडे नासधूस चालविली होती. भागीरथीबाई ह सगळा अत्याचार आणि अपमान आज डोळे चोळीत निमूटपणें सहन करीत होत्या. गोविंदराव नष्टबुद्ध होऊन टकटक पहात एका कोंपऱ्यात बसले होते;

परंतु सरस्वतीला हा अत्याचार सहन झाला नाहीं. आपल्या सासऱ्याच्या घराण्यावर चोरीचा आरोप यावा, देशमुखांच्या घराचा पोलिसानें झाडा घ्यावा, याचें तिला मर्मांतिक दुःख झालें. चोरीस गेलेली कंठी खरोखरच हरीनें आणून लपवून ठेविली असेल अशी कल्पनाहि तिच्या मनांत आली नाहीं. भिवाला हांक मारून ती मोठ्यानें म्हणाली "अरे, त्या फौजदारांना सांग कीं, हें कांहीं चोराभामट्यांचं घर नाहीं. असा जुलूम केल्यानं कुणी बरं म्हणणार नाहीं—"

भिवानें त्याप्रमाणें सांगितलें, परंतु त्याच्या बोलण्याकडे मुळींच कोणीं लक्ष दिलें नाहीं. हें पाहून "आज मामंजी नाहींत, दुसरंहि कुणी नाहीं, जगूदादा दिखील इथं नाहींः तेव्हां या अभागिनीच्या बोलण्याकडे फौजदार तरी कशाला लक्ष देतील ?" असें म्हणून सरस्वती रडूं लागली.

बराच वेळ तपास केल्यानंतर शेवटीं एका फुटक्या मडक्यांत ती चोरीस गेलेली कंठी एका शिपायाला सांपडली. ज्याच्या मुलाची कंठी गेली होती त्यानें हीच आपली कंठी, म्हणून ती तत्काळ ओळखली. सर्व लोक विस्मित झाले. आपल्या मुलाचा चरित्रक्रम भागीरथीबाईंना पूर्णपणें अवगत होता, त्यामुळें ती कंठी तेथें कशी आली, हें त्या तत्क्षणींच समजून चुकल्या. फौजदारसाहेबांना तर विलक्षणच स्फुरण चढलें. सरस्वतीला उद्देशून ते म्हणाले "कुठें आहे ती बाई ? हें चोराचें घर नव्हे म्हणून म्हणत होती ना ती ? चोर तर चोर आणखी वर शिरजोर !"

फौजदारांचे हे शब्द ऐकून सरस्वतीला मेल्यापेक्षांहि मेल्यासारखे झालें. कंठीचा मालक तिची अवस्था पाहून दुःखित झाला आणि फौजदारांना म्हणाला "फौजदारसाहेब, असें भलतेंच बोलूं नका. ही कांहीं चोरी नाहीं. हरि म्हणजे अज्ञान पोर ! चुकून त्याच्या हातून ही गोष्ट झाली आहे. माझी कंठी मला मिळाली, आता मझी फिर्याद वगैरे कांहींएक नाहीं. मेहरबानी करून ही गोष्ट एवढ्यावरच राहूंद्या."

परंतु फौजदारसाहेब कांहींकेल्या ऐकेनात. विठ्ठलरावांचे शत्रुदेखील आज फौजदारांची समजूत घालूं लागले; परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. गोविंदराव आणि हरि या दोघांनाहि पोलिसचे लोक चौकीवर घेऊन गेले. भागीरथीबाईंनीं रडूनरडून आकांत केला.

---

## प्रकरण चाळिसावें

# कर्म तसें फळ

" वकिलबिकील केल्यास यांतूनहि निभावण्याचा संभव आहे," असें भागीरथीबाईना कोणीकोणी सांगू लागले, परंतु भागीरथीबाईजवळ वकिला‍ देण्याला पैसे होते कोठें ? अन्नपूर्णाबाईचीहि तीच अवस्था. शेवटीं निरुपाया स्तव मानमर्यादा बाजूला सारून, अभिमानाला क्षणभर गुंडाळून ठेवून, लज्जेल फांटा देऊन, आजपर्यंत सरस्वतीशीं आपण कसें निंद्य आणि तिरस्करणी वर्तन करीत आलों, आतां ती आपल्याला काय म्हणेल या विचाराकडे देखी दुर्लक्ष करून, मुलाला संकटांतून वाचविण्याकरितां भागीरथीबाई शोकाकु होऊन सरस्वतीची याचना करूं लागल्या. त्या करुणव्यजक स्वरानें म्हणाल्य " सरस्वती, काय बाई सांगूं, आज तूंच मला पुत्रदान दिलं पाहिजे, नाह तर माझा हरि—"

दुःखानें बेहोष झालेल्या भागीरथीबाईनीं आज खरोखरच सरस्वतीपु पदर पसरला ! परंतु सरस्वती त्याचें निवारण करून म्हणाली " हें का भलतंच जाऊबाई ! त्यांत मेलं इतकं तें कशाला केलं पाहिजे ! तुम्ही कुण परक्या का आहां ? अहो, तुमचे हरि, रामू म्हणजे मुळीं मी माझेच आजव समजत्यें. तुम्हीं स्वस्थ असा."

असें म्हणून ती यमुनेपाशीं गेली आणि तिच्याजवळून शंभर रुपये ति मागून घेतले पैसे देतांना यमुनेनें बरेच आढेवेढे घेतले ती म्हणाली " गंगू उगाच याच्यात्याच्या सांगण्यावरून हवे तसे पैसे उडवूं नकोस. भोगूंदे कृत कर्मांचीं फळं ! करतांना गोड वाटलं, मग आतां का याची त्याची पायधरण पाहिजे !"

सरस्वतीचें दयार्द्र अंतःकरण गोविंदराव आणि हरि यांच्यासाठीं तळमळ होतें. तिनें यमुनेच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. गोविंदराव आणि हरि या दोघांच्याहि वतीनें एक चांगलासा वकील देण्यांत आला. भागीरथीबा आणि अन्नपूर्णाबाई यांचें बरेंच समाधान झालें मॅजिस्ट्रेटसाहेबाकडे चौकश सुरू झाली. गोविंदराव आणि विठ्ठलराव विभक्त होते; शिवाय, चारीस गेलेल कंठीहि गोविंदरावांच्या जागेंत सापडली नव्हती; सबब त्यांना निर्दोषी म्हणू सोडून देण्यांत आले; परंतु हरि सुटला नाहीं. हरीसारख्या संभावित कुळांती मुलाची या अल्पवयांत चोरी करण्याकडे प्रवृत्ति व्हावी, याचा मॅजिस्ट्रे

साहेबांना फार खेद वाटला, आणि हरीला आपली वर्तणूक सुधारतां यावी म्हणून त्याला पांच वर्षें मुंबई येथील उद्योगशाळेंत पाठवावा, असा त्यांनीं हुकूम केला.

दुःखावर ही आणखी डागणी बसतांच भागीरथीबाईंचें हृदय दुभंग झालें. त्यांच्या शोकाला पारावार राहिला नाहीं. आतां या जन्मीं कांहीं सुख किंवा शांति मिळण्याची त्यांना आशा राहिली नाहीं. सरस्वतीलाहि अपार दुःख झालें. ती भागीरथीबाईंचें समाधान करूं लागली, त्यांना धीर देऊं लागली, परंतु आतां भागीरथीबाईचा धीर समूळ तुटला होता. त्यांचें समाधान होणें आतां दुरापास्त झालें होतें. प्रायश्चित्ताबरोबर भागीरथीबाईंना आतां कृतकर्मांचीं फळेंहि भोगावीं लागत होतीं. पापाचें प्रायश्चित्त भोगल्याविना सुटका नाहीं; दुसऱ्याचा नाश केला असतां देव कधींहि आपल्यावर असंतुष्ट झाल्याविना रहात नाहीं; विशेषतः या ब्रह्मांडाचा चालक, सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी, सर्वव्यापी, अनंतशक्ति भगवान् राजदंड धारण करून सदैव या पृथ्वीचें शासन करीत आहे, हें आजवर भागीरथीबाईच्या पातकी हृदयांत कधींहि आलें नव्हतें आणि म्हणूनच विठ्ठलरावांप्रमाणें दुसऱ्याचा सर्वतोपरि नाश करण्यास प्रवृत्त होतांना त्यांचें मन कधींच कचरत नसे; परंतु आतां जेव्हां चोहोंकडून संकटें येऊं लागलीं–दुःखसागरांत जेव्हां त्या मग्न झाल्या, तेव्हां एकामागून एक सर्व गोष्टी त्यांच्या दृष्टीसमोर उभ्या राहिल्या झोंप त्यांच्या डोळ्यांना सोडून गेली आणि शोकाश्रूंनीं तेथें आपलें ठाणें बसविलें. अन्नपाणी वर्ज करून त्या अहो-रात्र रडून काढूं लागल्या. एकंदर पापकृत्यें आतां त्यांच्या डोळ्यांसमोर उभीं राहूं लागलीं. प्रत्यक्ष पित्याप्रमाणें स्नेहशील आणि परमपूज्य अशा सासऱ्याशीं आपण कसें लज्जास्पद निंद्य वर्तन केलें; बिचाऱ्या त्या वृद्ध आणि प्रेमळ सासूला नाहींनाहीं तें बोलून तिचा पदोपदीं कसा उपमर्द केला; नवऱ्याच्या मनांत नानातऱ्हेच्या खोट्यानाट्या गोष्टी भरवून देऊन वृद्ध सासूसासऱ्यांना मर्मांतिक वेदना होतील असे शब्द बोलावयास त्याला कसें प्रवृत्त केलें; त्या निष्कपट, सरळ स्वभावाच्या सरस्वतीला निष्कारण कसें छळलें; पतीकडून तिच्या घराला आग लावून त्यांत तिच्या त्या सर्वथैव निरपराधी, सोन्यासारख्या गोजिरवाण्या, कोमल बालकाला आणि सासूबाईंना कशा जाळून मारिल्या; सरस्वतीला या जगांतील एकदर सुखांना वंचित करण्याला आपण कशा कारण झालों आणि या अनिष्ट मार्गाचें अवलंबन करून शेवटीं आपल्याच हातानें आपल्या पायांवर

कुऱ्हाड कशी मारून घेतली, इत्यादि एकएक गोष्टी त्यांच्या मनांत येऊं लागल्या. बराच वेळ याप्रमाणें गेल्यावर आपलें आपणच समाधान करून घेण्यासाठीं भागीरथीबाई स्वतःशींच म्हणूं लागल्या " माझी अशी दुर्दशा होणार नाहीं, तर काय होणार ? मींच जर दुसऱ्याचा सत्यानाश केला आहे, तर देव माझा तरी सत्यानाश कां करणार नाहीं ! पहा ईश्वराचं करणं कसं आहे तें ? विस्तवाशिवाय माझ्या घराची राखरांगोळी झाली, पतिपुत्र तुरुंगांत पडले, एकुलता एक भाऊ तो दिखील त्यांच्याचबरोबर गेला. सासूसासऱ्यांचा आणि सरस्वतीचा तळतळाट आज मला भोंवला, त्यामुळंच माझी ही दशा झाली. मी आज सर्वस्वी निराधार झालें. घांसभर अन्नासाठीं दिखील भिकाऱ्या-प्रमाणं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याचा मला प्रसंग आला. माझा हरि आज माझ्याच दोषानं तुरुंगांत रखडत पडला. सरस्वतीला निष्कारण त्रास देण्यासाठीं मीं जर त्याला ही चोरीची दुष्ट संवय प्रथम लाविली नसती, तर तो असा मुळींच निपजला नसता. माझा बाळ आज खास मजजवळ असता. मीं जशीं कर्मे केलीं तशींच खडतर फळं आज भोगीत आहें. आतां नशिबाला दोष देऊन काय उपयोग ?"

असे कष्टानें भागीरथीबाई दिवस काढूं लागल्या. घरांत थोडेंसें सामान होतें. त्यावर कांहीं दिवस गेले; परंतु पुढें खरोखरच पोटासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याचा प्रसंग येऊन ठेपला. विठ्ठलरावांच्या देणेकऱ्यांपैकीं कोणी एकजण देखील एक पैहि देण्यास कबूल होईना. भागीरथीबाईना चोहोंकडे अंधःकार दिसूं लागला. अंगावर कांहीं खिडुकमिडुक होतें त्यावर त्यांनीं कित्येक दिवस गुजारा केला, त्याचाहि निकाल लागला. तेव्हां उसनवारीचा आश्रय त्यांनीं धरिला. सरस्वतीजवळून डाळतांदूळ, मीठमसाला, पैसाअडका उसनवार घेऊन कांहीं दिवस घालविले; परंतु अशी भिकेची हंडी शिंक्याला कशी लागणार! घरांतील वस्तु शेवटीं एकामागून एक जाऊं लागल्या. दोनदोन दिवस उपवास पडूं लागले. अशी भागीरथीबाईची अत्यंत शोचनीय अवस्था होऊन गेली. सरस्वती त्यांना शक्त्यनुसार साहाय्य करण्याला नेहमीं तयार असे; परंतु भागीरथीबाईना पुढें तिच्याजवळहि कांहीं मागण्याला लाज वाटूं लागली. शेवटीं दुसरातिसरा विचार न करितां भागीरथीबाई मुलांना घेऊन आपल्या भावाच्या घरीं निघून गेल्या. त्यांची ही दुर्दशा पाहून त्यांच्या आईच्या डोळ्यांत पाणी आलें, परंतु तिची स्थितिहि चांगली नव्हती. एकुलताएक

मुलगा माधवराव हा मुखत्यारीची लटपट करून कसेबसे पंधरावीस रुपये महिन्याच्या कांठीं मिळवून आणीत असे व त्यावर सगळ्या कुटुंबाला जेमतेम जाडेंभरडें अन्नवस्त्र मिळत असे; परंतु दुर्दैवानें माधवराव तुरुंगांत पडल्या दिवसापासून त्यांची कठीण अवस्था झाली होती.

---

प्रकरण एकेचाळिसावें

## देव तारी त्याला कोण मारी

विठ्ठलराव आणि भागीरथीबाई या दोघांनाहि आपल्या घोर पातकांचें यथायोग्य प्रायश्चित्त भोगण्यास तूर्त येथेच सोडून देऊन, वाचक हो! वादळात सांपडलेल्या आगबोटीपासून लाटेच्या तडाक्यानें अकस्मात् अलग झालेल्या त्या होडीची पुढें काय अवस्था झाली, ती आपण पाहूं एवढ्या मोठ्या अवाढव्य आगबोटीचें जेथें कांहीं चाललें नाहीं, तेथें ती एवढीशी क्षुद्र होडी किती वेळ टिकाव धरणार होती, असा पुष्कळाचा समज झाला असेल. ती केव्हांच बुडी मारून समुद्राच्या तळाशीं जाऊन बसली असेल, असा देखील कित्येकांनीं तर्क केला असेल. तेव्हां आतां त्या होडीची काय हालहवाल आहे हें पहाणें, म्हणजे आमच्या वाचकांना अमळ चमत्कारिकच वाटेल; हें खरें; परंतु ईश्वरी लीला किती अगाध आहे, याचा आपण क्षणभर विचार करूं लागलों म्हणजे आपली मति कशी कुंठित होते, व सकृद्दर्शनीं चमत्कारिक दिसणाऱ्या एकंदर गोष्टींचें गूढ त्या जगन्नियंत्याच्या अतर्क्य लीलासूत्रांत कसें गुरफटून गेलेलें असतें, याचा आपल्याला तत्काळ प्रत्यय येतो. त्या होडीची गोष्ट अशीच झाली. आंत कोणी खलाशी देखील नव्हता. केवळ दोन मनुष्यें आणि तींहि मृतवत् पडलेलीं. पर्वतकार प्रचंड लाटा अफाट सागराच्या पृष्ठभागावर हलकल्लोळ करीत होत्या. प्रायः प्रत्यक्ष कृतांत त्या लाटांच्या रूपानें आपले घातकी पाश टाकून होडींत निचेष्ट पडलेल्या त्या दुर्दैवी मनुष्यांचे प्राण हरण करण्यालाच सारखी धडपड करीत होता. परंतु ‘महापुरें झाडें जाती, तेथें लोहाळे वांचती!’ अशी जी साधूक्ति आहे ती येथेहि खरी ठरली. एवढी मोठी प्रचंड आगबोट त्या क्षुब्ध झालेल्या महासागराशीं झगडताझगडता शेवटीं तळाशीं जाऊन बसली; परंतु त्याच महासागराच्या विस्तीर्ण पृष्ठभागावरती क्षुद्र होडी हा वेळपर्यंत टिकाव धरून राहिली होती. लाटा जिकडे नेतील तिकडे तीहि झपाट्यानें चालली होती.

क्रमाक्रमानें पुढें वाऱ्याचा जोर कमीकमी होत चालला. समुद्र शांत होऊं लागला. रात्रीचा अंमल सरून सूर्याचीं कोमल किरणें पृथ्वीतलावर संचार करूं लागतांच निसर्गदेवताहि आपलें शांत, उदात्त आणि रमणीय स्वरूप प्रगट करूं लागली. प्रभातकालच्या मंद आणि शीतल वायूच्या सुखकर स्पर्शानें होडींतील त्या दोन मनुष्यांपैकीं एकजण प्रथम शुद्धीवर आला आणि डोळे उघडून आपल्या सभोंवार पाहूं लागला. तुफान वगैरे हल्लीं कांहीं नसून समुद्रानें शांत आणि गंभीर स्वरूप धारण केलें होतें. आकाशहि निरभ्र झालें होतें. हें पाहून त्या मनुष्याला फार आनंद झाल्यासारखा दिसला. होडींत असलेल्या दुसऱ्या मनुष्याला तो जागृत करूं लागला, परंतु त्याचे ते सर्व प्रयत्न निष्फळ झाले. त्यानें किती तरी हांका मारिल्या, किती वेळां तरी हातानें आपल्या त्या सोबत्याला हालवून पाहिलें, परंतु त्याचा कांहींच उपयोग होईना हें पाहून तो जिवंत आहे कीं भीतीनें केव्हांचा मृत्यूच्या स्वाधीन होऊन राहिला आहे, याचा देखील त्याला संशय वाटूं लागला; परंतु इतक्यांत हा अनिष्ट संशय दूर करण्या करितां कीं काय त्या निचेष्टित पडलेल्या मनुष्यानें डोळे उघडले आणि कावऱ्या बावऱ्या दृष्टीनें क्षणभर सभोंवार पाहून तत्काळ पुनः ते घट्ट मिटून घेतले. पुनः म्हणून मग ते उघडले नाहींत. हें पाहून त्याच्या सोबत्याला बराच धीर आला; परंतु त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न मग त्यानें सोडून देऊन आतां पुढें काय करावें याच विचारास तो लागला. या अफाट महासागरांतून आपण सुरक्षितपणें जमिनीवर पोहोंचतों कसे ? होडी चालविण्यास कोणी खलाशी नाहीं· अशा स्थितींत आपली अवस्था काय होणार ? इत्यादि दुर्धर विचारांनीं त्याचें मन व्यग्र होऊन गेलें होतें बराच वेळ तो विचार करीत स्वस्थ बसून राहिला होता. आपण हल्लीं आहों कोठें, आपल्या त्या आगबोटीचें पुढें काय झालें या अनंत सागरांत आपणाकडे कोणाचें लक्ष्य जाईल का, हे विचार एकामागून एक त्याच्या मनांत घोळूं लागले. आतांपर्यंत ज्यानें आपलें रक्षण केलें, तोच सर्वसाक्षी परमात्मा पुढेंहि आपल्याला विसरणार नाहीं, या विचारानें त्याच्या मनाला बराच धीर आला. त्या जगच्चालक प्रभूच्या मंगलचरणीं तो अनन्य भावानें लीन झाला.

कांहीं वेळानें मोठ्या सावधगिरीनें त्यानें त्या होडींत उभे राहून चोहोंबाजूल दूरवर नजर टाकिली; परंतु खालीं पाणी वर अनंत आकाश याखेरीज त्याल कांहीं दिसलें नाहीं. शेवटीं त्याच्या मनांत एक विचार आला. जाणाऱ्य

येणाऱ्या एखाद्या आगबोटीचें किंवा गलबताचें आपल्याकडे तावडतोब लक्ष्य जाईल अशी कांहींतरी युक्ति केली पाहिजे, असें त्याला वाटूं लागलें. परंतु ती युक्ति काय करावी, हें बराच वेळ त्याला सुचेना. शेवटीं अंगांतील अंगरखा काढून तो होडींत सांपडलेल्या एका काठीला त्यानें बांधिला आणि अशा रीतीनें तयार केलेलें तें निशाण त्यानें होडीच्या एका बाजूला नेऊन उभारिलें. हा उद्योग पुरा होतो न होतो तोंच समोर अतरावर कांहींतरी दिसल्याचा त्याला भास झाला. त्याबरोबर आनदाच्या भरात आपण कोठे आहों याचें त्या दुर्दैवी मनुष्याला भान न राहून तो खाडकन् उठून उभा राहिला आणि अगदी एकाग्र दृष्टीनें समोर पाहूं लागला. समोरून येणारी ती एक आगबोटच असावी असें त्याला वाटूं लागलें. आतां आपण खास वांचलों, या विचारानें त्याचें अतःकरण आनंदातिशयानें उडूं लागलें, परंतु तो आनंदच त्याच्या मृत्यूला कारण व्हावयाचा होता, हें त्या बिचाऱ्याला काय माहीत! त्याचे सारें लक्ष्य त्या समोरून येणाऱ्या आगबोटीकडे लागलें होतें. आनंदाच्या भरात ती अधिक स्पष्ट दिसावी म्हणून तो उच पाय करून अगदीं न्याहाळून पाहूं लागला, तोंच एकाएकीं झोंक जाऊन तो दुर्दैवी मनुष्य त्या अनंत सागरांत पार कोठच्याकोठें नाहींसा झाला! त्याला कोणत्याहि प्रकारें मदत करण्यास किंवा वाचविण्यास त्यावेळीं कोणीहि नव्हतें. त्या होडींत त्याचा सोबती होता खरा, परंतु तो असूननसून सारखाच होता. कारण त्या बिचाऱ्याला आपली स्वतःचीच शुद्धि नव्हती. मग तो दुसऱ्याला मदत करील, हा विचार तरी कशाला पाहिजे! तो आपला निचेष्ट पडला होता. त्या होडीचें आणि तिच्या-बरोबरच त्याचें स्वतःचें कांहीं बरेंवाईट झालें असतें, तरी देखील त्याला त्याची दाद लागली असती कीं नाहीं, हा प्रश्नच होता. असो.

जाणाऱ्यायेणाऱ्या एखाद्या आगबोटीचें आपल्याकडे त्वरित लक्ष्य लागावे म्हणून धडपड करीत असतां ज्यानें मृत्यूचें मात्र लक्ष्य आपल्याकडे ओढून घेतलें, त्या दुर्दैवी मनुष्यानें लाविलेल्या निशाणाचा खरोखरच चांगला उपयोग झाला. समोरून खरोखरच एक आगबोट येत होती. तीवरील लोकांचें त्या निशाणाकडे लक्ष गेलें. त्याबरोबर ते काय असावें, म्हणून ते दुर्बिणीनें पाहूं लागले. ती एक होडी आहे, असें दिसून येतांच कप्तानानें आगबोट त्या बाजूला वळविली आणि आपली एक होडी सोडून ती त्या होडीकडे पाठविली. इतस्ततः भ्रमण करणारी ती होडी मोठ्या कष्टानें त्या खलाशांनीं धरिली.

त्याबरोबर तींत मृतवत् पडलेला मनुष्य त्यांच्या दृष्टीस पडला. होडींत दुसरें कोणीहि नव्हतें. त्या खलाशांना मोठें आश्चर्य वाटलें. त्यांनीं मोठ्या काळजीनें त्या मनुष्याला आपल्या होडींत उचलून घेतलें आणि ते पुनः आपल्या आगबोटीवर निघून आले. आगबोटहि नंतर आपल्या निर्दिष्ट मार्गाला झपाट्यानें लागली.

---

प्रकरण बेचाळिसावें

## शुभशकुन

जवळजवळ तीन महिने होत आले. स्माईलसाहेब आणि जगन्नाथराव य दोघांनींहि त्या आगबोटींतून कोणी वांचलें आहे कीं काय याबद्दल आपल्या कडून पुष्कळ तपास करून पाहिला, परंतु आजवर त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. विनायकरावांचा शेवट काय झाला असला पाहिजे, याबद्दल संशय घेण्याला आतां जागाच राहिली नव्हती. तथापि जगन्नाथरावांची अद्यापीहि सर्वथैव निराशा झालेली नव्हती. गंगूचें दैव इतके निष्ठुर होणार नाहीं आपल्या प्रियमित्राचा खात्रीनें कधींतरी तपास लागेल, असेंच त्यांची मनोदेवता अद्यापीहि त्यांना सांगत होती. विठ्ठलराव आणि भागीरथीबाई यांच्या पापाचे घडे भरतांच त्यांच्या अमानुष आणि अघोर कृत्याबद्दल जसें शेवटीं त्यांना यथायोग्य शासन मिळालें, तद्वतच सरस्वती आणि विनायकराव यानांहि त्यांच्या सद्वर्तनाचें, त्यांच्या अलौकिक सहनशीलतेचें योग्य फळ मिळाल्याविन रहाणार नाहीं, असें अद्यापीहि त्यांना वाटत होतें. जगन्नाथरावांची ईश्वरावर पूर्ण श्रद्धा होती आणि त्यामुळेंच त्यांचें मन त्यांना सांगत होतें कीं, सरस्वती सारख्या सर्वथैव निरपराध अबलेवर तो जगच्चालक असा निष्कारण कोप कधींहि करणार नाहीं. त्या परमन्यायी परमेश्वराच्या घरी असा अन्याय कधींहि होणार नाहीं. दुर्दैवानें प्राप्त झालेले हे दुःखाचे दिवस जाऊन त्याच परम मंगल प्रभूच्या अमोघ कृपेनें विनायकराव आणि सरस्वती यांच्या भेटीचा सुदिन केव्हांना केव्हां तरी प्राप्त झाल्याविना रहाणार नाहीं. दुर्दैवरूपी अमंगळ ग्रहानें ग्रासलेला सरस्वतीचा सौभाग्यसूर्य पुनः सुप्रकाशित होईल आणि त्याच दिवशीं आजपर्यंत आपल्या मित्रासाठीं आपण घेतलेल्या सर्व श्रमाचें साफल्यहि होईल.

तो आनंददायक दिवस कधीं येतो, म्हणून जगन्नाथराव अगदीं उत्सुकतेनें वाट पहात होते. एकामागून एक दिवस जाऊं लागले. तसतशी त्यांची अधीर-

ताहि वाटूं लागली. एक–दोन–तीन महिने गेले, तरी देखील जेव्हां विनायकरावांचा कांहींच पत्ता लागेना, तेव्हां मात्र त्यांचें मन किंचित् निराश होऊं लागलें. त्या आगबोटींतील मनुष्यें कोठेंहि जरी लागलीं असतीं तरी या इतक्या अवकाशांत त्यांचा खात्रीनें कांहींना कांहीं तपास लागला असता, असें त्यांना वाटूं लागले. ते मुंबई सोडून पुनः आपल्या अभ्यासाला लागले. परीक्षाहि अगदींच जवळ येऊन ठेपली होती; परंतु अभ्यासाकडे म्हणून त्यांचें मन मुळींच लागेना.

स्माईलसाहेबांकडून त्यांना वारंवार पत्रें येत असत; परंतु त्यांत मजकूर म्हटला म्हणजे “आजवर कांहींच तपास लागला नाहीं,” हाच असावयाचा. आज देखील त्यांना याच अर्थाचें स्माईलसाहेबाचें पत्र आलें होतें आणि त्यामुळें जगन्नाथरावांची आज अधिकच निराशा झाली होती. मन अगदीं उदास होऊन गेलें होतें. आपल्या खोलींत ते इकडून तिकडे खिन्न अंतःकरणानें फेऱ्या घालीत होते. इतक्यांत तारेचा शिपाई त्याच्या नांवाची एक तार घेऊन आला. तार पहातांच त्यांच्या पोटांत धस्स झालें. ती फोडून पहाण्यास देखील त्यांचें मन घेईना.

सरस्वतीची अवस्था दिवसेंदिवस शोचनीय होत चालली होती. तिनें प्रकृतीची अगदींच हेळसांड चालविल्यामुळें ती पराकाष्ठेची अशक्त झाली होती. त्यामुळें तिची प्रसूत होण्याची वेळ जसजशी जवळ येऊं लागली, तसतशी ही एकदा हातींपायीं सुखरूप सुटते कशी, ही सर्वांना काळजी लागली होती. तिनें माहेरीं किंवा निदान आपल्या घरीं तरी येऊन रहावें, म्हणून जगन्नाथरावांनीं तिला नाना प्रकारें सांगून पाहिलें; परंतु ती म्हणून कांहीं केल्या कबूल होईना. जगन्नाथरावांना शेवटीं नाइलाजास्तव तो नाद सोडून द्यावा लागला. तिची तेथेंच नीटपणें व्यवस्था लावून देण्याचा त्यांनीं विचार ठरविला; परंतु या त्यांच्या विचाराला त्यांच्या प्रियपत्नीची संमत्ति मिळेना. गंगूची तेथें चांगली व्यवस्था राहणें मुळींच शक्य नाहीं, असें यमुनाबाइच्या मनानें पक्कें घेतलें होतें आणि एवढ्यासाठीं जगन्नाथरावांना पुढें पाठवून देऊन सरस्वतीचें मन वळविण्याच्या हेतूनें त्या तेथे राहिल्या होत्या. यमुनाबाईंच्या परोपरीच्या सांगण्यानें देखील सरस्वतीचें मन मुळींच वळलें नव्हतें; परंतु यमुनाबाईनीं आपला आग्रह सोडिला नव्हता. शेवटीं त्यांच्या कटकटीला त्रासून सरस्वती त्यांच्याबरोबर जाण्यास एकदाची

कबूल झाली. त्याबरोबर 'पडत्या फळाची आज्ञा' समजून दुसरेच दिवशीं यमुनाबाई तिला घेऊन आनंदानें आपल्या घरीं निघून आल्या.

सरस्वतीला आतां पुरे दिवस झाले होते आणि ती एकदा हातींपायीं सुखरूप कशी सुटते, या चिंतेनें जगन्नाथरावांचें अंतःकरण अत्यंत उद्विग्न होऊन गेलें होतें. त्यामुळें तार आलेली पहातांच ती घराहूनच आली असली पाहिजे आणि इतकी तार पाठविली आहे त्या अर्थी कांहीं तरी अनिष्ट घडून आलें असलें पाहिजे, असें तत्काळ त्यांच्या मनानें घेतलें आणि म्हणूनच ती पहातांक्षणीं त्यांच्या पोटात धस्स झालें.

इतकी जरूरीची तार आपण इतक्या मोठ्या तांतडीनें धांवतधांवत घेऊन आलों आणि हे विलक्षण गृहस्थ ती नुसती वाचून देखील पहात नाहींत, या गोष्टीचें त्या तार घेऊन येणाऱ्या शिपायाला देखील आश्चर्य वाटलें असावे. कारण त्यात कांहींतरी आनंदाचा मजकूर असला तर आपल्याला खात्रीनें कांहींतरी बक्षिस मिळेल, या आशेनें तो अद्यापि तेथेच रेंगाळत उभा राहिला होता; परंतु जगन्नाथरावांची ही विलक्षण तऱ्हा पाहून हिरमुसल्यासारखा होऊन तो हळुहळू तेथून निघून गेला.

तो आणखी थोडा वेळ उभा राहिला असता तर जगन्नाथरावांनीं त्याला खात्रीनें खूष केल्याविना जाऊं दिला नसता. कारण, मन किंचित् स्वस्थ होतांच त्यांनीं ती तार उघडून मोठ्या आतुरतेनें वाचून पाहिली आणि त्याबरोबर ते फार आनंदी झालेले दिसले. त्यांची उदासीनता आणि उद्विग्नता पार निघून गेलीं. ताबडतोब त्यांनीं पोषाख चढविला आणि ती तार गडबडीनें खिशांत घालून ते बाहेर जाण्यास निघाले. परंतु ते खोलीबाहेर पडतात न पडतात तोंच समोरून पोष्टाचा शिपाई आला आणि त्यानें एक पत्र त्यांच्या हातीं दिलें. जगन्नाथरावांनीं तें पत्र कोठून आलें हें तत्काळ ओळखलें आणि तें उघडीत उघडीत ते पुनः आपल्या खोलींत शिरले. खोलीत एका खुर्चीवर बसून त्यांनीं तें लहानसें पत्र अगदीं एकाग्रतेनें वाचून पाहिलें व त्याबरोबर "हं! आतां संशयच घ्यायला नको. तोच तो! पहा शुभ शकुनच म्हणायचा!" हे उद्गार एकदम त्यांच्या मुखांतून बाहेर पडले.

जगन्नाथरावांची उदासीनता आणि उद्विग्नता एकदम नाहींशी करण्याजोगा त्या तारेंत मजकूर तरी काय होता, त्याचप्रमाणें इतका शुभ शकुन होण्याजोगें तें पत्र कोणीं धाडिलें होतें, याबद्दल वाचकांना निरर्थक संशयांत ठेवून त्यांची

उत्सुकता अधिक वाढविण्याला आतां आमच्यापाशीं मुळीं अवकाशच राहिला नाहीं. परोपकारी स्माईलसाहेबांकडूनच ती तार आली होती. "बुडालेल्या आगबोटीवरील एक इसम जपानांत एका दवाखान्यांत गेले अडीच महिने आजारी पडून होता तो बरा होऊन नुक्ताच मुंबईस जाणाऱ्या आगबोटींत बसून निघून गेला, असा तपास लागल्याबद्दल जपानांत गेलेल्या आपल्या एका स्नेह्याकडून तार आली आहे. तरी आतां जपानांतून मेल घेऊन जी आगबोट येईल, तिच्यावर तपास करावा व ताबडतोब मला कळवावे," असा तींत मजकूर होता. विनायकराव खात्रीने आपल्याला भेटणार, असें जगन्नाथरावांना वाटत असल्यामुळें हा दवाखान्यांतून बरा होऊन येणारा इसम म्हणजे विनायकरावच असले पाहिजेत, अशी आशा एकदम त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. अर्थात्, त्यांना पराकाष्ठेचा आनंद झाला. जपानची आगबोट कधीं येते, त्याचा तपास करण्यासाठीं ते तसेंच बाहेर जाऊं लागले-तोंच मागे सांगितलेलें पत्र त्यांना मिळालें. तें पत्र त्यांना प्रियपत्नीकडून आलें होतें आणि ईश्वरकृपेनें सरस्वती सुखरूप प्रसूत होऊन तिला मुलगा झाला, हा आनंदाचा मजकूर त्यांत होता. हा विलक्षण योगायोग पाहून तर जगन्नाथरावांना आपल्या प्रिय मित्राच्या सुखरूपतेबद्दल संशयच राहिला नाहीं. त्यांना आनंदाचें भरतें आलें. विनायकरावांच्या भेटीला हा शुभ शकुनच झाला, असें त्यांना वाटलें.

---

प्रकरण त्रेचाळिसावें

## खरोखरच चिंतामणि

सरस्वती आणि यमुना यांचा आज मोठा कडाक्याचा वादविवाद चालला होता. सरस्वती प्रसूत होऊन आठ दिवस झाले होते. मुलाचें नांव ठेवण्याचा दिवस जसजसा जवळ येत चालला, तसातसा तें नांव काय ठेवावें याबद्दल दोघींचाहि आग्रह वाढत चालला होता. मुलगा झाल्या दिवसापासून सरस्वती त्या अपार दुःखसागरांतहि किंचित् सुखानुभव घेत होती. तरी देखील तिच्या डोळ्यांतील अश्रु म्हणून कांहीं खळले नाहींत. आपला हा मुलगा खरोखरच फार अभागी असला पाहिजे, असा स्त्रीजातीच्या नैसर्गिक वृत्तीमुळें सहजच सरस्वतीचा समज झाला होता. तो मुलगा गर्भांत आल्यादिवसापासून त्या बिचारीवर नाना तऱ्हेचीं संकटें आलीं होतीं. सरस्वतीचा हा समजच तिच्या आणि यमुनाबाईच्या वादविवादाला कारण होत होता.

यमुनाबाईच्या मनांत त्या गोजिरवाण्या मुलाला 'चिंतामणि' हें नांव ठेवावयाचें होतें. त्या म्हणत, गंगू दुःखसागरांत बुडून गेली असतां सुदैवानें तिला हा चिंतामणिच लाभला आहे. ईश्वरकृपेनें हा मुलगा जगला वांचला तर गंगूला आपल्या असह्य दुःखाचाहि क्रमाक्रमानें सहज विसर पडत जाईल, तिचें उदास झालेलें मनहि पुनः संसाराकडे ओढूं लागेल.

यमुनाबाईचें हें म्हणणें केवळ निरर्थक नव्हतें; परंतु सरस्वतीला तें मुळींच पटेना. अविनार दुःखशोकानें अतःकरणांत एकवार पडलेली जखम अजीबात भरून निघणें अशक्य आहे, असें तिला वाटत होतें. ती म्हणे "माझं हें सारं दुःख माझ्याबरोबरच नाहींसं होईल!"

शेवटीं यमुनाबाईनीं अगदीं निकरावर येऊन सरस्वतीला सांगितलें "आपण या बाबतींत मुळींच कुणाचं ऐकणार नाहीं. मी या मुलाचं नांव चिंतामणिच ठेवणार. मग तुला जर तें आवडलं नाहीं तर तूं त्याला मसण्या–दगड्या–धोंड्या–काय लागेल त्या नांवानं हांक मार. पण परवा बारशाच्या दिवशीं मी म्हणून तुला या सोन्यासारख्या मुलाला वेडंवाकडं नांव ठेवूं देणार नाहीं!"

हें ऐकून बिचारी सरस्वती स्वस्थ राहिली. परंतु ती स्तब्ध बसली हेंहि यमुनाबाईना बरें वाटलें नाहीं. त्या म्हणाल्या "गंगू, तूं असं करूं करूं नकोस. या निरपराध बालकाला तूं दुर्दैवी म्हणतेस तरी काय म्हणून! विनुभाऊ अद्यापिहि येणार नाहींत कशावरून? त्याचा नक्की असा कांहीं तपास लागला आहे का आजवर?"

"मग अद्यापि लागायचा आहे वाटतं?"

"हो त्याचा कुणीं नेम सांगावा! अशा थोड्या का गोष्टी घडून आलेल्या आपण ऐकतों? गंगू, अग त्या दीनबंधु परमेश्वराची कृपा असली, म्हणजे यापेक्षांहि अघटित गोष्टी घडून येतात. 'तारणारापुढं मारणाराचं कांहीं चालत नाहीं,' म्हणून जी म्हण पडली आहे, ती एवढ्यावरूनच बरं!"

सरस्वती कांहींएक बोलली नाहीं. विनायकरावांची गोष्ट निघतांच तिच्या डोळ्यांतून घळघळ आसवें वाहूं लागलीं. यमुनाबाईहि कधीं ही गोष्ट सहसा तिच्याजवळ काढीत नसत. परंतु आज सकाळींच त्यांना जगन्नाथरावांकडून पत्र आलें होतें. कोणतीहि गोष्ट आपल्या पतीला कळविल्याविना रहावयाचें नाहीं, असा यमुनेचा नियम होता. त्याप्रमाणें सरस्वतीच्या मुलाचें नांव ठेवण्याच्या बाबतींत जो वादविवाद चालला होता, तोहि त्यांनीं जगन्नाथरावांच्या

कानावर घातला होता, आणि त्यांचें म्हणणें या बाबतींत काय पडतें तेंहि त्यांनीं विचारिलें होतें. या त्यांच्या पत्राचें आजच उत्तर आलें होतें. त्यांत स्माईलसाहेबांकडून आलेल्या तारेंतील मजकूर लिहून जगन्नाथरावांनीं पुढें विनोदानें लिहिलें होतें, कीं, "कदाचित् सुदैवानें विनायकराव आले, तर तेच तुमच्या या वादविवादाचा निकाल लावितील. आतांच जर मीं आपलें मत दिलें तर गंगू माझ्यावर पक्षपात केल्याचा आरोप खास आणील आणखी पांच दिवसांनीं ती आगबोट यावयाची आहे, तोंपर्यंत धीर धरावा, हें चांगलें. गंगूला मात्र सध्याच हें कळवूं नकोस. कारण, न जाणों दुर्दैवानें हे खोटें ठरलें तर त्या बिचारीची पराकाष्ठेची निराशा केल्यासारखें मात्र होईल. तूर्त मी तिकडे येईपर्यंत मुलाचें नांव वगैरे ठेवण्याची घाई करूं नये."

हें पत्र वाचल्यापासून विनायकराव सुखरूप असून ते या संधीस खात्रीनें येथें येऊन पोहोंचतील, असा आशांकुर जगन्नाथरावांप्रमाणें यमुनाबाईच्याहि अंतःकरणांत उद्भवला होता आणि म्हणूनच मुद्दाम ही गोष्ट काढून आज सरस्वतीला वरील बुद्धिवाद सांगण्याचें त्यांनीं साहस केलें होतें.

बिचारी सरस्वती अद्यापीहि कांहीं बोलली नाहीं. यमुनाबाईच पुढें म्हणाल्या "शिवाय तूं असं पहा गगू, देवाच्या दयेनं तुझा मुलगा मोठा झाला म्हणजे तोच नाहीं का तुझे पाग फेडणार ? आणि विनूभाऊचं नांव तरी हाच नाहीं का राखणार ? तुझ्या सासऱ्यानं तुला अतकाळीं काय सांगितलं, तें आहे ना तुझ्या लक्षांत ? देशमुखांच्या घराण्याचं नांव राखण्याविषयीं नाहीं का त्यांनीं अगदीं आग्रहानं सांगितलं ! या मुलाचं चांगल्या प्रकारं संगोपन केलंस तर मला वाटतं तुझ्या सासऱ्याची शेवटची इच्छा अद्यापीहि तुला पूर्ण करतां येईल."

यमुनाबाईच्या या बोलण्याचा मात्र चांगलाच उपयोग झाला. सरस्वती बराच वेळ यावर विचार करीत होती. शेवटीं एक मोठा सुस्कारा सोडून ती म्हणाली "होय, यमुताई, आतां हीच आशा धरावी तेंच चांगलं. परमेश्वरानं एवढी तरी माझी आशा पुरवावी, म्हणजे मीं सारं मिळवलं !"

"पुरवील, पुरवील, इतका कांहीं देव निष्ठुर नाहीं बरं !" असें म्हणून यमुनाबाईनीं तिचें समाधान केलें.

देव खरोखरच इतका निष्ठुर झाला नव्हता, आणि सरस्वतीचें दैवहि आतां तिला अनुकूल झालें होतें. कारण, तिला झालेला मुलगा तिच्या म्हणण्याप्रमाणें

अभागी होता, कीं, यमुनाबाईच्या म्हणण्याप्रमाणें दैववान् होता, हें प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध करण्याकरितांच कीं काय विनायकराव खरोखरच त्या जपानच्या आगबोटींतून मुंबईला सुखरूप येत होते. आगबोट बंदरांत येऊन ते खालीं उतरतात तोंच जगन्नाथराव हर्षनिर्भर होऊन त्यांना कडकडून भेटले. विनायकरावांनाहि अत्यानंद झाला. परंतु त्या आनंदापेक्षांहि जगन्नाथराव आपल्याला न्हाण्याकरितां या बोटीवर कसे आले, याचेंच त्यांना अधिक आश्चर्य वाटलें. जगन्नाथरावांनीं त्यांना फार वेळ बुचकळ्यांत ठेविलें नाहीं. स्माईल्साहेबांकडून आलेल्या तारेची हकीगत त्यानीं बिऱ्हाडाकडे जातांजातां विनायकरावांना सांगितली. ती ऐकून विनायकराव कृतज्ञतेनें म्हणाले "एकूण, साहेब मला अद्यापि विसरले नाहींत !"

"अरे, तुझ्या त्या साहेबासारखा दयाळू आणि उदार मनाचा गृहस्थ मी आजवर पाहिला नाहीं. पण विनायक, तू मात्र त्याला आणि आम्हांला विसरून गेला होतास !"

विनायकराव कांहींच बोलले नाहींत. ते रुमालानें डोळे पुसूं लागले. तो दिवस मुंबईत काढून दुसरे दिवशी जगन्नाथराव विनायकरावांना घेऊन आपल्या घरीं आले. विनायकराव खरोखरच सुखरूप आलेले पाहून यमुनाबाईचा आनंद गगनांत मावेनासा झाला. त्या मोठ्या गडबडीनें ती अत्यानंदाची बातमी सरस्वतीला कळविण्याकरितां जाऊं लागल्या, परंतु त्यांना जाऊं न देतां स्वतः जगन्नाथरावच सरस्वतीच्या खोलींत गेले आणि हंसतहंसत म्हणाले "गंगू, मुलाचें नांव ठेवण्याबद्दल काय तुम्हीं दोघीनीं भांडण चालविलें आहे हे ?"

"भांडण कसलं आलं आहे ? भलतंच आपलं काहींतरी ! अन् दादा, यमुताईजवळ भांडण करून मला का त्यांत कधीं जय यायचा आहे ! माझी आपली वेडी समजूत, म्हणून मीं तिला सांगितलं झालं कांहीं तरी. पण दादा, तूं अजून पाय दिखील धुतले नाहींस तोंच काय या भलत्याच नादाला लागलास ?"

"काय करणार, तुम्ही बायका कुठें आम्हांला चैन पडूं देतां ! पण गंगू, तुझें आतां म्हणणें तरी काय आहे ? तडजोड नाहीं का त्यांत निघण्याजोगी ?"

"तूं पण काय वेड्यासारखा त्या यमुताईलाच्या नादाला लागतोस दादा ? माझं म्हणणं कसलं आलं आहे अन् तडजोड कसली आली आहे ! भलतंच आपलं कांहींतरी !"

"बरें तें राहूंदे. पण तूं या मुलाला कशावरून अभागी म्हणतेस तें तरी एकवार सांग."

"अभागी नाहीं तर काय—"

सरस्वतीला दुःखाचा हुंदका आला. हें पाहून जगन्नाथराव म्हणाले "गंगू, मी स्वतः विनायकरावालाच घेऊन येतों, म्हणजे तोच या भांडणाचा निकाल लावील"

असें म्हणून जगन्नाथराव बाहेर आले आणि विनायकरावांचा हात धरून त्यांना घेऊन पुनः ते त्या खोलींत शिरले.

विनायकरावांना आपल्या घरची एकंदर हकीगत कळलीच होती. सरस्वतीला भेटण्यासाठीं ते अत्यंत अधीर झाले होते, परंतु सरस्वतीला त्यांच्याबद्दलची कांहींएक बातमी लागली नव्हती. त्यामुळें जगन्नाथरावांचें तें सांगणें तिला कसेंसेंच वाटलें. जगूदादानें आज आल्याबरोबर अशी भलतीच थट्टा काय म्हणून चालविली आहे, याचेंच तिला आश्चर्य वाटत होतें. तोंच खरोखरच विनायकराव जगन्नाथरावांच्या मागोमाग खोलींत शिरलेले तिनें पाहिलें. त्याबरोबर ती अगदींच घोटाळ्यांत पडली. आपण जागृत नसून हें स्वप्न पहात आहों, असेंच तिला वाटलें. आणि या सुखदायक स्वप्नाचा भंग होऊं नये म्हणूनच कीं काय तिनें आपले दोन्ही डोळे घट्ट मिटून धरिले. हें पाहून यमुनाबाई तेथेच ती मौज पहात उभ्या होत्या त्या हंसतहंसत म्हणाल्या, "गंगू, आतां ग कां बाई डोळे मिटून धरलेस हे! चांगले नीट उघड आणि या आपल्या पतिराजांकडे पाहून मला एकवार सांग पाहूं, हा तुझा मुलगा खरोखरच चिंतामणि आहे कीं नाहीं?"

सरस्वतीनें डोळे उघडले आणि एकवार विनायकरावांकडे पाहिलें मात्र तिची दृष्टि तत्काळ खालीं गेली. तिची नैसर्गिक लज्जाशील वृत्ति तिच्या मुखवाटे एक शब्दहि फुटूं देईना, मग यमुनाबाईच्या प्रश्नाचें उत्तर तिनें कसें द्यावे बरें?

अशा अघटित रीतीनें पुनः गांठ पडलेल्या त्या पतिपत्नीला मन मोकळें करून एकमेकांशीं बोलतां यावे म्हणून जगन्नाथराव आणि यमुनाबाई हीं दोघेंहि हळूहळू तेथून बाहेर पडलीं. या अपूर्व प्रसंगाचें वर्णन करण्याचें सामर्थ्य आमच्या लेखणींत नाहीं, तेव्हां व्यर्थ त्या नादास न लागतां आम्हींहि जगन्नाथराव आणि यमुनाबाई यांचेंच अनुकरण करावें हेंच चांगलें.

---

## प्रकरण चवेचाळिसावें

# उपसंहार

विनायकरावांची आगबोट बुडाल्या दिवसापासून सरस्वतीच्या दुःखाचा कडेलोट झाला होता. इतर मंडळीला अद्यापिहि विनायकराव परत येतील अशी आशा होती, परंतु सरस्वती मात्र पतीच्या भेटीविषयीं अगदीं निराश होऊन बसली होती. बिचारी त्या दिवसापासून वैधव्याचें दुर्धर दु:ख अनुभवीत होती. अशा स्थितींत विनायकराव सुखरूप परत येऊन तिला भेटले, तेव्हां त्या सुशील साध्वीला किती आनंद झाला असेल, तो वर्णन करून सांगतां यावयाचा आहे ? आजवर भोगलेल्या हालअपेष्टा, खडतर दुःखे, ती या एका घटकेच्या आनंदानें पार विसरून गेली.

यमुनबाईनीं त्या दिवशीं थट्टा करकरून सरस्वतीला नकोनकोसें करून सोडिलें. "मग गगू, आता तूं या मुलाचं नांव 'दगड्या' ठेवणार कीं 'धोंड्या' ठेवणार ! हो, तूं त्याची आई ! तूं त्याला लागेल तें नांव दिलंस तरी तुला नको कुणीं म्हणावं !"

"यमुताई, तूं बाई हवी तितकी थट्टा कर. तुम्हीं उभयतांनीं माझ्यावर जे उपकार केले आहेत, त्यामुळं आमचं काय वाटेल तें करायचा तुम्हांला अधिकार आहे; मग मुलाचं नांव ठेवण्याचीच गोष्ट कशाला हवी ? पण आपलं, मी तुला सांगून ठेवतें, कीं देव कांहीं खरोखरच या जगातून कुठं गेला नाहीं ! माझा अधिकार गाजविण्याचा दिवसहि कांहीं फारसा लांबणीवर जायचा नाहीं, समजलीस !"

असो. याप्रमाणें सरस्वती आणि विनायकराव यांची त्या जगन्नियंत्याच्या अतर्क्य लीलेनें पुनः भेट होऊन सर्वत्र आनंदीआनंद झाला. सच्चरित्र साध्वी सरस्वतीच्या दुःखशोकाचा असा अकल्पित रीतीनें शेवट झाला. आमचें कथानकहि अर्थात् येथेंच आटोपलें. आतां फक्त बाकीच्या मुख्य मुख्य पात्रासंबंधीं कांहीं ठळक गोष्टी सांगून वाचकांची रजा घ्यावी.

विनायकराव जपानांत कसे गेले, हें आमच्या सुज्ञ वाचकांनीं ताडलेंच असेल. बुडालेल्या बोटीपासून सुटलेली होडी दुसऱ्या एका बोटीला आढळली होती, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. त्या होडींत फक्त एकच मनुष्य अगदीं मृतवत् पडलेला होता. हा मनुष्य म्हणजे आमचे विनायकरावच होत ! कप्तानानें त्यांना बोटीवर घेऊन त्यांना सावध करण्याचे प्रयत्न सुरू केले. बऱ्याच

वेळानें विनायकराव सावध झाले; परंतु ते नुक्तेच जिवावरच्या दुखण्यांतून उठले होते, प्रकृति अद्यापि पराकाष्ठेची अशक्त होती, त्यांत तें भयंकर तुफान पाहून आपण आतां यांतून खास वांचत नाहीं अशी त्यांनीं धास्ती घेतली. त्यांच्या मनाला एकदम धक्का बसला व त्याचा त्यांच्या अशक्त प्रकृतीवर भयंकर परिणाम झाला. ती बोट जपानांत जातांक्षणींच कप्तानानें त्यांना तेथल्या एका मोठ्या इस्पिताळांत ठेविलें. तेथें दोन महिनेपर्यंत, ते वांचतील अशी कांहीं कोणालाहि आशा नव्हती. परंतु सरस्वतीचें सौभाग्य बळकट होतें. दोन महिन्यांनीं विनायकरावांची प्रकृति किंचित् ताळ्यावर येऊं लागली. त्या दोन महिन्यांत ते शुद्धीवर देखील नव्हते–मग आपण येथें आहों, ही बातमी तरी त्यांनीं कशी व कोणाला कळवावी ? प्रकृति साधारण बरी होतांच ते तेथील लोकांचे मनोभावानें आभार मानून मुंबईस यावयास निघाले. तेथील लोकांनीं त्यांची सर्व प्रकारें चांगली व्यवस्था लावून दिली. स्माईलसाहेबांच्या जपानांतील एका स्नेह्याला बुडालेल्या बोटीवरील एक मनुष्य तेथें दवाखान्यांत असल्याचा तपास लागला होता; परंतु तो विनायकराव तेथून बोटींत बसून निघाल्यावर लागला. तत्काळ त्यानें स्माईलसाहेबांना ती हकीगत कळविली. स्माईलसाहेबांकडून जगन्नाथरावांना ती बातमी लागली आणि म्हणूनच विनायकराव बोटींतून खालीं उतरतांक्षणींच जगन्नाथराव त्यांना भेटले. असो.

*　　*　　*　　*

यानंतर सांगावयाची गोष्ट म्हणजे भागीरथीबाईची होय. भावाच्या घरींहि त्यांचा फार दिवस टिकाव लागला नाहीं. त्याची अगदींच अन्नान्नदशा झाली. घरदार, जमीनजुमला सर्व कांहीं सावकारांनीं जप्त केलें. आमच्या जगन्नाथरावांनीं विठ्ठलरावाची ही सारी मिळकत सरस्वतीसाठीं आपल्या पैशानें लिलावांत घेतली होती. त्या एकंदर मिळकतीची व्यवस्था हल्ली सरस्वतीच्या सांगण्यावरून गोविंदराव पहात असतात. गोविंदरावांनीं आपली शाळा पुनः सुरू केली आहे आणि सुदैवानें त्यांचें आतां ठीक चाललें आहे. तरीपण अन्नपूर्णाबाईना सगळा आधार सरस्वतीचाच आहे. त्यांच्या दोन मुलींचीं लग्नें विनायकरावांनींच करून दिलीं. ते सर्व प्रकारें गोविंदरावांना मदत करित असतात.

भागीरथीबाईना माधवरावांनीं आपल्या घरांतून हांकून लाविल्यानंतर स्वयंपाकिणीची नोकरी पत्करून त्या मुंबई, कराची, इंदुर, नागपुर, मद्रास वगैरे मोठमोठीं शहरें पाहून आल्या; परंतु जन्मस्वभावामुळें त्यांचा फार दिवस

कोठेंच टिकाव लागला नाहीं. तेव्हां शेवटीं सरस्वतीच्या आग्रहाला कबूल होऊन त्या तिच्याजवळ येऊन राहिल्या. मुदत भरतांच विठ्ठलराव कारागृहांतून मुक्त झाले. विनायकरावांनीं त्यांना आदरपूर्वक आपल्या घरीं आणिले; परंतु भागीरथीबाईचें आणि त्याचें मुळींच पटेना. बायको दृष्टीस पडली, कीं, ते कावरेबावरे होत. "माझ्या हातून जीं अनन्वित कृत्यें घडलीं, त्याला कारण हीच चांडाळीण!" असें ते वारंवार बडबडत. शेवटीं एके दिवशीं जवळपास दुसरें कोणी नव्हतें अशा संधीस त्यांनीं भागीरथीबाईचा कपाळमोक्ष केला. विठ्ठलराव हल्लीं ठाण्याला वेड्यांच्या इस्पितळांत आहेत.

* * * *

हरि पांच वर्षांनीं उद्योगशाळेंतून सुटला. आपल्या काकांच्या मदतीनें मुंबईत राहून तो हल्लीं प्रामाणिकपणानें धंदा करीत आहे. त्या उद्योगशाळेंत गेल्यापासून त्याचा खरोखरच फायदा झाला. रामू धाकट्या काकीजवळ राहून विद्याभ्यास करीत आहे.

* * * * *

विनायकरावांना पुनः ब्रह्मदेशांत जावें लागलें नाहीं. ते सुखरूप परत आल्याची बातमी समजतांच त्या उदार अंतःकरणाच्या स्माईलसाहेबांना अत्यानंद झाला. एकदोन महिने विनायकराव विश्रांति घेतात न घेतात तोंच स्माईलसाहेब स्वतः मुंबईस आले आणि त्यांनीं आपल्या व्यापाराची एक पेढी मुंबईस स्थापन केली. विनायकराव पांच वर्षेपर्यंत या पेढीचे मॅनेजर होते. हल्लीं ते स्माईलसाहेबाचे भागीदार आहेत. व्यापारांत त्यांनीं चांगलाच लौकिक संपादन केला आहे दोन वेळां तर सरकारांतून त्यांना मुंबईचे शेरीफ नेमण्यांत आलें होतें. वडिलोपार्जित मिळकतींत आतां त्यांनीं कितीतरी भर घातली आहे. आपल्या गावीं एक टोलेजंग वाडा बांधून त्यात आपल्या आईच्या—सगुणाबाईच्या स्मरणार्थ एक मुलींची शाळा स्थापन केली आहे आणि त्याचप्रमाणें त्या गांवात त्यानीं एक धर्मार्थ दवाखाना स्थापन करून आपल्या परमपूज्य वडिलांचें—जनार्दनपंतांचें योग्य स्मारक केलें आहे.

